# उपासमार की नियोजन ?
अर्थात्
# हिंदी लोकसंख्येचा प्रश्न


लेखिका

सौ. चंद्रकला हाटे, एम्. ए.
लेक्चरर, ना. दा. ठा. कॉलेज, मुंबई.

कु. कृष्णाबाई कोल्हटकर, एम्. ए.
लेक्चरर, वुइमेन्स कॉलेज,
हिंदु युनिर्व्हर्सिटी, बनारस.



सुविचार प्रकाशन मंडळ, लिमिटेड
नागपूर व पुणें

शके १८६१ ] किंमत दीड रुपया [ सन १९३९

# अनुक्रमणिका

# परिचय

हिंदुस्थानच्या आर्थिक प्रश्नाकडे लोकांचें व सरकारचें लक्ष अलीकडे अधिकाधिक वेधलें जात आहे. इंग्रजींतून व मातृभाषेंतून या विषयावर प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांची वाढती संख्या ही या प्रवृत्तीचें द्योतक होय. आर्थिक प्रश्नाच्या निरनिराळ्या अंगांची चर्चा अशा ग्रंथांतून केल्यामुळे लोकजागृतीस मदत होते. आर्थिक परिस्थितीचा समाजाच्या जीवनाशीं अगदी मूलभूत संबंध असल्यामुळे ह्या परिस्थितीचा बरावाईट परिणाम समाजाच्या सर्व संस्थांवर होतो. सामान्य जनतेच्या लक्षांत वरवरचे परिणाम तेवढे येतात. त्या परिणामांचीं पाळें मुळें आर्थिक परिस्थितीशीं निगडित आहेत हें त्यांना पटणें पुष्कळ वेळां कठीण पडतें व तें स्वाभाविकही आहे. म्हणून आर्थिक प्रश्नाचा शास्त्रीय दृष्टया ऊहापोह करणारे ग्रंथ केव्हाही मननीय होत.

हिंदी लोकसंख्या हा विषय जरी आर्थिक असला तरी त्यावर सामाजिक व राजकीय परिस्थितीचे परिणाम झालेले आहेत. उलट पक्षीं सध्याच्या उपासमारीला वाढती संख्या हीही थोडीफार जबाबदार होत आहे. १९२१ सालापासून दरवर्षी जवळजवळ ३९ ते ४० लाखांची देशांत भर पडत असल्यामुळे व त्यांतच सरासरी आयुर्मान फार कमी असल्यामुळे देशाच्या उत्पादनास मदत होण्याच्या ऐवजी देशावर पोषणाचा भार मात्र पडत आहे. जीवनकलह तीव्र होत

असल्यामुळे सर्वत्र असंतुष्टता दिसते. ह्या सर्व प्रश्नाचा सखोल अभ्यास फारच थोडया मंडळींनी केला असल्यामुळे सामान्य जनता ––जिला थोडा फार विचार करतां येतो अशी–– दिग्मूढ झाल्यासारखी दिसते. इकडे विचारवंत आपआपल्या परी उपाय सुचवीत असतात. अशा स्थितींत हा प्रश्न किती वादग्रस्त व व्यापक आहे हें सदरहू पुस्तक दाखवून देतें. ग्रंथकर्त्यांनी या विषयाच्या निरनिराळ्या अंगांचें फार मार्मिक परंतु कोणासही सहज समजेल अशा भाषेंत विवेचन केलें आहे, हा या पुस्तकाचा विशेष गुण समजला पाहिजे. लोकसंख्येच्या प्रश्नावर हिंदुस्थानांत व इतर देशांत इंग्रजी भाषेंतून जीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत त्या सर्वांचें योग्य परिशीलन करून लेखिकांनी आपलीं स्वतंत्र मतें दिलीं आहेत. मराठी भाषेंत हिंदी लोकसंख्येच्या प्रश्नावर लिहिलेलें हें पहिलेंच पुस्तक आमच्या अवलोकनांत आलें आहे.

आपल्या देशांतील सध्याची निकृष्ट आर्थिक परिस्थिति लक्षांत घेतां लोकसंख्या व संपत्ति ह्यांच्यांतील तोल अजीबात बिघडला असून दोहोंत तीव्रतर विषमता आढळून येते. हिंदुस्थानांतील मृत्यूचें इतर देशांच्या मानानें जास्त प्रमाण, त्यांतल्या त्यांत बालमृत्यु व मातांचे मृत्यु ह्यांचें अतिरिक्त प्रमाण, लोकांचा शिक्षण व कर्तबगारीच्या बाबतींत दिसून येणारा कनिष्ठ दर्जा व लोकांचें दारिद्र्य, हीं सर्व वरील सिद्धांतास पोषक आहेत. हा सिद्धांत, अगर दुसऱ्या शब्दांत बोलावयाचें म्हणजे संख्येची बेसुमार वाढ होत आहे हें मत, स्पष्टपणें लेखिकांनी प्रतिपादन केलें आहे.

पुस्तकाच्या शेवटल्या भागांत लोकसंख्येचा प्रश्न सोडविण्याकरितां, संख्या व संपत्ति ह्यांचें समीकरण होण्याकरितां, म्हणजे अर्थातच लोकांचा राहणीचा दर्जा सुधारण्याकरितां, सामाजिक नियोजन व आर्थिक नियोजन एकसमयावच्छेदेंकरून केलें पाहिजे असें सांगून ह्या दोनअंगी नियोजनाची रूपरेषा थोडक्यांत रेखाटली आहे. संपत्तीच्या वाढीबरोबर लोकांची कार्यक्षमता वाढावयास पाहिजे. त्याकरितां सार्वजनिक आरोग्य व शिक्षणप्रसार अवश्य आहे. किंबहुना सर्व जनतेचा जीवनावरील दृष्टिकोण अधिक उत्साही, सहेतुक व विचारी झाला पाहिजे हें कोणीही सुज्ञ मान्य करील. त्याबरोबरच बेसुमार वाढीला हितकारक नियंत्रण अवश्य आहे असें लेखिकांप्रमाणेंच आम्हांलाही वाटतें.

देशाची विस्कळीत आर्थिक घडी नीट घालण्याकरितां लोकसत्तात्मक पद्धति अमलांत यावयास पाहिजे हें खरें. परंतु केवळ राजकीय सुधारणा घडून आल्यानेच भागणार नाही, तर लोकसत्तेचा उपयोग देशाच्या हिताकरितां कशा रीतीनें करावयाचा हेंही समजावयास पाहिजे. त्याकरितां अशा ग्रंथांची समाजास आवश्यकता आहे. एकंदरींत हा ग्रंथ देशांतील सर्व सुशिक्षित स्त्रीपुरुषांनी वाचण्यालायक व मननीय झाला आहे यांत तिळमात्र संदेह नाही. सदरहू ग्रंथ समाजाला मार्गदर्शक होऊन जनतेमध्ये या प्रश्नासंबंधाने विशेष कळकळ निर्माण करील अशी आम्हांस फार आशा आहे.

**मुंबई**
३ एप्रिल १९३९

**श्री. गो. बेरी.**
**अर्थशास्त्राचे अध्यापक**
**सिडनहॅम कॉलेज, मुंबई.**

# निवेदन

लोकसंख्येचा प्रश्न ! किती अवघड विषय ! व किती रुक्ष ! अर्थशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ ह्यांच्यांतही ह्या विषयाबद्दल मतभेद आहेत. अशा विषयावर आमच्यासारख्यांनी प्रथमच प्रयत्न करणें म्हणजे मोठें धाष्ट्यर्याचेंच काम आहे. त्यांतच साधारणपणें आजकाल मराठी वाचकांची व लेखकांची प्रवृत्ति ललितवाङ्मयाकडे जास्त आहे. असें असतां मतामतांचे खांचखळगे असलेल्या, आंकडे व कोष्टकें ह्यांनी क्लिष्टपणा आणणाऱ्या अशा विषयाकडे आम्ही कां वळलों ?

हिंदी समाजाची अत्यंत शोचनीय स्थिति व त्यानें उत्पन्न झालेली बऱ्याच वर्षांची तळमळ हेंच वरील प्रश्नाचें उत्तर होय.

आज समाजापुढे असे अनेक राजकीय, समाजिक व आर्थिक प्रश्न आहेत की साधारण सुज्ञ मनुष्याला समजतील अशा तऱ्हेने ते मांडले गेले पाहिजेत व त्या प्रश्नांचें महत्त्व पटवून सर्वसाधारण जनतेंत जागृति उत्पन्न केली पाहिजे. जनताजनार्दनाला जागृत करण्याच्या प्रयत्नांत आपणही अल्प भाग घ्यावा अशी आमची दोघींची फार दिवसांची मनीषा होती. हिंदुस्थानच्या लोकसंख्येचा प्रश्न हा एक अतिशय जिव्हाळ्याचा प्रश्न असून तो जनतेने योग्य तऱ्हेने समजून घेतला पाहिजे. म्हणून ह्या प्रश्नाचें विवेचन जनतेपुढे मांडण्याचा प्रस्तुत प्रयत्न आहे. इंग्रजीमध्ये ह्या विषयावर बरींच पुस्तकें आहेत. परंतु त्या बहुतेकांत प्रश्नाची चर्चाच करण्यांत आली आहे; उपाययोजना सुचविण्यांत आलेली नाही. प्रस्तुत पुस्तकांत दोन्ही बाजूंचा विचार करून उपासमार टाळावयाची असेल तर नियोजनच कसें अवश्य आहे हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

विषयच असा आहे की, त्यांतून आकडे, कोष्टकें वगळतां येणें शक्य नाही. तरी सुद्धा आवश्यक तेवढींच कोष्टकें देऊन तीं आकृतींनी सुगम करण्याचा पुष्कळ वेळां प्रयत्न केला आहे.

पुस्तक लिहिण्याचें काम हातीं घेतल्यापासून कितीतरी हितचिंतकांनी आम्हांस मदत केली आहे. गुरुवर्य डॉ. घुरये व प्रो. बेरी ह्या दोघांनी आपुलकीच्या भावनेने आपला अमूल्य वेळ खर्चून आमच्या उपक्रमाला प्रोत्साहन दिलें व वेळोवेळीं उपयुक्त सूचना केल्या. त्यांतल्या त्यांत प्रो. बेरी ह्यांनी सर्व हस्तलिखित नजरेखाली घालून सुरवातीचा ' परिचय ' लिहून आम्हांस उपकृत केलें आहे.

नवभारत ग्रंथमालेच्या प्रकाशकांनी आपल्या मालेंतून पुस्तक प्रसिद्ध करण्याचें कबूल करून आमच्यावरील प्रकाशनाचा भार हलका केला आहे. पुस्तक लिहून पुरें झाल्या वेळेपासून तों प्रसिद्ध होईपर्यंत एक वर्षाचा अवधि लोटला आहे. दरम्यानच्या काळांत घडलेल्या गोष्टींचें समालोचन थोडक्यांत पुरवणीमध्ये दिलें आहे.

आमचीं सर्वच मतें सर्व लोकांस मान्य होतील अशी अपेक्षा नाही. एखादें मत पटत नसलें तरी हंसक्षीरन्यायाने पुस्तकाकडे पहावें व प्रश्नाचा स्वतंत्र ऊहापोह करावा हेंच जनतेजवळ मागणें!

**कृष्णाबाई कोल्हटकर**
**चंद्रकला हाटे**

# उपासमार की नियोजन ?

अर्थात्

# हिंदी लोकसंख्येचा प्रश्न

# उपोद्घात

" ज्या प्रश्नापासून कोणाही मनुष्याला सुटका नाही असा हा लोकसंख्येचा प्रश्न आहे. प्रत्येक कुटुंबाच्या आरोग्यावर व सुखावर तसेंच समाजाच्या प्रगतीवरही ह्या प्रश्नाचें स्वरूप परिणाम करतें. इतकेंच नव्हे तर जागतिक शांतताही ह्या प्रश्नावर अवलंबून असते."

—हॅरॉल्ड कॉक्स

" मानवी प्रगतीला जास्तींत जास्त हातभार लावणें हें जर राष्ट्राचें ध्येय असेल तर त्या प्रगतीचा कुशल मार्गदर्शक होण्यासाठी सर्वांगीण आणि सुसंगत अशा लोकसंख्याविषयक धोरणाची आवश्यकता आहे."

—रूटर

" हिंदुस्तानाच्या सर्व प्रश्नांमध्ये लोकसंख्येचा प्रश्न अत्यंत गंभीर स्वरूपाचा आहे. "

—बोले रॉबर्टसन् कमिटी रिपोर्ट १९३४

" जगाच्या आर्थिक व्यवस्थेंत आणि दृष्टिकोणांत फार मोठे बदल झाले आहेत व अजूनही होत आहेत. अशा ह्या जागतिक परिस्थितीमध्ये हिंदुस्तानांत एक मनःक्षोभ करणारा बदल घडून येत आहे. तो म्हणजे जितक्या जलदी लोकसंख्येची वाढ होत आहे, तितक्या जलदी उत्पन्नांत अगर उत्पादनांत वाढ होत नाही. "

—सर विश्वेश्वरय्या

प्रत्येक प्राण्यामध्ये स्वसंरक्षण आणि वंशविस्तार अशा दोन जबरदस्त प्रवृत्ति निसर्गाने ठेवल्या आहेत. ह्यांपैकी वंशविस्ताराची प्रवृत्ति त्या त्या प्राण्याचें जें अन्न त्याच्या मर्यादेनुसार नियंत्रित होते. तेव्हा अन्नाचा मर्यादित साठा आणि प्राण्यांची वाढती संख्या ह्यांमध्ये परस्परविरुद्ध रस्सीखेंचीचा प्रकार सतत चालू असतो. मनुष्य प्राणीही ह्या प्रकाराला अपवाद नाही. मानवसमाजामध्येही मर्यादित अन्नसामग्री आणि अमर्यादित प्रजावृद्धि ह्यांमध्ये समतोलपणा राखण्याचा प्रश्न हटकून उपस्थित होतो.

इतर प्राण्यांमध्ये आणि मनुष्य प्राण्यांत महदंतर असल्यामुळे मनुष्य प्राण्याच्या ह्या झगड्याला देशकालपरिस्थित्यनुसार भिन्न स्वरूप प्राप्त होतें. शिवाय मनुष्य हा इतर प्राण्यांप्रमाणे निसर्गाच्या सर्वस्वी स्वाधीन नाही, तर त्याने बऱ्याच अंशाने निसर्गावर ताण केली आहे. तथापि अखेर त्याच्याही विस्ताराला मर्यादा आहेच. म्हणून त्याच्याही बाबतींत समतोलपणा राखण्याचा प्रश्न उपस्थित झाल्यावाचून राहत नाही. इतकेंच की, परिस्थितीवर प्रत्याघात करण्याच्या त्याच्या प्रयत्नाने ह्या प्रश्नाचें स्वरूप अधिक गुंतागुंतीचें होतें.

ब्रह्मदेशासहित हिंदुस्थानाचा विचार केला तर त्याचा विस्तार जवळ जवळ लहानशा खंडायेवढा आहे. जगाच्या पाठीवरील मनुष्य वस्तीपैकी एक पंचमांश वस्ती एवढया देशांत समावलेली आहे. राजकीय व आर्थिक हितसंबंधाने एकत्रित असलेल्या एवढया थोरल्या जनसमूहापुढे हा लोकसंख्येचा प्रश्न येणें केव्हाही स्वाभाविक आहे. कारण मनुष्याला इतर प्राण्यांप्रमाणे कसेंबसें जीवन कंठावयाची इच्छा नसते, तर शक्यतों आपलें जीवित सुखमय व्हावें ह्यासाठी त्याची सारखी धडपड चालू असते. अर्थात् लोकसंख्येच्या प्रश्नाला व्यापक स्वरूप प्राप्त होतें. तसें पाहिलें तर हिंदी लोकसंख्येचा प्रश्न बरेंच गंभीर स्वरूप धारण करतो. कारण हिंदी जनतेच्या बाबतींत अनेक प्रतिकूल

गोष्टी आहेत. राजकीय परतंत्रतेमुळे समाजाचें भवितव्य ठरविण्याची सत्ता लोकांच्या हातीं नाही. आर्थिक हितसंबंधही बहुतेक परस्वाधीन असल्यामुळे देश आर्थिकदृष्ट्या मागासलेला राहिलेला आहे. शिक्षणाचीही तीच गत आहे. ह्या सर्व प्रतिकूल गोष्टींमुळे लोकसंख्येचा प्रश्न अधिक तीव्र स्वरूपाचा होत आहे.

जगांतील प्रमुख राष्ट्रांच्या मानाने लोकसंख्या, क्षेत्रफळ, दर चौरस मैलास लोकांचें प्रमाण, दरमाणशीं सरासरी उत्पन्न वगैरे बाबतींत आमच्या देशाची स्थिती कशी आहे हें ठोकळ मानाने खालील कोष्टकावरून दिसून येईल.

**कोष्टक पहिलें. जागतिक राष्ट्रांत हिंदुस्थानचा दर्जा दाखविणारें.**

| देश | वर्ष | क्षेत्रफळ चौरस मैल हजार | लोकसंख्या लक्ष | दर चौरस मैलास लोकांचें प्रमाण | दर माणशीं सरासरी वार्षिक उत्पन्न |
|---|---|---|---|---|---|
| हिंदुस्थान | १९३१ | १८,०८ | ३५,२८ | १९५ | |
| ब्रिटिश हिंदुस्थान | ,, | १०,०९ | २७,१५ | ३२१ | ५८* |
| युनायटेड् किंगडम | ,, | ९४ | ४,६१ | ४९० | १,०९२ |
| अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें | १९३० | ३६,८५ | १२,२८ | ३३ | २,०५३ |
| कानडा | १९३१ | ३५,१० | १,०३ | २ | १,२६८ |
| जर्मनी | १९३० | १,८० | ६,४७ | ३५७ | ५२०† |
| जपान | १९३१ | १,४७ | ६,५३ | ४४३ | २७१ |
| सोव्हिएट रशिया | १९२५ | ८२,४० | १६,८० | २० | २९३ |
| ईजिप्त | १९२८ | ३,८५ | १,४० | ३६ | २८० |

* फिंडले शिरास ह्यांचा १९३२ सालचा अंदाज.

दर माणशीं उत्पन्न १९२५ सालचें आहे.

वरील कोष्टकांत पहिली ठळक गोष्ट दिसून येते ती ही की, आठ बलाढ्य राष्ट्रांपेक्षा, किंबहुना एकट्या चीनखेरीज इतर सर्व राष्ट्रांपेक्षा, ह्या देशांत लोकांची संख्या अधिक आहे. आणि दरमाणशीं सरासरी उत्पन्न अगदी कमी आहे. तसेंच ब्रिटन, जर्मनी, जपान आदिकरून उद्योगप्रधान राष्ट्रांपेक्षा दर चौरस मैलास लोकांचें प्रमाण कमी असलें तरी संयुक्त संस्थानें, कानडा, रशिया इत्यादि देशांच्या मानाने व ईजिप्तसारख्या शेतकीप्रधान राष्ट्राच्या मानानेही तें बरेंच अधिक आहे. म्हणजे जगांतील मनुष्यसंख्येपैकी एक बराच मोठा समूह एका राजकीय छत्राखाली अतिशय दाटीने व फारच थोडया उत्पन्नांत राहत आहे. अशा परिस्थितींत संख्या व उत्पादन ह्यांतील समतोलपणा बिघडून त्यांतून उपासमारीचा प्रश्न उपस्थित होतो की काय, हें पुढील प्रकरणांत पाहावयाचें आहे. इतकेंच नव्हे तर निव्वळ जगणें एवढेंच मनुष्याचें ध्येय नसल्यामुळे लोकसंख्येच्या प्रश्नाला बरेंच व्यापक स्वरूप प्राप्त होतें. तेव्हा शक्यतों सर्व बाजूंनी ह्या प्रश्नाचा विचार करण्याचा हा प्रयत्न आहे.

प्रथमतः प्रश्नाच्या सर्व बाजू रेखाटण्याकरितां लोकसंख्येची वाढ ह्या देशांत कसकशी होत गेली हें दाखवून एकंदरींत इकडील लोकांची काय स्थिति आहे हें तुलनात्मक रीत्या दाखवून दिलें आहे. नंतर ह्याच प्रश्नाबाबत आवश्यक इतकी आर्थिक परिस्थिति दिग्दर्शित केली आहे. त्यांतून उपासमारीचा प्रश्न कसा उपस्थित होतो आणि त्याकरितां सर्व बाजूंनी नियोजन कसें करावें लागेल हें शेवटीं दाखवलें आहे.

प्रस्तुत प्रश्नाचें वास्तविक महत्त्व किती आहे हें सुरवातीस दिलेल्या उताऱ्यांवरून दिसून येतेंच. हा प्रश्न सद्यःस्थितींत गंभीर रूप धारण करीत असून तो एका विशिष्ट प्रांताचा अगर ज्ञातीचा नाही, तर अखिल देशाचा आहे. एखाद्या प्रांतांत अगर ज्ञातींत तो थोडया-

बहुत निराळ्या स्वरूपांत प्रगट होईल. पण सामान्यतः त्याचें स्वरूप सर्वसाधारण आहे, म्हणून आम्ही सर्व हिंदुस्थान हें क्षेत्र विचारासाठी शक्यतों स्वीकारलें आहे. त्यांतून ब्रह्मदेश वगळण्याची आमची इच्छा असूनही तसें करणें शक्य झालें नाही. तसेंच अपुऱ्या माहितीमुळे कांही संस्थानांचा समावेश करतां आला नाही. तरी ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें ह्यांची परिस्थिति जवळजवळ सारखीच असल्यामुळे प्रस्तुत पुस्तकांतील विवेचन सबंध हिंदुस्थानास लागू पडतें असें म्हणावयास कांही हरकत नाही. सबंध देशाचें विस्तृत क्षेत्र घेण्याचें दुसरें व महत्त्वाचें कारण म्हणजे सुसंगत व संघटित अशा एकसूत्री धोरणाची नियोजन करतांना आवश्यकता आहे हें होय. तरी प्रश्नाचें गांभीर्य लक्षांत येऊन नियोजनाची आवश्यकता पटेल अशी अपेक्षा करून हा उपोद्घात येथे पुरा करतों.

---

## प्रकरण पहिलें

# वाढ

**खानेसुमारी.** सतराव्या शतकापासून पाश्चात्य राष्ट्रांत खानेसुमारी करण्यास सुरवात झाली होती. खानेसुमारींत संख्येच्या नोंदीशिवाय स्त्री–पुरुष, जनन–मृत्यु व व्यवसाय ह्यांचें प्रमाण वगैरे अनेक प्रकारची जी माहिती गोळा करण्यांत येते त्यायोगें समाजाची विविध प्रकारची स्थिति दिग्दर्शित होते. सुरवातीस सर्वसाधारण लोकांना ह्या माहितीची उपयुक्तता न वाटल्यामुळे त्यांच्याकडून अपुरी व चुकीची माहिती देण्यांत येत असे. तथापि जसजसा समाज शिक्षित होऊं लागला तसतशी माहिती जास्त विश्वासार्ह मिळूं लागली. पाश्चात्त्य राष्ट्रांत जर ही स्थिति होती तर ज्या हिंदुस्थानांत फक्त शेंकडा आठ लोक साक्षर आहेत तेथील माहिती अपुरी व चुकीची असल्यास नवल नाही. जननमृत्यूच्या नोंदींत तर वीस टक्के चुका असाव्या असें १९३१ च्या खानेसुमारीच्या मुख्य अधिकाऱ्याचें म्हणणें आहे. माहिती पुरी व बिनचूक नसली तरी जे आकडे उपलब्ध आहेत त्यावरून वस्तुस्थितीवर बराच प्रकाश पडतो.

**जागतिक वाढ.** खानेसुमारीच्या पूर्व कालाविषयीं जी ऐतिहासिक माहिती उपलब्ध आहे तीवरून सुद्धा संख्याबल साधारणपणें अजमावतां येतें. सतराव्या शतकाच्या मध्यापासून ते १९३२ पर्यंत २८० वर्षांच्या कालांत जगाच्या लोकसंख्येची वाढ जवळ जवळ चौपटीनें झाली आहे. अशी वाढ जगाच्या इतिहासांत पूर्वी केव्हाही झाली नव्हती असें कार सॉंडर्सचें मत आहे. ही वाढ निरनिराळ्या वर्णांच्या लोकांची सम प्रमाणांत झाली असें मात्र नाही. साधारणपणें

वर्णानुसार जगांतील लोकांचे पांच गट करण्यांत येतात. वाढीमध्ये अनुक्रम लावला तर पहिला नंबर श्वेतवर्णीयांचा, त्यानंतर पीत व पिंगट वर्णाचे (हिंदी लोक ह्या वर्णांतच साधारणपणें येतात) लोक येतात. मग रक्तवर्णीय आणि शेवटीं काळया वर्णाचे लोक येतात. दहा कोटींवरून ७२ कोटी संख्या झाल्यामुळे श्वेतवर्णीयांची वाढ सात पटीने झाली आहे तर हिंदवासीयांची वाढ अडीच पटीने झाली आहे. काळया वर्णाची वाढ इतरांच्या मानाने बरीच कमी झाली आहे. कारण त्यांचें एकंदर संख्येशीं प्रमाण $\frac{१}{५}$ वरून $\frac{१}{१५}$ वर आलें आहे. यावरून संख्याबलाने श्वेतवर्णीय कसे आघाडी मारीत आहेत हें दिसून येईल.

**श्वेतवर्णीयांची वाढ.** श्वेतवर्णीयांची वाढ इतक्या झपाटयाने होण्याचें कारण त्यांच्यांतील मृत्युसंख्येच्या प्रमाणाची घट हें होय. व १८८० पर्यंत जननसंख्येच्या प्रमाणाचीही वाढ सारखी होत होती. जनन व मृत्यु ह्या दोहोंमधील अंतर ज्या प्रमाणाने जास्त होतें, त्या प्रमाणाने लोकसंख्येची वाढ होते. हें अंतर दोन प्रकाराने पडणें संभवनीय असतें. अधिक जननसंख्या व अधिक मृत्युसंख्या किंवा कमी जननसंख्या व कमी मृत्युसंख्या पण अंतर जवळ जवळ सारखेंच असे हे दोन प्रकार संभवतात. हिंदुस्थानच्या बाबतींत पहिल्या प्रकारची स्थिति दिसून येते, हें आपण पुढील प्रकरणांत जेव्हा जननमृत्यूच्या प्रमाणांचें पृथक्करण करूं तेव्हा दिसून येईल. पुढारलेल्या राष्ट्रांत जी वाढ होते ती दोहोंचेंही प्रमाण कमी झाल्यामुळे होते. एकंदरीने आरोग्यदायक राहणी आणि पूर्वीच्या मानाने शांततेचें जीवन ह्यांमुळे युरोपांत मृत्युसंख्येची घट झाली आणि ह्याच काळांत अमेरिका, ऑस्ट्रेलिया, आफ्रिका वगैरे ठिकाणीं नूतन प्रदेशांचा शोध लागल्यामुळे व आर्थिक सुबत्तेमुळे जननसंख्येची वाढ गेल्या शतकाच्या $\frac{३}{४}$ काळांत झाली. परंतु त्याचबरोबर देशान्तर हें एक जबरदस्त कारण वाढीवर परिणाम करूं लागलें. युरोपांतील प्रवाह ह्या नूतन प्रदेशांत जाऊं लागला त्यामुळे या देशांतील वाढ नव्या देशां-

तील वाढीच्या मानाने कमी होऊं लागली. १८२१ ते १९३२ च्या १११ वर्षांत ५ कोटी लोकांनी वरील ठिकाणीं स्थलांतर केलें. एकटया इंग्लंड-मधून तितक्याच वर्षांत २ कोटी लोक बाहेर पडले. अमेरिकेमध्ये दरवर्षी साधारणपणें सात लाख लोक येत होते. मिळून श्वेतवर्णीयांची झालेली वाढ कशी जगभर पसरत चालली आहे हें दिसून येईल.

**वाढीचीं कारणें.** जननमृत्यूच्या प्रमाणामुळे आणि देशान्तरामुळे वाढीवर कसकसा परिणाम झाला हें गेल्या ५० वर्षांतील निरनिराळ्या राष्ट्रांच्या वाढीचें प्रमाण पाहिलें म्हणजे जास्त विशद होईल.

**कोष्टक दुसरें १८८१ ते १९३१ पर्यंत झालेली वाढ.**

(१८८१ सालची लोकसंख्या १०० धरल्यास १९३१ पर्यंत झालेली वाढ किती भरेल हें पुढील आकडयांनी दर्शविलें आहे.)

| | | | |
|---|---|---|---|
| कानडा | २२० | ग्रेट ब्रिटन | ५४ |
| संयुक्त संस्थानें | १८६ | इटली | ४६ |
| ऑस्ट्रेलिया | १३० | जर्मनी | ४२ |
| ईजिप्त | ७४ | हिंदुस्थान | ३९ |
| जपान | ७४ | फरान्स | ११ |

**वसाहतींची वाढ.** गेल्या पन्नास वर्षांत नव्या वसाहतींच्या राष्ट्रांची वाढ युरोपिअन राष्ट्रांपेक्षा जास्त झाली आहे. नव्या प्रदेशांत युरोपमधील लोक गेले म्हणून हें विषम प्रमाण असावें हें खरें, पण त्याचबरोबर पन्नास वर्षांपूर्वीपासून म्हणजे १८८० सालापासून इंग्लंडमध्ये व त्यानंतर सर्व युरोपखंडांत जननसंख्येचें प्रमाण कमी होऊं लागलें. फ्रान्स व आयर्लंड ह्या दोन देशांमध्ये १९ व्या शतकापासूनच जननसंख्येचें प्रमाण कमी झालें. म्हणून वरील कोष्टकांत फ्रान्सची संख्या सर्वांत कमी वाढलेली दिसते. हल्ली म्हणजे ह्या शतकाच्या सुरवातीपासून नव्या वसाहतींत सुद्धा पूर्वीच्या मानाने जननसंख्या कमी होऊं लागली आहे.

**हिंदुस्थानची वाढ.** नवीन वसाहतींच्या मानाने तर राहोच परंतु युरोपिअन राष्ट्रांप्रमाणे अगर जपान-ईजिप्तच्या मानाने हिंदुस्थानची वाढ झालेली नाही. १६५० मध्ये, म्हणजे अकबराच्या वेळीं, हिंदुस्थानची लोकसंख्या १० कोटि असावी असें मॅकमुल्ला म्हणतो. नंतर १८७१ सालीं जेव्हा ब्रिटिश सरकारने पहिली खानेसुमारी घेतली तेव्हा ती २० कोटि असलेली आढळून आली. तदनंतर ती दर शतकांत कसकशी वाढत गेली हें पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

**कोष्टक तिसरें. १८७२ ते १९३० पर्यंत अखिल हिंदुस्थानांतील लोकसंख्येची झालेली वाढ.**

| वर्षाचा काल. | दशकाच्या सुरवातीस लोकसंख्या. | दशकांत लोकसंख्येची एकंदर वाढ. | वाढीची कारणे | | खरी वाढ. | दशकांतील खऱ्या वाढीचें सरासरी शेंकडेवारी प्रमाण. |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | नवीन प्रदेशांचा अंतर्भाव. | पद्धतीची सुधारणा. | | |
| १८७२–१८८१ | २०·६२ | ४·७७ | ३·३ | १·२ | ·२७ | १·५ |
| १८८१–१८९१ | २५·३९ | ३·३४ | ·५७ | ·३५ | २·४२ | ९·६ |
| १८९१–१९०१ | २८·७३ | ·७१ | ·२७ | ·०२ | ·४२ | १·४ |
| १९०१–१९११ | २९·४४ | २·०८ | ·१८ | ... | १·९० | ६·४ |
| १९११–१९२१ | ३१·५२ | ·३७ | ·०१ | ... | ·३६ | १·२ |
| १९२१–१९३१ | ३१·८२ | ३·३९ | ... | .... | ३·३९ | १०·६ |
| १९३१ | ३५·२८ | ... | ... | ... | ... | ... |
| १८७२–१९३१ | ... | १४·६६ | ४·३३ | १·५७ | ८·७६ | ३०·७ |
| १९३६ (अंदाजी) | ३७ | | ... | ... | ... | ... |

**१८७१ ते १९३१.** १८७१त वीस कोटि लोकसंख्या होती ती १९३१ सालीं ब्रह्मदेश व संस्थानें मिळून ३५ कोटि झाली आहे. ह्यामध्ये १९३१ पर्यंत सारी ८ कोटींची खरी वाढ झाली आहे. इतर देशांच्या मानाने इतकी कमी वाढ होण्याचें कारण मृत्युसंख्येच्या

प्रमाणांत घट झाली नाही हें होय. १९२१ सालापासून तों १९३६ सालापर्यंत मात्र जरा विशेष प्रमाणांत वाढ झाली आहे. ह्या १५ वर्षांतच ५ कोटी वाढ झाली आहे आणि पुढील ५ वर्षांत मृत्युसंख्येंत वाढ झाली नाही तर आणखी ३ कोटींची भर पडेल असें तज्ज्ञांचें मत आहे. १९२१ ते १९३१ च्या दहा वर्षांत जी तीन कोटींची वाढ झालेली खात्रीदायक समजते तीच हिंदुस्थानच्या दुप्पट क्षेत्रफळ असणाऱ्या कानडा देशांतील लोकसंख्येच्या तिपटीने आहे. किंवा स्पेन, पोलंड व ऑस्ट्रिया या देशांच्या लोकसंख्येपेक्षाही जास्त आहे. तेव्हा अलीकडील ही वाढ देशांतील समतोलपणा बिघडविते की काय हा एक प्रश्न आहे व त्याचा विचार सर्व परिस्थिति दिग्दर्शित झाल्यानंतर करण्यांत येईल.

**वाढीचें विषम प्रमाण.** १८७२ सालापूर्वी लोकसंख्येची वाढ फार झपाट्याने होत नव्हती. ह्याचें मुख्य कारण देशांतील अनिश्चित राजकीय परिस्थिति व लढाया हें होय. ब्रिटिश अमदानीपासून राजकीय एकछत्रीपणा व शांतता प्रस्थापित झाल्यामुळे मृत्युसंख्या वाढण्याचें युद्ध हें एक कारण नाहीसें झालें. दुसरें कारण म्हणजे पूर्वकालीं पडलेले दुष्काळ हें होय. ज्या प्रांतांत दुष्काळ पडत तेथे दळणवळणाच्या साधनाभावीं एकदम पुष्कळ लोक मृत्युमुखीं पडत असत. दुष्काळाच्या बाबतींत थोडी फार ती स्थिति ब्रिटिश अमदानींतही प्रस्तुत शतकाच्या प्रारंभापर्यंत होती आणि त्याचा व त्याच्या अनुषंगाने येणाऱ्या रोगराईचा परिणाम लोकसंख्येच्या वाढीवर झाला. पण ही स्थिति १९२१ पासून थोडी सुधारली आहे. कारण तेव्हापासून मृत्युसंख्येची थोडी घट झाली आहे व त्यामुळे वाढ झपाट्याने होत आहे. तथापि गेल्या पन्नास वर्षांतील भिन्न भिन्न दशकांतील वाढीची जर परस्पर तुलना केली तर जी वाढ झाली ती विषम प्रमाणांत झाली आहे असें दिसून येतें. वाढीचें असें विषम प्रमाण हें याच देशाचें वैशिष्टय आहे असें कार सॉंडर्सही म्हणतात.

आकृति १ वरून हिंदी लोकसंख्येची वाढ कमी अधिक होते हें उघड दिसतें. अशी कमीअधिक वाढ कसकशी होत गेली हें प्रत्येक दशकांतील इतिहास पाहिला म्हणजे लक्षांत येतें.

**वाढीचें विस्तृत विवेचन : १८७२–८१.** १८७२–८१च्या पहिल्या दशकांत खरी वाढ २७ लक्षांनी झाली. इतकी कमी वाढ होण्याचें कारण दक्षिणेंत व विशेषेंकरून मद्रास इलाख्यांत १८७६–७८ चा पडलेला दुष्काळ हें होय. मद्रासशिवाय मुंबई, म्हैसूर, वायव्य सरहद्दप्रांत येथेही हा दुष्काळ जाणवला. दुष्काळाचा परिणाम वाढत्या मृत्युसंख्येनेच दिसून येतो असें नसून त्यामुळे जननसंख्याही कमी होते. " दुष्काळाच्या दोन वर्षांत मुख्यत्वें मद्रासमध्ये व इतरही दुष्काळग्रस्त प्रांतांत पूर्वीपेक्षा कमी बालकें जन्मास आलीं असें उघड दिसून येतें."*

**१८८१ ते १८९१.** दुष्काळ वगैरे कोणतीही आपत्ति न आल्यामुळे ८१–९१ चें दशक दोन कोटी बेचाळीस लक्षांची वाढ दाखवितें. दुष्काळाच्या व रोगराईच्या काळांत म्हातारीं माणसें व लहान मुलें जास्त दगावतात त्यामुळे पुढील दशकांत संतत्युत्पादन-क्षम अशा तरुण लोकांची संख्या जास्त असते म्हणून जननसंख्या वाढून लोकसंख्येंत भर पडते. मद्रासमध्ये मागल्या दशकांत २५ टक्के लोक घटले तेथेच ह्या शतकांत १५ टक्यांनी वाढले.

**१८९१ ते १९०१.** मागली समाधानकारक वस्तुस्थिति ह्या दशकांत टिकणारच नाही असें १८९१ च्या खानेसुमारीचे कमिशनर मि. बेन्स ह्यांनी भविष्य वर्तविलें होतें व तें खरें ठरलें. एकंदरींत हिंदुस्थानांत ह्या दहा वर्षांत तीन वेळां दुष्काळ पडले आणि ते एकापेक्षा एक वरचढच ठरले. पहिल्या वर्षाच्या सुरवातीसच

---

* १८८१ चा खानेसुमारीचा अहवाल.

म्हणजे १८९१ ते ९२ त पडलेल्या दुष्काळांत मद्रास, मुंबई, अजमीर, मेवाड, बिहार, बंगाल व ब्रह्मदेश येथे सर्वत्र मेघराजाची अवकृपा झाली. अर्थात् दुष्काळाचे सर्व परिणाम ह्या प्रांतांना भोगावे लागले. तदनंतर तीन वर्षे लोटतात न लोटतात तोंच १८९५ त दुसरा दुष्काळ पडला. वरील प्रांतांपैकी बहुतेक प्रांतांना व शिवाय बुंदेलखंड, वायव्यसरहद्द प्रांत, मध्यप्रांत वगैरे प्रांतांनाही त्याने व्यापलें. जवळ जवळ सात कोटी लोकांना दुष्काळाचा त्रास भोगावा लागला. ह्या दुष्काळाच्या पाठोपाठ १८९९–१९०० चा दुष्काळ पडला. हा इतका मोठा होता की त्याने सर्व देश व्यापला. "गेल्या २०० वर्षांत विस्ताराने आणि तीव्रतेने इतका मोठा दुष्काळ पडला नव्हता." असें सर जॉन इलियट यांनी म्हटलें आहे.* ह्या दोन्ही दुष्काळांत मिळून जवळ जवळ ५० लाख लोक मृत्युमुखीं पडले. ह्याच काळांत प्लेगने पण हिंदुस्थानांत प्रवेश केला व जवळ जवळ १० लाख लोक स्वाहा केले, तरी एकंदरींत वाढ ४२ लक्षांनी झाली.

**१९०१ ते १९११.** हें दशक मागल्याप्रमाणे वाईट गेलें नाही. कांही कांही भागांत थोडें अवर्षण पडलें. प्लेग, मलेरिआ वगैरे रोगांनी ६० लाख बळी घेतले; तथापि लोकसंख्येंत १ कोटि ९० लक्षांची भर पडली.

**१९११ ते १९२१.** पुढील दशक म्हणजे १९११ ते २१. ह्याचा इतिहास मागल्याच्या उलट आहे. ह्याच दशकांत महायुद्ध झालें आणि त्याचा परिणाम जागतिक लोकसंख्येवर झाला. परंतु आमच्या लोकसंख्येवर त्याचा कांही प्रत्यक्ष परिणाम फारसा झाला नाही. ह्याच काळांत १९१७–१८ सालीं प्रथम दुष्काळ पडला आणि नंतर इन्फ्लुएंझा आला. आतापर्यंत प्लेगने जितके बळी घेतले नव्हते

* सर जॉन इलिएट–रणदिव्यांच्या 'हिंदुस्थानचा लोकसंख्येचा प्रश्न' (पान ६९) ह्यांतून उद्धृत.

तितके इन्फ्लुएंझाने एका तडाक्यांत घेतले. एकंदरींत सव्वा कोट लोक मृत्युमुखीं पडले. खेडयापाडयांतून कांही ठिकाणीं हजारीं ६० असें मृत्युसंख्येचें प्रमाण होतें. ह्या भयंकर रोगाने एका सपाटयांत एक तिसांश इतकें प्रमाण कमी केलें. युरोपमध्ये पण ह्याच दिवसांत इन्फ्लुएंझा फैलावला होता पण तिकडे त्याने इतके बळी घेतले नाहीत. ह्याचें कारण तिकडील लोकांची आरोग्यदायक राहणी आणि त्यामुळे वाढलेली रोगप्रतिरोधक शक्ति व त्याचबरोबर सशास्त्र उपाययोजना हें होय. असो. तेव्हा या शतकांत सारी ३६ लक्ष वाढ झाली.

**१९२१ ते ३१.** पुढील २१ ते ३१ चें दशक अगोदर म्हटल्याप्रमाणें बरीच वाढ दाखवितें. दुष्काळ अगर कोणताही साथीचा रोग मोठया प्रमाणांत न आल्यामुळे मृत्युसंख्येची घट झाली व शेकडा १०·६ प्रमाणाने लोक वाढले. ह्या वाढीबद्दल खानेसुमारीचे कमिशनर डॉ. हटन यांनी पुढील उद्गार काढले आहेत. "ही वाढ अनेक दृष्टया समाधानाचें सूचक नसून भीतीचें द्योतक आहे."*

१९३१ पुढील चालू दशकांत मागल्या दशकाचें वाढीचें प्रमाण कायम राहील असें वाटतें. १९२१ ते १९३३ पर्यंत शेकडा १३ ने वाढ झाली आहे. अशा रीतीने दरवर्षी समाजाच्या संख्येंत पडणाऱ्या ३९ लक्षांच्या भरीनेच विचार करण्यासारखा प्रश्न उपस्थित होत आहे!

**परकीयांची संख्या.** ही जी वाढ होत आहे ती आमच्याच देशांतील लोकांची होत आहे की संयुक्त संस्थानें, कॅनडा वगैरे प्रमाणे आमच्या देशांत परदेशस्थ आल्यामुळे होत आहे असा एक प्रश्न निघतो. पण १९३१ च्या गणतींत ७ लक्ष ३० हजार इतकेच परदेशस्थ लोक आढळून आले. त्यांपैकी बहुतेक आशिया खंडांतून आलेले आहेत. युरोपियनांची संख्या १ लक्ष १८ हजार इतकी

* खानेसुमारी रिपोर्ट १९३१.

आहे. एकंदरीने ३५ कोटि संख्येच्या मानाने ही ७ लक्षांची परदेशी-यांची संख्या गौण आहे.

**परदेशस्थ हिंदी लोकांची संख्या.** हल्ली परदेशांत राहणाऱ्या हिंदी लोकांची संख्या अवघी ३० लक्ष आहे. त्यांपैकी २३ लक्ष ब्रिटिश साम्राज्यांतच आहे. हिंदुस्थानच्या जवळच्या मलाया व सिलोन ह्या प्रांतामध्ये रबर व चहाच्या मळ्यांत किंवा टिनच्या खाणींत मजूर म्हणून काम करावयास हिंदी लोक जात असत, पण सध्याच्या मंदीमुळे व राष्ट्रीयत्वाच्या भावनेमुळे हिंदी मजूर त्यांना नकोसे झाले आहेत. जवळ जवळ ७० हजार लोक तेथून परत आले आहेत. इतकेंच काय, पण तिकडील सरकारच्या मागणीनुसार हिंदुस्थान सरकारने १९३० पासून हिंदी लोकांच्या बहिर्गमनावर नियंत्रण घातलें आहे. हल्लीच्या सुधारणा कायद्याने ब्रह्मदेश वेगळा करण्यांत आला आहे आणि १९३६ च्या करारानुसार दोहोंमधील देशांतर नियंत्रित करण्यांत आलें आहे. मिळून हिंदुस्थानच्या सध्याच्या चतुःसीमेबाहेर हिंदी लोकांना देशांतर करण्यास जागा नाही.

**परप्रांतीय लोक.** परदेशांत जाण्यास मार्ग नाही. पण हिंदुस्थानांतील प्रांताप्रांतांतच कांही सवड निघण्यासारखी आहे काय ? असा एक प्रश्न उद्भवतो; पण त्याचें नकारार्थींच उत्तर द्यावें लागेल. एक तर आसामखेरीज इतर प्रांतांत गर्दीच आहे; त्यामुळे जाण्यास वावच नाही. आसामचीही परिस्थिति आकर्षक नाही. त्यामुळे तेथेही जाण्यास कोणी तयार नसतात. शिवाय स्थानप्रियतेमुळे व जातिभेदामुळे आपला प्रदेश सोडून न जाण्याची प्रवृत्ति विशेष दिसून येते. ३५ कोटींपैकी अवघे १० लक्ष लोक परप्रांतांत आढळून आले. ह्यावरून अंतर्गत हालचाल फारशी होत नाही व करण्यासही फारशी सवड नाही.

**संख्याबलाची जरूरी.** देशाच्या विशिष्ट परिस्थितींत वेळेला संख्याबलाची जरूरी वाटावयास लागते. राजकीय महत्त्वाकांक्षे-

करितां आपल्या देशांतील लोकसंख्येची वाढ व्हावी असे प्रयत्न करण्यांत येतात. सध्या जर्मनी व इटली ह्यांनी आपली प्रजा वाढावी म्हणून जननसंख्या वाढविण्याचे प्रयत्न कसोशीने चालविले आहेत. उदाहरणार्थ, जास्त मुलें असणाऱ्या आईबापांना कमी कर भरावे लागतात, पारितोषकें मिळतात. अशा अनेक मार्गांनी जननसंख्या एक दोन वर्षांत वाढविली आहे. त्याचबरोबर प्रजा सुदृढ निपजेल असेही प्रयत्न वरील देशांतून करण्यांत येतात, हें विशेष आहे. रशियाला आपल्या विस्तीर्ण प्रदेशाची आर्थिक भरभराट करण्याकरितां अधिक लोकसंख्या पाहिजे. पण तशीं दोनही प्रकारचीं कारणें हिंदुस्थानच्या बाबतींत दिसत नाहीत. हिंदुस्थानचें संरक्षण करण्याकरितां आहे त्याच संख्येचा उपयोग केला जात नाही. आर्थिक उन्नतीकरितां आणखी लोकांची जरूरी आहे की काय ह्याचा विचार पुढील कांही प्रकरणांत करावयाचा आहे. त्याचा निष्कर्ष नकारार्थी निघाल्यास व सध्याच्या क्षेत्रफळाच्या आणि राष्ट्रीय उत्पन्नाच्या मानाने हल्लीच्या संख्येंत भर पडत गेल्यास देशांतराच्या अभावीं लोकसंख्येच्या प्रश्नाचा बिकटपणा वाढण्याचा संभव आहे. तथापि ही वाढ ज्या जननमृत्यूच्या प्रमाणावर अवलंबून आहे त्याचा विचार प्रथमतः पुढील प्रकरणांत करूं.

---

## प्रकरण दुसरें

# पृथक्करण

**जनन-मृत्यूचें प्रमाण.** १९२० सालापर्यंत विषम प्रमाणांत झालेली लोकसंख्येची वाढ त्या सालानंतर आतापर्यंत तरी सारख्या प्रमाणांत होत आहे व त्यामुळे एक प्रकारें विचारार्ह प्रश्न उद्भवतो, असें मागील प्रकरणांत दिसून आलें. तसेंच हिंदी लोकसंख्येच्या

बाबतींत देशांतराचा भाग फारसा महत्वाचा नाही असेंही आढळून आलें; ही वाढ ज्या जननमृत्यूच्या प्रमाणावर मुख्यतः अवलंबून असते त्याचा विचार ह्या प्रकरणांत करावयाचा आहे.

हिंदी जननमृत्यूचें १८८५ सालापासून १९३४ पर्यंतचें प्रमाण आकृति नं. २ देते. त्याचबरोबर आकृति नं. ३ निरनिराळया देशांतील तेंच प्रमाण दाखविते. दोनही आकृतींचा तुलनात्मक विचार करतां कांही गोष्टी स्पष्टपणें दिसून येतात. आ. नं. ३ मधील जनन-मृत्यूचें प्रमाण निश्‍चितपणें कमी होत आहे असें आढळून येतें. पण हिंदी जननमृत्यूचें प्रमाण सारखीं आंदोलनें घेत आहे असें दिसून येईल. इतकेंच नव्हे तर ह्या दोहोंत संबंध असावा असेंही वाटतें. १९१० मध्ये, तसेंच १९२२ ते १९३० पर्यंत जननसंख्या जास्त होती. पण तेंच १८९१, ९७, १९००–०१ आणि १९१८–१९ ह्या वर्षांत जननापेक्षा मृत्युसंख्या जास्त होती. पहिल्या काळांत संख्येची वाढ झाली आहे तर दुसऱ्यांत ती घटली आहे.

**जननसंख्येच्या प्रमाणाची तुलना.** जननसंख्येच्याच रेषे-कडे पाहिलें तर ती रेषा हजारीं ३० ते ४२ ह्या दरम्यान हेलकावे खात आहे असें दिसतें. अगदी दोन टोकें सोडून दिलीं तर गेल्या ५० वर्षांत साधारणपणें हिंदी जननाचें प्रमाण हजारीं ३५ जवळ असतें. तेंच इंग्लंड व वेल्समध्ये १८८५ सालीं हजारीं ३५ जवळ होतें. पण १९३४ सालीं १४ वर आलें आहे. फ्रान्समधीलही तेंच आहे. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील जननसंख्येच्या रेषेनेही जवळ जवळ इंग्लंडच्या इतकेंच प्रमाण दाखविलें आहे.

जपानची जननसंख्या १९२० सालीं ३५ वर गेली ती १९२८ सालापासून कमी कमी होत १९३५ च्या सालीं ३० च्या खाली आली आहे. अगदी अलीकडील १९३३ सालांतील निरनिराळया देशांतील जननसंख्येचे आकडे खालील कोष्टकांत दिले आहेत; तसेंच

१९२६ ते ३० मधील सरासरी आकडेही दिले आहेत. ते काय दाखवितात तें पाहूं.

**कोष्टक चवथें. जननसंख्येचें हजारीं प्रमाण.**

| देश | हजारीं २० पेक्षा कमी | | देश | हजारीं २० पेक्षा जास्त | |
|---|---|---|---|---|---|
| | १९२६–३० | १९३३ | | १९२६–३० | १९३३ |
| स्वीडन | १५·९ | १३·७ | हंगेरी | २६·० | २१·६ |
| इंग्लंड व वेल्स | १६·७ | १४·४ | इटली | २६·८ | २३·० |
| फरान्स | १८·२ | १६·३ | कॅनडा | २४·१ | २०·९ |
| न्यूझीलंड | १९·७ | १६·० | जपान | ३३·५ | ३१·० |
| सं. संस्थानें | १९·७ | १६·६ | रशिया | ३०·१ | — |
| स्कॉटलंड | १९·९ | १७·६ | ब्रि.हिंदुस्थान | ३५·७ | ३५·५ |
| जर्मनी | १८·४ | १४·७ | इजिप्त | ४४·४ | ४२·९ |
| | | | चीन (जगांतील सर्व राष्ट्रांपेक्षा जास्त) | | |

**अनुमान.** एकंदरीने पाहतां आज पुढारलेल्या समाजामध्ये जननसंख्या कमी होण्याची प्रवृत्ति उघड दिसून येते. आयर्लंड व फ्रान्स ह्या देशांत १९ व्या शतकापासूनच जननसंख्या कमी होऊं लागली. एकंदर युरोप व नवीन वसाहतीही गेल्या ५० वर्षांत आपली जननसंख्या कमी दाखवितात. जपानमध्ये गेल्या पांच सहा वर्षांत हा फरक दिसून येतो. पण हिंदुस्थान, ईजिप्त आणि चीन ह्या राष्ट्रांतील प्रमाण एकापेक्षा एक वरचढ असल्याचें दिसून येतें. कमी जननसंख्येच्या देशांत विवाहाचें प्रमाण कमी, तसेंच विवाहकालाचें वय जास्त आणि संततिनियमनाच्या मार्गाचा अवलंब विशेष प्रमाणांत होत असल्याचें दिसून येतें. त्याचबरोबर ह्या देशांतील आर्थिक सुबत्ताही आपल्या उपोद्घातांतील पहिल्या कोष्टकावरून दिसून येते. हिंदुस्थान, ईजिप्त व चीन ह्या तीनही देशांत वरील स्थिति उलट आहे. आर्थिकदृष्ट्या खालावलेलीं व जगाच्या शर्यतींत मागे पडलेलीं राष्ट्रें म्हणून

तीं समजलीं जातात. त्याचेंच द्योतक जननसंख्येचें जास्त प्रमाण असें म्हणावें काय? ह्याचा सविस्तर विचार 'कारणमीमांसा' प्रकरणांत करूं.

**मृत्युसंख्येच्या प्रमाणाची तुलना.** जननसंख्येच्या रेषेचा विचार केल्यानंतर मृत्युसंख्येचें प्रमाण पाहून त्याने वरच्या सिद्धांतास पुष्टि मिळते की काय, तें पाहूं. आ० नं. २ ही हिंदी मृत्युसंख्या गेल्या ५० वर्षांत हजारीं २४ ते ३६ च्या दरम्यान कशी आंदोलनें घेत आहे हें दाखवून देते. १९१८–१९ च्या इन्फ्लुएंझाच्या कहरामुळे मात्र मृत्युसंख्येचें प्रमाण केव्हाही वाढलें नव्हतें इतकें, म्हणजे हजारीं ६४ वर गेलें. तसेंच १८९३ व ९६ सालीं दुष्काळाच्या काळांत तो आकडा ३४ व ३६ वर गेला होता. १९१२ सालीं २८ वर आला व इन्फ्लुएंझांत ६४ वर जाऊन १९२० सालीं २४ वर उतरला. १९३४ सालीं मृत्युसंख्येचें हजारीं प्रमाण २५ होतें. गेल्या १४ वर्षांत मृत्युसंख्येची प्रवृत्ति थोडी कमी होण्याकडे दिसते. तथापि १९१२ ते १९३४ या २२ वर्षांच्या अवधींत एकदां ६४ वर जाऊन ती सरासरीने फक्त हजारीं ३ नेच कमी झाली आहे; एकंदरींत तिच्या आंदोलनें घेण्याच्या प्रवृत्तीवरून ह्यापुढेही कदाचित् ती एकदम वाढणार नाही कशावरून अशी एक शंका मनांत उद्भवते. अर्थात् मृत्युसंख्या वाढल्यास, आज संख्येंत भर पडेल असा जो संभव वाटतो तो कदाचित् खोटा ठरेल. म्हणजे होणाऱ्या वाढीला एकदम मृत्यूच्या आहारीं पडण्याखेरीज दुसरा मार्गच नाही की काय, असाही विचार मनांत येतो. तथापि ही शंका यथार्थ आहे की नाही हें जेव्हा आपण मृत्युसंख्या ज्या गोष्टींवर अवलंबून असते त्यांचा विचार कारणमीमांसेंत करूं तेव्हा समजून येईल.

हिंदी मृत्युसंख्येचें जें प्रमाण आहे तेंच प्रमाण व तशींच आंदोलनें इतर देशांतही दिसून येतात की काय हें पाहण्यासारखें आहे. आ० नं. ३ मध्ये इंग्लंड व वेल्स, फ्रान्स, संयुक्त संस्थानें व

जपान ह्यांच्या मृत्युसंख्येच्या रेषा दाखविल्या आहेत. त्यावरून ह्या सर्वांची मृत्युसंख्या दिवसेंदिवस कमी होत आहे असें उघड उघड दिसून येतें. १७४० मध्ये म्हणजे जवळ जवळ दोनशें वर्षापूर्वी इंग्लंड व वेल्स ह्या देशांत मृत्युसंख्येचें प्रमाण हजारीं ३५ होतें. तें उतरत उतरत १९३४ सालीं १२ वर आलें आहे. संयुक्त संस्थानांचें प्रमाण १९०० सालीं* १७ होतें तें ३४ सालीं ११ वर आलें आहे. जपानचीही मृत्युसंख्या १९२१त हजारीं २२ होती ती आता १४ आहे. रशियाचीही ३१ सालीं हजारीं १६ होती. इतर देशांचें हें प्रमाण कसें काय आहे हें पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

**कोष्टक पांचवें. दर हजारीं मृत्युसंख्येचें प्रमाण.**

| देश | हजारी २० पेक्षा कमी | | देश | हजारीं २० पेक्षा जास्त | |
|---|---|---|---|---|---|
| | १९२६–३० | १९३३ | | १९२६–३० | १९३३ |
| न्यू झीलंड | ८·६ | ८ | ब्रि. हिंदुस्थान | २६·० | २२·४ |
| कानडा | ११·१ | ९·६ | ईजिप्त | २६·२ | २७·८ |
| संयुक्त संस्थानें | ११·८ | १०·६ | चीन | (हिंदुस्थानपेक्षा अधिक असावें असें अनुमान आहे.) | |
| जर्मनी | ११.८ | ११·२ | | | |
| स्वीडन | १२·१ | ११·७ | | | |
| इंग्लंड व वेल्स | १२·१ | १२·३ | | | |
| इटली | १६·० | १३·५ | | | |
| रशिया | १६·२ | – | | | |
| स्कॉटलंड | – | १३·२ | | | |
| फरान्स | १६·८ | १५·८ | | | |
| हंगेरी | १७·० | – | | | |
| जपान | १९·३ | १७·८ | | | |

**अनुमान**. वरील कोष्टकावरून जननसंख्येच्या प्रमाणाप्रमाणेंच मृत्युसंख्येच्याही प्रमाणानुसार हिंदुस्थानचा नंबर शेवटाहून तिसरा लागतो. हिंदुस्थान, ईजिप्त व चीन ही त्रयी पुनः पूर्वीसारखी दिसते.

* पूर्वीचे मृत्युसंख्येचे आकडे मिळत नाहीत.

म्हणजे मृत्युसंख्येच्या प्रमाणाने मागच्या सिद्धान्तास जास्तच बळकटी येते. दुसरें, जेथे जननसंख्या जास्त तेथे मृत्युसंख्या जास्त असेंही दिसून येतें. त्याला एकच अपवाद आणि तो म्हणजे रशिया. तेथील जननसंख्या जास्त असूनही मृत्युसंख्या कमी आहे. त्या देशांतील निराळी समाजरचना हें एक कारण असावें व दुसरें त्यांना आपल्या देशाची उन्नति करण्याकरितां जास्त संख्याबल हवें असल्यामुळे जननसंख्येचें प्रमाण जास्त असावें. बरें वरील सर्व प्रदेश निरनिराळ्या हवामानाचे आहेत, म्हणजे जननमृत्युसंख्या हवामानावर अवलंबून आहे असें दिसत नाही. उलट पुढारलेल्या राष्ट्रांत ह्या दोनही प्रमाणांवर जनतेकडून बुद्ध्याच नियंत्रण घालण्यांत आलें आहे, असें दिसतें.

जनतेकडून प्रत्यक्ष नियंत्रण घालण्याचा प्रयत्न हिंदुस्थान, ईजिप्त व चीन ह्या देशांत नसावा म्हणून जास्त जननसंख्या व जास्त मृत्युसंख्या असें चित्र दिसत असावें. हॅरॉल्ड कॉक्सने म्हटलें आहे की, “सामान्यतः खालच्या दर्जाच्या लोकांची संख्या झपाट्याने वाढते व लौकर मृत्यु पावते आणि वरच्या दर्जाच्या लोकांत कमी बालकें जन्माला येतात पण तीं जास्त दिवस जगतात.”*

मागसलेल्या स्थितीमुळे जननमृत्यूचें प्रमाण जास्त असावें असें म्हटलें तर मागसलेली स्थिति म्हणजे आर्थिकदृष्टया की सांस्कृतिक दृष्टया हा प्रश्न येतोच. ह्या प्रश्नाचें उत्तर आपणांस ‘कारणमीमांसा’ प्रकरणाखेरीज मिळणार नाही. सध्या मागासलेलीं राष्ट्रें आणि जनन-मृत्यूचें जास्त प्रमाण हें जोडीने जातांना दिसून येतें, इतकेंच लक्षांत ठेवणें बस आहे.

**प्रांतांतील जननमृत्यूचें प्रमाण.** दुसरें, जननमृत्युसंख्या जोडीजोडीने जातात हें रशियाखेरीज इतर राष्ट्रांत दिसून आलें

* Problem of Population–Harold Cox. (लोक-संख्येचा प्रश्न–हॅरॉल्ड कॉक्स्.)

आहे. डॉ. ड्रायस्डेलने १९१२ मध्ये ५८ वर्षांचे निरनिराळ्या देशांचे जननमृत्यूचे आकडे अभ्यासून या दोहोंचा अन्योन्य संबंध असावा असें म्हटलें आहे. "मृत्युसंख्येचें कमीजास्त होणें अगर स्थिर राहणें हें जननसंख्या कमी जास्त होण्यावर अवलंबून आहे." तरी मृत्युसंख्या जेथे जास्त तेथेच जननसंख्या जास्त आहे की काय, हें हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांच्या प्रमाणावरून पाहूं.

**कोष्टक सहावें. १९२७–३१ मधील जननसंख्येचें व मृत्युसंख्येचें दर हजारीं सरासरी वार्षिक प्रमाण**

| प्रांत | जननसंख्या प्रमाण | मृत्युसंख्या प्रमाण |
|---|---|---|
| दिल्ली | ४८ | ३० |
| वऱ्हाड–मध्यप्रांत | ४६ | २६ |
| पंजाब | ३९ | २५ |
| मुम्बई | ३७ | २७ |
| मद्रास | ३७ | २५ |
| संयुक्त प्रांत | ३६ | २५ |
| अजमीर मेरवाडा | ३३ | २५ |
| बिहार व ओरिसा | ३३ | २५ |
| वायव्य सरहद्द प्रांत | २८ | २० |
| बंगाल | २७ | २३ |
| आसाम | २७ | १९ |

**बालमृत्यूचें प्रमाण.** वरील कोष्टकावरून ज्या प्रांतांत जननसंख्या जास्त तेथे मृत्युसंख्या जास्त असेंच बहुतेक दिसून येतें. पहिल्यांत प्रमाण कमी न झाल्यामुळे दुसऱ्यांतही कमी होत नाही. जननसंख्या जेथे जास्त असते तेथे एकंदरींत मृत्यु जास्त असण्याचें मुख्य कारण म्हणजे जन्मास आलेल्या बालकांत एक वर्षाच्या आंतील मृत्यु जास्त असतात हें होय. हें पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

**कोष्टक सातवें. हजारीं जननाचें व बालमृत्यूचें प्रमाण दाखविणारें १९३३**

| देश | हजार लोकसंख्येंत जननाचें प्रमाण | हजार बालकांत वर्षाच्या आंतील मृत्यूचें प्रमाण |
|---|---|---|
| न्यूझीलंड | १६ | ३२ |
| संयुक्त संस्थानें | १६ | ५८ |
| इंग्लंड व वेल्स | १४ | ६४ |
| फरान्स | १६ | ७५ |
| जर्मनी | १४ | ७६ |
| जपान | ३१ | ११८ |
| ब्रिटिश हिंदुस्थान | ३५ | १७१ |
| ईजिप्त | ४२ | १७५ |
| **हिंदुस्थानांतील प्रांत** | | |
| मुंबई | ३६·१ | १६१.६ |
| बंगाल | २७·८ | १७४·० |
| पंजाब | ४२·७ | १७८·० |
| संयुक्तप्रांत | ३५·६ | १८९·१ |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ४४·३ | २६१·२ |
| **हिं. तील जाती** | | |
| पारशी | १९ | ११८ |
| वरच्या जातीचे हिंदु | ३५·५ | २८३ |
| खालच्या जातीचे हिंदु | ३५·५ | २८६ |
| मुसलमान | ३७·२ | २८६ |

खेड्यांतल्यापेक्षा शहरामध्ये बालमृत्यूचें प्रमाण जास्त असतें.

| शहरें | बालमृत्यूंचें प्रमाण | शहरें | बालमृत्यूंचें प्रमाण |
|---|---|---|---|
| लंडन | ६६ | लाहोर | १८७ |
| बर्लिन | ८२ | दिल्ली | २०२ |
| पॅरिस | ९३ | कलकत्ता | २४४ |
| न्यूयॉर्क | ८९ | मद्रास | २५१ |
| माद्रिद | १०२ | लखनौ | २६६ |
| | | मुंबई | २७४ |
| | | नागपूर | ३२३ |

वरील कोष्टकांवरून पुढारलेल्या राष्ट्रांत बालमृत्यूचें प्रमाण कमी आहे व हिंदुस्थानांत जास्त आहे असें दिसून येतें. वरच्या व खालच्या वर्गाच्या हिंदूंमध्येही प्रमाणांत कमीजास्तपणा आहे. म्हणजे आर्थिक परिस्थितीचाही परिणाम बालमृत्यूंवर होत असावा. तसेंच एकंदरींत राहणी पण बालमृत्यूंवर परिणाम करते. दाट वस्तीमुळे शहरांत बाल-मृत्यूचें प्रमाण जास्त दिसतें.

हिंदुस्थानांत १ लाख मुलें जन्माला आलीं तर पांच वर्षांच्या आंत जवळ जवळ ४९ हजार मृत्युमुखीं पडतात—कोण हा संहार! किती हा मानवी शक्तीचा अपव्यय! शिवाय आपण पहिल्या प्रकरणांत हिंदी लोकसंख्येची जी वाढ झालेली पाहिली ती इतका अपव्यय होऊन नंतर होत आहे, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. इतर राष्ट्रांची कमी वा अधिक जी वाढ होते त्यांत मानवी शक्तीचा असा अपव्यय होत नाही.

**मातांच्या मृत्यूचें प्रमाण.** भयंकर बालमृत्युसंख्येनेच आमच्या हिंदी जनतेचा ऱ्हास होत आहे असें नसून वरचेवर बाल-कांना जन्म देतां देतां बिचाऱ्या आयाच अकालीं मृत्युमुखीं पडत आहेत. जनरल सर जॉन मेगॉ ह्यांनी मातांच्या मृत्यूविषयीं माहिती मिळविली, तेव्हा त्यांना असें आढळून आलें की, हिंदुस्थानांत सर्व-साधारण बाळंतपणांतील मृत्यूचा आकडा दर हजारीं २४ आहे. बंगालमध्ये हा आकडा ९० पर्यंत जातो. आसाममध्ये डॉ. बाल्फोर यांना कांही कांही ठिकाणीं ९०च्या वर हें प्रमाण आढळून आलें. मुंबई प्रांतांत तें २० आहे. बंगाल व आसाममध्ये प्रमाण जास्त असण्याचें कारण तेथील स्त्रियांत असलेली पडद्याची चाल हें मुख्यतः असावें. इंग्लंडमध्ये हेंच प्रमाण ४·११ आहे. तरीसुद्धा तिकडील लोकांना तें जास्त वाटतें व कमी करण्याकरितां त्यांचे सारखे प्रयत्न चालले आहेत. १९२९ मध्ये त्याकरितां एक संशोधन समिति नेमण्यांत

आलेली होती. त्या समितीने असा निर्णय दिला की, हें प्रमाण ४·११ वरून २ वर आणणें शक्य आहे. संयुक्त संस्थानांत हें प्रमाण ६·५ आहे तर नेदरलंडमध्ये २·७ इतकेंच आहे. मेगॉ ह्यांच्या म्हणण्या-प्रमाणें 'दरसाल जवळ जवळ दोन लाख स्त्रिया बाळंतपणांत मरण पावतात. एक हजार स्त्रियांमध्ये १०० स्त्रियांच्या कपाळीं बाळंतपणांत मृत्यु ठरलेला असतो.'

**स्त्री-पुरुषांचें प्रमाण.** बाळंतपणांतील जबरदस्त मृत्यु-संख्येमुळे व एकंदरींत पुरुषांच्या तुलनेने स्त्रियांची जास्त मृत्युसंख्या असल्यामुळे पुरुषांच्या मानाने स्त्रियांचें प्रमाण ह्या देशांत कमी आहे. एक हजार मुली जर जन्मास आल्या तर हिंदुस्थानांत त्यांपैकी ४८३ मुली १५ वर्षेंपर्यंत जगतात आणि साऱ्या २३८ चाळिशी गाठतात. तेंच इंग्लंडमध्ये १५ वर्षें वयाच्या स्त्रिया हजारामध्ये ७९८ व चाळिशीला पोचलेल्या ६८३ आढळून येतात.

जन्मतः सर्व देशांमध्ये मुलगे व मुली यांचें प्रमाण समसमान नसतें. मुलांच्यापेक्षा मुली कमी जन्मास येतात. पण पुढे पांच वर्षांच्या आंत मुलींच्या पेक्षा मुलगे जास्त दगावतात. ही सर्वसाधारण स्थिति हिंदुस्थानांतही आढळून येते हें पुढील आकड्यांवरून दिसून येईल.

**दर हजारीं ०–१० वर्षांपर्यन्त मृत्युसंख्या, सन १९३१**

| वय | मुलगे | मुली |
|---|---|---|
| ०–१ | १८३·३ | १६९·७ |
| १–५ | ४०·३ | ३७·३ |
| ५–१० | १०·६ | १०·५ |

**तुलना.** दहा वर्षांपर्यंत मुलांच्या मानाने कमी असलेली मुलींची मृत्युसंख्या हिंदुस्थानांत वयोमानाप्रमाणें वाढत जाते. १५ ते

४९ व विशेषेंकरून १९ ते ३० च्या दरम्यान पुरुषांच्या पेक्षा दर हजारीं ६० नी स्त्रिया जास्त मरतात. शहरामध्ये बालमृत्यूप्रमाणेच बाळंतिणींची मृत्युसंख्या जास्त असते.

पुरुषांच्या मानाने स्त्रियांचें प्रमाण कमी हें जें हिंदुस्थानचें वैशिष्टय तें पुढील कोष्टकावरून लक्षांत येईल.

**कोष्टक आठवें. दर हजार पुरुषांच्या मानाने स्त्रियांचें प्रमाण**

| वर्ष | देश | स्त्रीसंख्या | वर्ष | प्रांत | स्त्रीसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| १९३१ | इंग्लंड व वेल्स | १०८७ | १९३१ | बिहार ओरिसा | १००५ |
| १९२६ | फरान्स | १०८३ | ,, | मद्रास* | १०२५ |
| १९२७ | तुर्कस्थान | १०७९ | ,, | मध्यप्रांत | ९९८ |
| १९२५ | जर्मनी | १०६७ | ,, | बंगाल | ९२४ |
| १९३१ | इटली | १०४५ | ,, | मुम्बई | ९०१ |
| १९३० | हॉलंड | १०१२ | ,, | आसाम | ९०० |
| १९२७ | ईजिप्त | १००९ | ,, | वायव्य सरहद्द | ८४३ |
| १९३१ | ब्रिटिश हिंदुस्थान | ९४० | ,, | पंजाब | ८३१ |
| | | | ,, | बलुचिस्थान | ७१७ |

**स्त्रियांचा घट.** वरील कोष्टकावरून सर्व युरोपखंडांत व ईजिप्तमध्येही स्त्रियांची संख्या जास्त दिसून येते. पाश्चात्य देशांत पुरुषांना जास्त धोक्याचीं कामें करावीं लागत असल्यामुळे, जरी जन्मतः मुलांची संख्या जास्त असते तरी पुढे पुरुषांचें प्रमाण कमी होतें. हिंदुस्थानांत १० वर्षांच्या पुढे स्त्रियांची मृत्युसंख्या पुरुषांपेक्षा जास्त होत असल्यामुळे पुरुषांच्या मानाने स्त्रियांचें प्रमाण कमी होऊं लागतें. त्यांत विशेष हें आहे की, स्त्रियांची संख्या गेल्या ३० वर्षांत अधिकाधिक कमी होत आहे. पुढील आकडयांवरून ही गोष्ट स्पष्ट होईल.

* मद्रासी पुरुष जास्त प्रमाणांत इतर प्रांतांत कामानिमित्त जातात म्हणून तेथे स्त्रियांची संख्या जास्त असावी.

| साल | स्त्रिया कमी |
|---|---|
| १९०१ | ५५ लक्ष |
| १९११ | ७५ ,, |
| १९२१ | ९० ,, |
| १९३१ | ११० ,, |

एकंदरींत लोकसंख्येंत पुरुषांपेक्षा स्त्रिया कमी.

**परिणाम.** १९३१ सालीं १ कोटी १० लक्षांनी स्त्रियांची संख्या कमी दिसून येते. १०० मनुष्यांत ५१·४ पुरुष व ४८·६ स्त्रिया होत्या. हें समाजाच्या प्रगतीचें चिन्ह तर खास नाही. ही कमी होत जाणारी स्त्रियांची संख्या जननसंख्येवरही थोडाबहुत परिणाम करीत असावी.

स्त्रियांच्या कमी संख्येमुळे दुसरेही कांही वाईट परिणाम घडून येनात. विशेषतः खालच्या जातींत बालविवाहाला उत्तेजन मिळतें. कारण जितकी लवकर नवरी हस्तगत करून घेतां येईल तेवढें बरें ! दुसरें नवराबायकोंत वयाचें अंतर बरेंच राहतें. शिवाय वेश्याव्यवसायाला उत्तेजन मिळतें व मुली पळविणें ह्याही रानटी प्रकाराला प्रोत्साहन मिळतें.

**मालथसचा सिद्धांत.** हिंदी लोकसंख्येचें जें येथवर पृथक्करण केलें त्यावरून, ह्या देशांत जननमृत्यूचें प्रमाण जास्त असून त्या मानाने वाढ कमी आहे, बालमृत्युसंख्या जास्त असून मातांची मृत्युसंख्याही फार आहे, तसेंच पुरुषांच्या मानाने लोकसंख्येंत स्त्रियांचें प्रमाण कमी पडतें, इतक्या गोष्टी दिसून येतात. ह्या सर्व गोष्टींवरून व पुढे होणाऱ्या संभवनीय वाढीवरून १९व्या शतकाच्या आरंभीं मालथस नांवाच्या इंग्रज गृहस्थाने लोकसंख्येबाबत जो सिद्धांत स्थापित केला होता त्या सिद्धांताशीं हिंदुस्थानची परिस्थिति जुळती आहेसें दिसतें. त्याचा सिद्धांत पुढीलप्रमाणें आहे.

निसर्गनिर्मित उपजीविकेच्या साधनांपेक्षा लोकसंख्येची वाढ जास्त होण्याची नेहमीच प्रवृत्ति असते. कारण, अन्नाची वाढ गणित-

श्रेढी( Arithmetical progression )ने होऊं शकेल परंतु लोकांची वाढ भूमितिश्रेढी(Geometrical progression)ने होत असते. म्हणून दोहोंमधील अंतर सारखें जास्त जास्त होत असतें. ज्याअर्थी उपलब्ध अन्नसामग्रीच्या प्रमाणांत अखेर लोकसंख्या मर्यादित झाली पाहिजे; त्याअर्थी लोकांच्या वाढीला आळा हा पडतोच. वाढीला आळा घालण्याचे दोन प्रकार आहेत. एक बुद्ध्याच जननसंख्या कमी करणें अगर जास्त झालेली संख्या निसर्गाला मर्यादित करूं देणें. निसर्ग मग दुष्काळ, रोगराई असल्या अमानुष साधनांनी संख्या एकदम घटवितो. असा हा झगडा जनसंख्येंत आणि अन्नसामग्रींत सतत चाललेला असतो. समाजांत लोकांनी जाणून बुजून विवाह उशिरां करून, अगर वेळेला कांही लोकांनी न करूनही, जननसंख्या कमी केली नाही,* तर तेथे मत्यूंचें प्रमाण वाढतें व आयुर्मान कमी होत असतें. आणि एकंदरींत पिढीचें जीवन थोडया वर्षांचें व रोगराईमुळे कष्टमय होतें, म्हणून लोकांनी दूरदृष्टि वापरून जननाचें प्रमाणच कमी करावें असें माल्थसचें म्हणणें आहे.

हें माल्थसचें म्हणणें सर्वस्वीं बिनचूक आहे किंवा नाही ह्याबद्दल तज्ज्ञ लोकांमध्ये मतभेद आहे. आपल्याला प्रस्तुत ठिकाणीं इतकेंच पाहणें आहे की, हा सिद्धांत हिंदुस्थानला लागू पडतो किंवा काय व इतर देशांनी ह्या बाबतींत काय केलें आहे.

**माल्थसचा सिद्धांत व हिंदुस्थान.** हिंदुस्थानांतील स्थिति पाहिली तर अखिल समाज रोगराईने त्रस्त झालेला आहे, ६६ लक्ष लोकांना अन्नाचा तुटवडा आहे (प्रो. मुकर्जी लखनौ लोकसंख्याक परिषदेंतील भाषण १९३६). जननमृत्युसंख्या जास्त आहे, एका पिढीमागून दुसरी पिढी २५—२६ वर्षांच्या अवधींतच तिची जागा घेत

* ह्याचें उत्तम उदाहरण म्हणजे आयर्लंड होय. त्यांनी ह्याच रीतीने जननसंख्या कमी केली आहे.

आहे, अशी स्थिति दृष्टीस पडते. निसर्गाधीन जीवन ठेवलें व मनुष्यानें आपलें नियंत्रण वापरलें नाही म्हणजे अशी स्थिति प्राप्त होते, हा जो माल्थसच्या म्हणण्याचा सारांश, त्याची सत्यता हिंदुस्थान, चीन आणि ईजिप्त ह्या देशांचा विचार करतां मनाला पटते.

**माल्थसचा सिद्धांत व पाश्चात्त्य राष्ट्रें.** इंग्लंडमध्ये प्रथम हा सिद्धान्त प्रस्थापित केला गेला तेव्हा तेथल्या समाजांतील खालच्या वर्गाची स्थिति अशीच होती, पण आज त्याच देशाने, इतकेंच नव्हे तर सबंध युरोपनेही, हा सिद्धान्त लक्षांत घेऊन माल्थसने दर्शविलेल्या अनर्थावह परिणामांपासून आपली सुटका करून घेतली आहे. त्यांनी जननसंख्येला व मृत्युसंख्येलाही लगाम घातला आहे. दुसरें, हे सर्व देश औद्योगिक दृष्ट्या पुढारलेले आहेत. त्यामुळे त्यांना मागासलेल्या कृषिप्रधान राष्ट्रांत आपला तयार माल खपवून अन्नसामग्री प्राप्त करून घेतां येते. तिसरें, शास्त्रीय शोधांचा शक्य तितका उपयोग करून त्यांनी शेतीचें पीक वाढविलें आहे. शिवाय वसाहतींच्या योगानेही त्यांच्या संख्येला बाहेर पडण्यास वाव सापडला आहे. अशा विविध प्रकारांनी आपापल्या समाजापुरता हा सिद्धान्त त्यांनी हाणून पाडला आहे.

समाजनौकेचें सुकाणू हिंदी लोकांनी आपल्या हातांत न ठेवतां निसर्गाच्या स्वाधीन केलें आहे. म्हणूनच ती नौका आयुष्याच्या झटापटींत गटांगळ्या खात आहे. त्याला आर्थिक परिस्थितिही कशी मदत करीत आहे हें पुढील विवेचनावरून दिसून येईल. किंबहुना आर्थिक व राजकीय परिस्थितीच सद्यःस्थितीला अधिक प्रमाणांत जबाबदार आहे की काय, हें कारणमीमांसेच्या वेळेस ठरवितां येईल.

---

## प्रकरण तिसरें

# दर्जा व गुण

'हिंदी समाजाची स्थिति सुधारत नसून खालावत चालली असावी असें परिस्थिति दिग्दर्शित करते.'*

**दर्जाचें महत्त्व.** मागील दोन प्रकरणांत आपण हिंदी जनतेची वाढ कसकशी होत गेली हें पाहिलें व ती मुख्यतः ज्या जननमृत्यूच्या प्रमाणावर अवलंबून आहे, तिचें पृथक्करण संख्येच्या दृष्टीने करून पाहिलें. तेव्हा जननाचें प्रमाण जास्त असूनही त्याच्या मानाने मत्यूचें प्रमाण जास्त असल्याकारणाने वाढ जननाच्या मानाने कमीच आहे, असें आढळून आलें. उभयतांवर नियंत्रण घातलें न गेल्या-मुळे माल्थसने वर्णिल्याप्रमाणें हिंदी समाजाची स्थिति झाली आहे. समाजांत मृत्यूचें प्रमाण जास्त असणें ही केव्हाही खेदजनक स्थिति आहे. आणि जागतिक लोकसंख्येवर लिहितांना कार सॉंडर्सने काढलेल्या वरील उद्गारावरून ती जास्तच स्पष्ट होते. तरी संख्या-विषयक बाजू सोडून दर्जा व गुण यांच्या दृष्टीने हिंदी समाजाकडे पाहतां काय दिसून येतें हें प्रस्तुत प्रकरणांत पाहावयाचें आहे.

**आयुर्मानाची तुलना.** समाजाचा दर्जा शारीरिक, शैक्ष-णिक, आर्थिक व सांस्कृतिक अशा चार प्रकारांनी पाहतां येईल. लोकसंख्येच्या प्रश्नाचा विचार प्रस्तुत स्थलीं आर्थिक दृष्ट्या करा-वयाचा असल्यामुळे सांस्कृतिक दर्जा पाहतांनाही मुख्यतः आर्थिक दृष्टीच ठेवावी लागेल. एकंदरीने चारही बाजूंनी विचार करून समाजनौका कोणत्या दिशेने जात आहे हें आपणांस पाहावयाचें

---

**World Population*–Carr Saunders, (page 275).

आहे. तरी प्रथम आपण शारीरिक दृष्ट्या विचार करूं. गेल्या प्रकरणांत माल्थसच्या सिद्धांताचा उल्लेख करतांना जननमृत्यूचें प्रमाण जास्त असलें म्हणजे पिढीचें आयुर्मान कमी असतें हें ओघाने आलेंच आहे. तरी निरनिराळ्या देशांचें १८९१ आणि १९३१ ह्या खानेसुमारीच्या वर्षांमध्ये आयुर्मान काय होतें हें पुढील कोष्टकावरून पाहूं.

| देश | वर्ष | सरासरी आयुर्मर्यादा | | |
|---|---|---|---|---|
| | | पुरुष | स्त्रिया | दोहोंची सरासरी |
| इंग्लंड व वेल्स | १८९१ | ४४ | ४८ | ४६ |
| | १९३१ | — | — | ५८ |
| संयुक्त संस्थानें | १९३१ | — | — | ५६ |
| फरान्स | १८९८ | ४६ | ४९ | ४७·५ |
| | १९३१ | — | — | ५०·५ |
| जर्मनी | १८९१ | ४५ | ४४ | ४४·५ |
| | १९३१ | — | — | ४९ |
| जपान | १९२१ | ४२ | ४३ | ४२·५ |
| | १९३१ | — | — | ४४·५ |
| हिंदुस्थान | १८९१ | २४·५ | २५·५ | २५ |
| | १९३१ | २६·९ | २६·५ | २६·७ |
| **हिंदुस्थानांतील प्रांत** | | | | |
| बिहार व ओरिसा | १९३१ | २८·८ | २६·९ | २७·८ |
| मद्रास | ,, | २८·७ | ३० | २९·३ |
| पंजाब | ,, | २८ | २६·५ | २७·२ |
| मध्यप्रांत | ,, | २८·१ | २८·२ | २८·१ |
| मुंबई | ,, | २७·८ | २६·३ | २७ |
| बंगाल | ,, | २४·९ | २४·८ | २४·८ |
| संयुक्तप्रांत | ,, | २४·५ | २५ | २४·७ |

वरील कोष्टकावरून पुढारलेल्या पांच देशांशीं तुलना केली असतां सरासरी आयुर्मानाच्या दृष्टीने हिंदुस्थानचा अगदी खालचा

नंबर लागतो. तसेंच कुठल्याही प्रांतांत सुद्धा आयुर्मान तिशीपेक्षा जास्त नाही. हिंदी माणसाच्या दुप्पटीहून जास्त दिवस इंग्रज मनुष्य काढूं शकतो. आज हिंदी माणसाचें सरासरी जीवन साडे सव्वीस वर्षांचें आहे; तर इंग्रजांचें अठ्ठावन वर्षें आहे. बरें, हीच स्थिति चाळीस वर्षांपूर्वी होती काय? त्या वेळीं दोघांच्या सरासरी आयुमर्यादेंत २१ वर्षांचें अंतर होतें आणि आज ३१ वर्षांचें अंतर पडलें आहे. इंग्रज लोकांनी गेल्या चाळीस वर्षांत आपलें सरासरी आयुर्मान १२ वर्षांनी वाढविलें आहे; तर हिंदी माणसाने आधीच कमी असलेल्या आयुष्यांत अवघी १ वर्षाची भर घातली आहे! पौरस्त्य जपानी मनुष्यही हिंदी मनुष्यापेक्षा १८ वर्षांनी जास्त जगतो! इतर देशांत स्त्रियांचें आयुर्मान पुरुषांच्या मानाने जास्त असतें व हिंदुस्थानांतही १८७१ सालीं तें १ वर्षाने जास्त होतें. पण तें कमी कमी होत १९३१ त पांच महिन्यांनी कमीच झालें आहे. जसें मागील प्रकरणांत आपण हिंदुस्थानांत पुरुषांच्या मानाने स्त्रियांची संख्या कमी आहे असें पाहिलें; तसेंच त्यांचें आयुर्मानही थोडया प्रांतांखेरीज इतरत्र पुरुषांच्या मानाने कमी आहे आणि ह्याच्या उलट स्थिति इतर देशांत आहे!

गेल्या पन्नास वर्षांतील पुरुषांच्या जन्मतः व त्यापुढे दहा दहा वर्षांनी जे सरासरी आयुर्मानाचे आकडे खानेसुमारीच्या रिपोर्टांत दिले आहेत त्यावरून असें आढळून येतें की, प्रत्येक ठिकाणीं फार तर वर्ष सहा महिन्यांनी आयुर्मर्यादा वाढली आहे. परंतु अगोदरच इतरांच्या मानाने निम्याहून कमी असलेल्या हिंदी पुरुषाच्या जीवनांत वर्ष सहा महिन्यांची वाढ होणें ही कांही विशेष प्रगतीची गोष्ट नाही. शिवाय आपलें वय अचूक किती वर्षें आहे हें बहुजन समाज अज्ञ असल्यामुळे त्याच्याकडून नीट कळणें कठीण असतें! बरें ही अल्पही वाढ स्त्रियांच्या आयुर्मानाकडे पाहतां दिसून येत नाही. त्यांच्या जन्मतः आयुर्मान अपेक्षेंत एक वर्षाची भर पडली आहे. ह्याचें कारण

बालमृत्युसंख्या कमी झाली हें असावें. पण पुढे कुठही वाढ झालेली दिसत नाही. उलट घटच झाली आहे. समाजांतील निम्मा भाग जो स्त्रिया त्यांची संख्या व आयुर्मान घटत चाललें आहे, हें समाजाच्या प्रगतीचें खास लक्षण नाही.

**जननमरणावर ताबा.** तथापि सरासरी आयुर्मानाच्या पत्रकांवरून व जननमृत्यूच्या पृथक्करणावरून एक गोष्ट सिद्ध होते, ती ही की, जनन, मरण व आयुष्य ह्या गोष्टी सर्वस्वी देवाधीन अगर देवाधीन आहेत असा जो सर्वसाधारण समज आहे तो खोटा आहे. मृत्यूला जरी अझून मानवाने जिंकलें नाही तरी त्याला दूर केलें आहे; इतकेंच नव्हे तर जननावरही त्याने ताबा मिळविला आहे. पण ही झाली प्रगतिपर राष्ट्रांची गोष्ट. ह्याच्या उलट आमची स्थिति आहे. अर्थात् त्याला कोण जबाबदार आहे याचा निर्णय कारण-मीमांसेमध्ये करतां येईल.

**आजारीपणाचा परिणाम.** हिंदी मनुष्याचें आयुर्मान कमी आहे इतकेंच नव्हे, तर जें आयुष्य आहे त्यामधील किती तरी दिवस प्रत्येक मनुष्याचे आजारीपणांत फुकट जातात! ‘ हिंदुस्थानामध्ये दर वर्षी प्रत्येक मनुष्याचा जवळ जवळ पाऊण महिना निवारण करण्यासारख्या आजारीपणामुळे फुकट जातो.’* मग न निवारतां येण्यासारख्या रोगाने किती दिवस फुकट जात असतील! अझूनपर्यंत आपल्या सरकारची व समाजाची दृष्टि फार तर आजारी पडलेल्यांना औषधोपचार करण्यापलीकडे किंवा अगदी मोठ्या साथीच्या वेळीं रोगप्रतिबंधक कांही उपाय योजण्यापलीकडे

---

*All India Conference of Medical Research-taken from the Agricalture Commission Report. ( शेतकी कमिशनच्या अहवालांत उद्धृत केलेलें अखिल भारतीय वैद्यकीय शोधन मंडळाचें विधान. )

गेली नाही. पण पुढारलेलीं राष्ट्रें सर्व समाज निरोगी व सुदृढ करण्याची शक्य तितकी खबरदारी घेतात. त्याकरितां बालक जन्माला येण्यापूर्वीपासून तें निरोगी व सुदृढ होईल अशी काळजी घेण्यांत येते व पुढेही हरएक प्रकारें नागरिकांची प्रकृति निरोगी ठेवण्याविषयीं खबरदारी घेतली जाते. सध्या इंग्लंडमधील Better Health Campaign —उच्चतर आरोग्याप्रीत्यर्थ मोहीम—हेंच दाखविते.

**अपंग व दुबळे.** समाजांतील अव्यंग लोकांची ही गोष्ट झाली. परंतु हिंदी समाजांत अपंग व दुबळे व त्यामुळे जवळ जवळ परावलंबी झालेले असे किती लोक आहेत तें पाहूं:—

| अपंगपणाचा प्रकार | संख्या | दर लक्षीं प्रमाण |
|---|---|---|
| आंधळे | ६०१३७० | १७२ |
| बहिरे व मुके | २३०८९५ | ६६ |
| महारोगी | १४७९११ | ४२ |
| वेड लागलेले | १२०३०४ | ३४ |
| एकंदर | ११००४८० | ३१३ |

**त्यांचें पोषण.** एकंदरींत अकरा लक्ष लोक आपल्या दुर्बलतेमुळे समाजावर भार टाकीत आहेत. पण ह्यापेक्षाही ही संख्या जास्त असावी. कारण महारोग्यांपैकी बरेचसे व ज्यांना केव्हा केव्हा वेड लागतें अशा माणसांचे रोग लपवून ठेवण्यांत येतात. तात्पर्य इतकेंच की ही मंडळी आपला भार समाजावर टाकीत आहेत.

**उत्पादक गट.** जननसंख्या व मृत्युसंख्या जास्त असल्यामुळे व सरासरी आयुर्मान अवघें साडेसव्वीस वर्षांचें असल्यामुळे ० ते पंधराच्या वयोमान गटांत लोकसंख्या जास्त आहे. त्या मानाने १९ ते ४९ चा गट लहान आहे. इतर देशांची स्थिति ह्यापेक्षा फार भिन्न आहे हें पुढील वर्तुलाकार आकृतीवरून लक्षांत येईल.

**हिंदुस्थानांत उत्पादक गट कमी.** वरील आकृतींत जेवढा भाग रंगीत दाखविला आहे तेवढा उत्पादक गटांत आहे व दुसरा भाग अनुत्पादक गटांत आहे. म्हणजे हिंदी जनतेंत वयोमानाप्रमाणें काम करणारे हात कमी व खाणारीं तोंडें जास्त अशी स्थिति आहे. अर्थात् समाजाच्या उत्पादनांत भर घालणारी संख्या कमी व व्यय करणारी संख्या जास्त आहे. तसेंच इतर देशांत वयाच्या साठीपर्यंतही नीटपणें लोक काम करतात. पण आमच्या येथे साठीची मजल गाठणाऱ्यांची संख्याच कमी आणि तोंपर्यंत काम करणाऱ्यांची संख्या त्याहूनही कमी ! व्यक्ति साधारणपणें कमींत कमी पंधरा वर्षांची होईपर्यंत समाजावरच अवलंबून असते. त्यानंतर ती समाजाच्या व कुटुंबाच्या उत्पादनांत भर घालूं लागते न लागते, तोंच मृत्यूने अपहार केल्यामुळे कुटुंबाचें व समाजाचें भयंकर नुकसान होतें आणि देशाची प्रगति खुंटते. तरी मानवी शक्तीचा हा अपव्यय थांबविणें अत्यंत आवश्यक आहे. सरासरी आयुर्मान वाढवून जेव्हा हिंदी लोकसंख्येच्या वर्तुलांतील जास्त भाग रंगीत म्हणजेच उत्पादक होईल तेव्हाच समाज प्रगतीच्या मार्गाला लागेल.

**साक्षरता.** एथवर हिंदी लोकसंख्येचा शारीरिक दर्जा पाहिल्यानंतर आपल्या समाजाचा शैक्षणिक दर्जा काय आहे हें पाहणें योग्य होईल. १९३१च्या खानेसुमारीनुसार २ कोटी ३९ लक्ष पुरुष, व ४१ लक्ष स्त्रिया, मिळून २ कोटी ८० लक्ष माणसें हिंदुस्थानांत साक्षर आहेत असें आढळून आलें. साक्षर, म्हणजे ज्यांना साधारणपणें लिहितां वाचतां येतें, अशांची संख्या शेकडा आठ सुद्धा नाही. तेंच ग्रेटब्रिटनमध्ये ९२·५ टक्के, फ्रान्समध्ये ९४·८ टक्के, जर्मनींत ९९·७ टक्के, संयुक्त संस्थानांत ९२ टक्के, जपानमध्ये ९६ व रशियांत शेंकडा ९० साक्षर लोक आहेत. म्हणजे ह्या सर्वही देशांत बहुतेक लोक लिहूं वाचूं शकतात. साक्षरता म्हणजे एक

प्रकारचा डोळसपणाच आहे. आणि ह्या आमच्या डोळसपणांत १९२१ ते १९३१ च्या दरम्यान कांहीच भर पडली नाही !

**शिक्षणसंस्था.** ब्रिटिश हिंदुस्थानांत २,६२,०६८ इतक्या शिक्षणसंस्था आहेत व त्यांमध्ये १,२६,८९,०८६ इतके विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. म्हणजे जवळजवळ हजार लोकांना एक शिक्षण-संस्था असें प्रमाण पडतें. फक्त प्राथमिक शिक्षणाचाच विचार केला तरी तेराशें लोकांत एक प्राथमिक शाळा असें प्रमाण पडतें.

**शिक्षितांचें प्रमाण.** आपल्या देशांत दर एकवीस माण-सांत एक मनुष्य शिकत आहे. तर संयुक्त संस्थानें व कानडा येथे ४ : १ असें प्रमाण आढळून येतें. १९३३ सालीं रशियांत शिक णारांचें दर ६ माणसांत एक असें प्रमाण आढळून आलें. म्हणजे समाजाचा एकचतुर्थांश अगर एकषष्ठांश भाग सतत शिक्षणांत गुंत-लेला आहे. अर्थात तितका समाज आपल्या उन्नतीची तयारी करीत आहे. आणि तेंच आमच्या येथे त्या मानाने किती अंधार आहे ! आणि हा अंधार घालविण्यास सरकारास पैशाची सदा टंचाई आहेच !

**शिक्षणावरील खर्च.** ब्रिटिश हिंदुस्थानामध्ये शिक्षणा-प्रीत्यर्थ दरमाणशीं सरकार एक रुपया खर्च करतें; तर जपानी सरकार ११ रुपये, ग्रेट ब्रिटनमध्यें ३२ रुपये, कानडांत ४८ रुपये, संयुक्त संस्थानांत ६५ रुपये आणि रशियांत १५८ रुपये, तिकडील सरकार खर्च करतें. म्हणजे हिंदुस्थानांतील दर माणशीं उत्पन्नाइतका खर्च संयुक्त संस्थानांत आणि उत्पन्नाच्या २॥ पटीने रशियांत खर्च केला जातो. ह्याचें एक महत्त्वाचें कारण तिकडील सरकार स्वकीय असल्यामुळे त्यांना शिक्षणाप्रीत्यर्थ केलेला खर्च हा बुडीत खर्च नसून त्याचा आज नाही उद्या समाजाच्या हितासाठी उपयोग होईल अशी खात्री आहे, म्हणूनच असा कोटयवधि रुपये खर्च केला जातो.

**उच्च शिक्षणसंस्था.** एवढ्या ह्या विस्तीर्ण हिंदुस्थान देशांत शेतकी कॉलेजें अवघीं ८, एंजीनिअरिंग व व्यापारी ७ आणि त्यांत एकंदरींत ४८८९ विद्यार्थी शिकत आहेत. वरील शाखांच्या दुय्यम शिक्षण-संस्था १६२ आहेत. आणि त्यांत ८९७२१ विद्यार्थी शिकत आहेत. एकंदर तांत्रिक (टेक्नीकल) शिक्षण घेणारे ९४,६१० विद्यार्थी आहेत. तर जपानमध्ये ह्याच सदरांत सोळा लक्ष विद्यार्थी शिकत आहेत! शिवाय दरवर्षी सर्वांत हुषार अशा ३०० विद्यार्थ्यांना सरकार स्वतःच्या खर्चाने परदेशांत उच्च व अद्ययावत् शिक्षण घेण्यास पाठवितें.

**वर्तमानपत्रांचें प्रमाण.** ब्रिटिश हिंदुस्थानांत १९३०–३१ सालीं १७०८ वर्तमानपत्रें होतीं, त्यांपैकी २२१ दररोज निघणारीं पत्रें होतीं. म्हणजे दहा लाख लोकांत १६ इतकें वर्तमानपत्रांचें प्रमाण पडतें. तेंच संयुक्त संस्थानांत दहा लक्ष लोकांस १७२, कानडांत १९८, जपानांत १९९ व सोव्हीएट रशियांत १०० असें प्रमाण पडतें. साक्षर लोकांचीच संख्या आमच्या येथे कमी तर वर्तमानपत्रें तरी जास्त कशीं निघणार?

**उत्पादन व यंत्रसाहाय्य.** अशी एकंदरीने आमची शैक्षणिक गति आहे. सरासरी आयुर्मान कमी असल्यामुळे कर्त्या लोकांची संख्या कशी कमी आहे हें मागील आकृतीवरून स्पष्ट झालें आहेच. त्यांतच शैक्षणिक मागासलेपणा हें कारण भर घालतें. तशांत हिंदुस्थानामध्ये अझून इतर देशांच्या मानाने उत्पादनांत यंत्रसाहाय्य घेतलें जात नाही. संयुक्त संस्थानांत ३ कोटी १६ लक्ष किलोवॅटस् इतकी वीज वापरली जाते तर आम्ही १० लक्षच वापरतों. ह्या सर्व कारणांमुळे हिंदी माणसाच्तें उत्पादनाचें प्रमाण कमी पडत असल्यास आश्चर्य नाही. "आजारीपणामुळे सुद्धा शेंकडा २० टक्के उत्पादक शक्ति हिंदुस्थानांत कमी होते." असें ऑल इन्डिया कॉन्फरन्स ऑफ मेडिकल रिसर्च वर्कर्स यांनी म्हटलें आहे. हिंदी माणसाचें

उत्पादनाचें प्रमाण इतरांच्या मानाने किती पडतें हें सर विश्वेश्वरय्यांनी* दिलें आहे तें पाहिल्यास ही बाब अधिक स्पष्ट होईल.

| देश. | उत्पादनाचें दर माणशीं प्रमाण. | देश. | उत्पादनाचें दर माणशीं प्रमाण. |
|---|---|---|---|
| चीन | १ | जर्मनी | १२ |
| हिंदुस्थान | १·५ | ग्रेट ब्रिटन | १८ |
| इटली | २·७५ | कानडा | २० |
| जपान | ३·५ | संयुक्त संस्थानें | ३० |
| फरान्स | ८·२५ | | |

**आर्थिक दर्जा.** १९३१ च्या खानेसुमारींत ३५ कोटि हिंदी लोकसंख्येपैकी १५ कोटी ३९ लक्ष लोक काम करीत आहेत असें आढळून आलें. ह्यांपैकी १५ कोटी २० लक्ष द्रव्योत्पादक कामांत गुंतले आहेत आणि बाकीचे १९ लक्ष अनुत्पादक कामांत गुंतले आहेत. म्हणजे ढोबळमानाने ह्या १५ कोटी लोकांवर २० कोटी लोक (अर्थात त्यांत मुलें व बहुतेक स्त्रिया† येतात) अवलंबून आहेत. म्हणजे ३/७ लोकसंख्या आपल्या स्वतःचें उदरंभरण करते आणि शिवाय त्यांना ४/७ लोक पोसावे लागतात ! समाजाचा निम्म्याहून अधिक भाग परावलंबी असल्यामुळे आर्थिक दर्जा खालावलेला असल्यास आश्चर्य नाही. ह्यापेक्षा आर्थिक परिस्थितीचें सविस्तर विवेचन पुढील प्रकरणांत येणार आहे. त्यावरून हिंदी-समाजाच्या आर्थिक दर्जाची अधिक कल्पना येईल. येथे फक्त स्थूलमानाने आर्थिक स्थितीचें विवेचन केलें आहे.

---

**Planned Economy for India* (हिंदुस्थानचें आर्थिक नियोजन)—सर विश्वेश्वरय्या, पान २६.

†'हिंदी अर्थशास्त्र' ह्या पुस्तकांत प्रो० जठार व बेरी 'स्त्रियांच्या कामाचा भाग उपेक्षणीय आहे', असें म्हणतात. पान ५४.

**सांस्कृतिक दर्जा.** शारीरिक, शैक्षणिक व आर्थिक दृष्ट्या आम्ही पुढारलेल्या राष्ट्रांच्या मानाने मागसलेले असलों तरी सांस्कृतिक दृष्ट्या आम्ही बरोबरीचे आहोंत किंबहुना काकणभर वरचढच आहोंत असें हिंदी मनुष्याला सामान्यत: वाटतें. आणि तें एका दृष्टीने खरेंही आहे. हिंदु, मुसलमान, पारशी, शीख वगैरे निरनिराळ्या एकेकाळीं पुढारलेल्या धर्मांचे लोक ज्या हिंदी समाजांत आहेत त्यांना रानटी लोकांच्या बरोबरीने लेखण्याची छाती कुणाचीही नाही. हिंदुधर्मीय लोक जे ह्या देशांत बहुसंख्याक आहेत त्यांची संस्कृति फार पुरातन आहे, ह्यांत शंका नाही. त्याचबरोबर तो समाज एकेकाळीं प्रगतिपथावर होता हेंही निर्विवाद आहे. परंतु अनेक शतकें परदास्यामध्ये रुळल्यामुळे ह्या समाजांतील जिवंतपणा नाहीसा झाला आहे. तसेंच स्वकीय सत्तेखाली सांस्कृतिक वैशिष्टयाचे कोन जात्याच झिजून भिन्नधर्मीय लोक एकहिंदत्वाच्या भावनेने संघटित झाले असते. पण परकीय सत्तेमुळे हे वैशिष्ट्याचे कोन परस्परांच्या अंगांत रुतू लागले आहेत. त्यांतच त्यांना भिन्न मतदार पद्धतीने राजकीय महत्त्व देण्यांत आल्यामुळे व त्याच्या जोडीला शैक्षणिक मागासलेपण असल्यामुळे सांस्कृतिक वैशिष्ट्य प्रगतीच्या आड येऊं पहात आहे. निरनिराळ्या धर्मांतील बऱ्या वाईट चाली पुरातन म्हणून तशाच पुढे चालू ठेवण्यांत येत आहेत. त्याचा परिणाम कांही ठिकाणीं बराच घातुक होत आहे असें दिसून येईल.

**हिंदु.** पुढील कोष्टकावरून धर्म व धर्माच्या नांवाखाली संमत झालेल्या कांही चालीरीती सामाजिक जीवनावर किती परिणाम करीत आहेत हें दिसून येईल. एकंदरींत हिंदी समाजाची वाढ गेल्या ५० वर्षांत शेंकडा ३९ ह्याप्रमाणें झाली आहे. पण निरनिराळ्या धर्मांतील लोकांची वाढ सारख्या प्रमाणांत झालेली दिसत नाही! ह्यास त्या त्या समाजांतील विशिष्ट परिस्थिति जबाबदार आहे. हिंदी समाजांतील ३

कोष्टक दहावें. धार्मिक गट

| धर्म. | लोकसंख्या १९३१. आकडे हजारांचे | शेंकडा वाढ १८८१ते १९३१ | लोकसंख्येवर परिणाम करणाऱ्या कांही विशिष्ट गोष्टी |
|---|---|---|---|
| हिंदु | २३,९१,९५ | २७ | बालविवाह; मर्यादित क्षेत्रांतील विवाह; विधवाविवाहास बंदी; संतत्युत्पादनक्षम स्त्रिया कमी. |
| मुसलमान | ७,७६,७८ | ५५ | ज्ञातिसंस्थेचा अभाव; बहुपत्नीत्वाची चाल; हिंदूंच्या मानानें आहार बरा. |
| बौद्ध | १,२७,८७ | २७४ | जास्त वस्ती ब्रह्मदेशांत; उशिरां विवाह; स्त्रियांना आर्थिक व इतर स्वातंत्र्य. |
| रानटी | ८२,८० | २९ | धर्मांतर; जननसंख्या जास्त. |
| ख्रिश्चन | ६२,९७ | २३८ | निम्मी संख्या रानटी लोकांतून ह्या धर्मांत आली; उशिरां विवाह. |
| शीख | ४३,३६ | १३४ | कांही परधर्मीय ह्या धर्मांत आले; उशिरां विवाह; विधवाविवाह; जास्त जननसंख्या. |
| जैन | १२,५२ | ३ | हिंदूंसारखीच स्थिति; विधवांची संख्या जास्त. |
| पारशी | १,१० | २९ | सांपत्तिक स्थिति बरी; उशिरां विवाह; विवाहाचें मर्यादित क्षेत्र. |
| ज्यू | २४ | १०१ | ... |
| एकूण | ३४९९५९ | ३९ | जननसंख्येच्या मानाने वाढ कमी. |

भाग, जो हिंदुधर्मीय म्हणविला जातो त्याचाच प्रथम विचार करूं. एकंदरींत हिंदी समाजाची वाढ गेल्या ५० वर्षांत शेंकडा ३९ इतकी झाली आहे, तर हिंदुधर्मीयांची वाढ फक्त शेंकडा २७ ह्या प्रमाणांत आहे. म्हणजे एकंदर प्रमाणाने शेंकडा १३ ने हिंदूंची घट कां व्हावी

हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. परधर्मांतून हिंदुधर्मांत येणाऱ्यांपेक्षा कितीतरी अधिक हिंदूंतून परधर्मांतर होतें हें एक महत्त्वाचें कारण आहे. हिंदूंची विशिष्ट विवाहपद्धति हें दुसरें महत्त्वाचें कारण आहे. त्या पद्धतींतील ठळक दोष म्हणजे बालविवाह, विधवाविवाहास बंदी आणि मर्यादित क्षेत्रांत विवाह हे होत. ह्या सर्वांचा परिणाम जननसंख्येवर होतो व त्यांमुळे ती इतरांच्या मानाने कमी असते. अर्थात ह्याचा स्वाभाविक परिणाम वाढ घटण्याकडे होतो. बालविवाह व त्याच्या जोडीला कमी आयुर्मान, मातांची अधिक मृत्युसंख्या, ह्यांमुळे जननाचें प्रमाण कमी होतें. तसेंच विधवाविवाहास बंदी असल्यामुळेही पुष्कळशा स्त्रियांच्या संतत्युत्पादनास प्रतिबंध होतो. आज १ कोटि ९० लक्ष स्त्रिया हिंदु धर्मांत विधवा ह्या सदरांत आहेत ! बरें ह्यांपैकी वरच्या वर्गांतील स्त्रिया कोणतेंही बाहेरील काम करूं न शकल्यामुळे त्यांचा समाजाला उपयोग होत नाही. शिवाय त्यांचें स्वतःचें जीवन कष्टमय व निराशामय बनतें तें निराळेंच !

**हिंदु विवाहपद्धति.** हिंदु विवाहपद्धतीचें दुसरें एक वैशिष्ट्य म्हणजे मर्यादित क्षेत्रांत विवाह हें होय ! ही मर्यादा दोन दिशांनी घालण्यांत येते. एकीकडून सगोत्र विवाह निषिद्ध मानण्यांत आला आहे व दुसरीकडून आपल्या जातीबाहेर विवाह करतां येत नाही. ह्या दोनही मर्यादा जेव्हा सुरवातीस घालण्यांत आल्या तेव्हा त्या सयुक्तिक होत्या. कारण अगदी जवळच्या नात्यांतील विवाह होणें सुप्रजाजननाच्या दृष्टीने अयोग्य आहे. परंतु जवळचे नातेवाईक कोण हें ठरविण्यांत मात्र सध्या अतिव्याप्ति झाली आहे ! एकेकाळीं म्हणजे १०० किंवा त्याहूनही अधिक पिढयांपूर्वी एका पूर्वजापासून कदाचित् जन्म झाला असेल म्हणून आज त्यांच्या वंशजांना विवाहबद्ध होण्याची मनाई आहे ! खरोखर ह्या बाबतींत आधुनिक शास्त्राच्या दृष्टीने डॉ. सर हरिसिंग गौर ह्यांच्या बिलांत ज्या मर्यादा घातल्या आहेत त्या योग्य आहेत.

दुसरी मर्यादा म्हणजे आपल्या ज्ञातीबाहेर विवाह करण्याची बंदी ही होय. हिंदु समाजाचे जेव्हा चार मोठे वर्णविषयक गट होते तेव्हा ही मर्यादा योग्य होती. परंतु सध्या ह्या वर्णाचे जातिरूपी अगदी लहान लहान गट झाल्याकारणाने अनेक पिढया विवाहाचें क्षेत्र मर्यादित झालें आहे. त्याचा परिणाम वंश निर्बल निपजण्यांत होतो, असें प्रजाजननशास्त्राचें मत आहे. शिवाय इतर अनेक वाईट चालींनाही ह्यामुळे प्रोत्साहन मिळतें. पतिपत्नींच्या वयांत बरेंच अंतर राहतें. हुंडयाच्या दुष्ट चालीचाही वरपगडा बसण्यास ही सजातीय विवाहपद्धति कारण होय. शिवाय कांही कांही वेळां विजोड वधूवरांच्या जन्माच्या गाठी पडतात त्या निराळ्याच! तथापि प्रस्तुत स्थलीं आपणांस मुख्यत्वें लोकसंख्येच्या दृष्टीने विवाहपद्धतीकडे पाहावयाचें असल्यामुळे हिंदूंच्या मर्यादित क्षेत्रांतील विवाहपद्धतीने या समाजावर अनिष्ट परिणाम होत आहेत एवढें म्हटलें म्हणजे पुरे.

**मुसलमान.** हिंदूंच्या खालोखाल संख्येने मुसलमानांचा अनुक्रम लागतो. त्यांची संख्या हिंदूंच्या मानाने बरीच वाढली आहे. एक तर, आपल्या धर्मांत इतर लोक ओढून घेण्याचे त्यांचे प्रयत्न सतत चालू असतात. तथापि जितके इतरधर्मीय ख्रिश्चन धर्माकडे ओढले जातात तितके मुसलमान धर्माकडे खुषीने ओढले जात नाहीत. तेव्हा त्या धर्मांतील कांही विशिष्ट पद्धति संख्येची वाढ होण्यास मदत करीत असाव्यात. एक तर त्यांचा आहार हिंदूंच्या मानाने बरा असतो; दुसरें त्यांच्यांत विवाहावर हिंदूंसारखें एकाच लहान जातींत विवाह करण्याचें बंधन नाही; शिवाय विधवाविवाह सम्मत आहे. इतकेंच नव्हे तर बहुपत्नीत्वाची चालही बऱ्याच ठिकाणीं आढळते. ह्या सर्वांचा परिणाम जननसंख्या वाढण्याकडे होतो आणि त्यामुळे त्यांची संख्या वाढत गेली आहे.

**बौद्धधर्मीय.** संख्येने तिसरा मोठा गट आहे बुद्धानुयायांचा. शेंकडेवारी वाढीप्रमाणे ह्या लोकांची इतर धर्मीयांपेक्षा जास्त वाढ झालेली दिसते. बहुतेक बौद्धधर्मीयांची वस्ती ब्रम्हदेशांत आहे आणि आता तो देश हिंदुस्थानापासून वेगळा करण्यांत आला आहे. तथापि ब्रह्मी लोकांतील एक वैशिष्ट्य येथे नमूद करणें योग्य होईल. ब्रह्मी स्त्रियांना आर्थिक व इतर स्वातंत्र्य बरेंच असतें. त्यामुळे तेथील स्त्रिया हिंदी स्त्रियांप्रमाणे असहाय नाहीत. ह्याचा असा एक परिणाम होतो की, हिंदुस्थानाच्या मानाने त्यांची मृत्युसंख्या कमी आहे व सरासरी आयुर्मान थोडें अधिक आहे.

**रानटी.** हिंदी जनता म्हणजे विविध प्रकारच्या लोकांची सरमिसळ असल्यामुळे त्यामध्ये ८२ लक्ष लोक अगदी रानटी आहेत. त्यांच्या वाढीचें प्रमाणही हिंदूंच्या पेक्षा जास्त आहे ! वास्तविक पाहिलें तर त्यांच्यांतील बरेचसे लोक धर्मांतर करून गेलेले आढळतात. तरीही त्यांची वाढ होण्याचें कारण अधिक जननसंख्या हें होय. त्याच्याच जोडीला इतर हिंदवासीयांच्या मानाने मृत्युसंख्या अधिक आहे. बहुतेक रानटी लोकांत जननमृत्यूचें प्रमाण जास्तच असतें.

**ख्रिश्चन.** बऱ्याचशा रानटी लोकांना आपल्या कळपांत ओढण्याचा प्रयत्न ख्रिश्चन लोकांचा असतो. अशा धर्मांतरामुळे ह्यांची एकंदर प्रमाणाने फार वाढ झालेली दिसते. दुसरें, ख्रिश्चन लोकांत इतरांच्या मानाने उशिरां विवाह करण्याची पद्धति आहे. फार लौकर नाही पण फार उशिरांही नाही असे विवाह ज्या समाजांत होतात तेथील जननसंख्या जास्त असते. बालविवाहाचा एक परिणाम जननसंख्या घटण्याकडे होतो. हिंदुलोकांत जास्त बालविवाह रूढ आहे व ह्या ख्रिश्चन लोकांत विवाह उशिरां होतात. एकाचा परिणाम संख्या घटण्याकडे तर दुसऱ्याचा वाढण्याकडे झालेला दिसून येतो.

**शीख.** शीखपंथीयांची बरीचशी राहणी मुसलमानी बंधूंप्रमाणें आहे. आहारही तसाच. त्यांना विधवाविवाह मान्य आहे व त्या धर्मामध्ये धर्मांतर करूनही बरेच इतर लोक गेले आहेत. प्रौढविवाहपद्धति असल्यामुळे जननसंख्या जास्त आहे. ह्या सर्वांमुळे त्यांच्या वाढीचें प्रमाण बरेंच जास्त असलेलें दिसतें. तथापि एकंदर हिंदी समाजामध्ये त्यांची संख्या अर्धकोटीही नाही.

**जैन.** ह्यापुढे संख्येने अनुक्रम नंबर लागतो जैन लोकांचा. त्यांच्यांतील विवाहपद्धति व इतर सर्व गोष्टी बहुतेक हिंदूंसारख्याच आहेत. पण त्यांची वाढ हिंदूंपेक्षाही कमी झालेली दिसते. त्यांची जननसंख्या कमी आहे ह्याचें एक कारण त्या लोकांत विधवांची संख्या जास्त आहे हें असावें.

**पारशी.** पारशी लोकांची संख्या अवघी एक लक्ष दहा हजार आहे. परंतु हे लोक बरेच पुढारलेले आहेत. त्यांची सांपत्तिक स्थिति त्यांच्या इतर बंधुवर्गापेक्षा बरी आहे. तसेंच त्यांच्यांत आपल्या लहानग्या ज्ञातींतच फार उशिरां विवाह होत असल्यामुळे त्यांची जननसंख्या कमी आहे. पण त्याचबरोबर मृत्युसंख्या कमी असल्यामुळे वाढ हिंदूंपेक्षा जास्त झालेली दिसते.

**धर्मांचे समाजावर परिणाम.** ह्यापुढील सर्वांत लहान गट ज्यू लोकांचा आहे. एथवर ह्या सांस्कृतिक गटांचें विस्तृत वर्णन करण्यामधील हेतु आमच्या हिंदी समाजाचे जे अभेद्य खंड पडलेले आहेत त्यांच्यांतील कांही विशिष्ट चालीरीतींचा परिणाम आर्थिक दृष्ट्या कसा होतो हें दाखवावें, असा आहे. आपल्या देशामध्ये धर्माचा पगडा जितका ऐहिक जीवनावर आहे तितका इतर पुढारलेल्या देशांत नाही. ही एक भूषणास्पद गोष्ट आहे, असा अनेक एतद्देशीय लोकांचा प्रामाणिक समज आहे. "ज्याप्रमाणे सध्याच्या काळीं सर्व शास्त्रें प्रगतीसाठी झटणारीं, अधिकाधिक सत्याच्या प्राप्तीसाठी

प्रयत्न करणारीं, परंतु संपूर्ण सत्यापर्यंत कधीच न पोचणारीं अशीं बनलीं आहेत, त्याचप्रमाणें आधुनिक धर्म ही देखील एकसारखी प्रगतिपथावर धावणारी चीज होऊन बसेल."* प्रगतिपर धर्माचें हें जें ध्येयात्मक वर्णन प्रख्यात विचारप्रवर्तक ग्रंथकार वेल्स याने केलें आहे, तशा स्वरूपाचे येथील धर्म व पंथ नसून ते केवळ पुरातन सामाजिक संस्थांचा व चालीरीतींचा पुरस्कार करणारे झाले आहेत. जोंपर्यंत "आमची आम्हांलाच भीति वाटते म्हणून धर्माच्या कवचाला स्वसंरक्षणार्थ आम्ही कवटाळून धरीत आहोंत"† तोंपर्यंत धर्म हा ऐहिक प्रगतीच्या आड येत राहणार. म्हणून समाजाला प्रगतिपर करण्याकरितां सामाजिक चालीरीतींत योग्य फेर-बदल करणें जरूर आहे. किंबहुना स्वतंत्र व सुखी अतएव सुसंस्कृत समाजांत अशा तऱ्हेचा धार्मिक पगडा राहिलाही नसता. एकूण परिस्थिति सर्व बाजूंनी परस्परपोषक होऊन समाजाला खाली ओढीत आहे. तरी तिला सर्व बाजूंनी सुधारावयास पाहिजे.

---

### प्रकरण चवथें

## राष्ट्रीय उत्पन्न

मागील तीन प्रकरणांमध्ये आपण हिंदी समाजांतील मानवी घटकांचा विविध दृष्टींनी विचार केला; त्यावरून जें चित्र दिग्दर्शित झालें तें अनेक प्रकारें खेदजनक आहे, असें दिसून आलें; तथापि एवढया माहितीवरून उपासमारीचा प्रश्न कसा उद्भवतो हें दिसून

---

* *The Work, Wealth and Happiness of Mankind* : H. G. Wells; page 732

† *The Hindu View of Life* : Prof. Radhakrishnan.

येत नाही. त्याकरितां पुढील दोन प्रकरणांमध्ये हिंदी समाजाच्या आर्थिक परिस्थितीचें त्या प्रश्नापुरतें विवेचन करावयाचें आहे. त्यापैकी प्रस्तुत प्रकरणामध्ये राष्ट्रीय उत्पन्न व त्यावरून अजमावतां येणारें दर माणशीं सरासरी उत्पन्न, त्याची विभागणी व व्यय वगैरे बाबींचा विचार करावयाचा आहे.

**उत्पन्नाचा अंदाज.** हिंदुस्थानचें राष्ट्रीय उत्पन्न इतर देशांच्या मानाने कमी आहे व लोकांची आर्थिक स्थिति खालावलेली आहे, याबद्दल सर्व हिंदी अर्थशास्त्रज्ञांमध्ये एकमत दिसून येतें. तथापि राष्ट्रीय उत्पन्न किती कोटींचें आहे व समाजाचा दर्जा किती खालावलेला आहे याबद्दल मात्र बराच मतभेद आहे. याचें मुख्य कारण म्हणजे राष्ट्रीय उत्पन्न अजमावण्यास जरूर असलेल्या माहितीचा अपुरे-पणा होय. शिवाय ज्या ज्या मंडळींनी हें उत्पन्न अजमावण्याचा प्रयत्न केला त्या सर्वांनी एकाच पद्धतीचा अवलंब केला नाही. उदाहरणार्थ, शहा आणि खंबाटा ह्यांनी नोकरीचें (Services) उत्पन्न राष्ट्रीय उत्पन्नांत जमेस धरलें नाही. शिवाय त्यांनी संस्थानांसहित सर्व राष्ट्राचें उत्पन्न अजमावलें आहे. तेंच फिंडले शिरास ह्यांनी फक्त ब्रिटिश हिंदुस्थानाचें उत्पन्न घेऊन त्यामध्ये नोकरीचें उत्पन्न जमेस धरलें आहे. त्यामुळें तें जास्त दिसतें. शहा आणि खंबाटा ह्यांनी वरील उत्पन्न जमेस न धरण्याचें कारण असें दिलें आहे की, त्यामुळे तेवढ्या रकमेची द्विरुक्ति होते. त्याचबरोबर प्रत्येकाचा दृष्टिकोणही थोडा-बहुत फरक करितो. तरी आपण प्रथमतः हे निरनिराळे अंदाज काय आहेत तें पाहूं.

राष्ट्रीय उत्पन्न व त्यावरून निघणारें दर माणशीं उत्पन्न पुढील कोष्टकामध्ये दिलें आहे. शिवाय मालाच्या किमती वाढल्या म्हणजे उत्पन्नांत घट होते आणि कमी झाल्या म्हणजे तें वाढतें. पुढील कोष्टकांत निरनिराळ्या मंडळींचे निरनिराळे अंदाज दिसतातच पण

**कोष्टक अकरावें. राष्ट्रीय उत्पन्न व दर माणशीं सरासरी उत्पन्न.**

| अंदाजक. | वर्ष. | राष्ट्रीय उत्पन्न कोटि रुपये | दर माणशीं उत्पन्न रुपये |
|---|---|---|---|
| कै. दादाभाई नौरोजी | १८७१ | ३४० | २० |
| फॅमिन कमिशन | १८८१ | ५२९ | २७ |
| लॉर्ड कर्झन | १९०१ | ६७० | ३० |
| फिंडले शिरास | १९११ | ११४२ | ८० |
| वाडिया आणि जोशी | १९१३ | १०८७ | ४५ |
| शहा व खंबाटा | १९०० ते १४ सरासरी | ११०६ | ३६ |
| ,, ,, | १९१४ ते २२ सरासरी | १८६२ | ५८॥ |
| ,, ,, | १९२१–२२ | २३६४ | ७४ |
| वा. गो. काळे | १९२१ | २६२९ | ८४ |
| सेंट्रल ब्यँकिंग कमिटी | १९२८ | | (शेतकरी) ४२ |
| फिंडले शिरास | १९२१ | २९५७ | १०७ |
| ,, ,, | १९२२ | ३०९८ | ११६ |
| ,, ,, | १९२३ | ३१२५ | ११७ |
| ,, ,, | १९२४ | २८३४ | १२६ |
| ,, ,, | १९२५ | २६७२ | ११४ |
| ,, ,, | १९२६ | २७२८ | १०८ |
| ,, ,, | १९२७ | २७१४ | १०८ |
| ,, ,, | १९२८ | २८२९ | १०६ |
| ,, ,, | १९२९ | २१८० | १०९ |
| ,, ,, | १९३० | १६२४ | ८४ |
| ,, ,, | १९३१ | १६८३ | ६३ |
| ,, ,, | १९३२ | १५५० | ५८ |
| सर विश्वेश्वरय्या | १९२२–२३ | २२२३ | ८२ |

एकाच व्यक्तीच्या मतानुसार अलीकडील वर्षांत उत्पन्न घटत चाललें आहे असें दिसतें. (फिं. शि. १९२१, १०७ व १९३२, ५८).

**दादाभाई नौरोजींचें अनुमान.** कै. दादाभाई नौरोजी ह्यांनी पहिल्यांदा हें उत्पन्न अजमावण्याचा १८७० सालीं प्रयत्न केला.

अर्थात् त्या वेळीं आता जितकी माहिती मिळणें शक्य आहे तितकी नव्हती. तथापि उपलब्ध गोष्टींवरून दर माणशीं वार्षिक सरासरी उत्पन्न अवघें २० रु. आहे असें त्यांस आढळून आलें. त्यावर लिहितांना त्यांनी आपल्या पुस्तकांत* म्हटलें आहे की, जर दुष्काळ वगैरे आपत्तींचा विचार केला तर हें उत्पन्न अवघें १५ रु. पडतें. म्हणजे हें उत्पन्न इतकें थोडें आहे की, सर्वसाधारण जनतेला तुरुंगांतल्यापेक्षाही कमी अन्नवस्त्र पडतें. मग इतर सुखसोई अगर दुष्काळासारख्या इतर आपत्तींची तरतूद करण्याची गोष्ट कशाला? शिवाय त्यांनी असेंही म्हटलें आहे की, राष्ट्रीय उत्पन्नाचा भाग बराचसा वरच्या वर्गाकडे जातो, म्हणून खालच्या वर्गाकडे सरासरीपेक्षाही कमी उत्पन्न येतें.

कै. दादाभाई नौरोजींनी आपल्या पुस्तकांत काढलेल्या ह्या अनुमानामुळे देशांत व सरकारी मंडळींतही बरीच खळबळ उडाली. म्हणून फॅमिन कमिशनने १८८१ सालीं अंदाज काढला. त्याप्रमाणें दर माणशीं उत्पन्न २७॥ रु. निघालें. पुढे लॉर्ड कर्झन ह्यांनीही अंदाज काढला तो मालाच्या किंमतीच्या प्रमाणांत २७ रु. निघतो. १९१३ सालीं काढलेल्या वाडिया आणि जोशी ह्यांच्या अंदाजानुसार किमतीच्या प्रमाणांत वार्षिक उत्पन्न अवघें ३० रु. च निघतें. पुढे १९१४ सालीं महायुद्ध सुरू झालें. त्यामुळे देशांतील आर्थिक परिस्थितीवर बराच परिणाम झाला. बऱ्याचशा उद्योगधंद्यांना उत्तेजन मिळालें; म्हणून सरासरी उत्पन्नांत थोडी भर पडली. शहा आणि खंबाटा ह्यांनी महायुद्धापूर्वीच्या सरासरी उत्पन्नापेक्षा १९१४–२२ सालांतील उत्पन्न जास्त दाखविलें आहे. पण पुढे हा भरभराटीचा काळ उरला नाही. महायुद्धानंतर आलेली जागतिक आर्थिक मंदी हिने हिंदुस्थानालाही ग्रासिलें. आणि

* *Poverty and Un-British Rule in India:* D. Nowroji.

ह्या मंदींतून जरी आज इतर राष्ट्रांनी बरीचशी सुटका करून घेतली आहे, तरी हिंदुस्तान ह्या मंदींतून निघालेला नाही हें फिंडले शिरास ह्यांच्या १९२१ सालापासून तों १९३२ पर्यंत दिलेल्या सरासरी उत्पन्नाच्या आकडयांवरून दिसून येतें. अगदी अलीकडील अंदाज सर विश्वेश्वरय्यांनी दिला आहे.* त्याप्रमाणे हिंदी माणसांचें उत्पन्न साधारण चांगल्या आर्थिक परिस्थितींत ८२ रु. पडतें. पण हल्लीच्या अर्थिक मंदींत तें ५९ रुपयांपर्यंत येतें असें त्यांचें म्हणणें आहे.

**उत्पन्नावरून दिग्दर्शित होणारी स्थिति.** राष्ट्रीय उत्पन्न आणि त्यावरून निघणारें दर माणशीं उत्पन्न ह्यावरून देशाची आर्थिक स्थिति जरी नक्की अजमावतां येत नाही तथापि त्यावरून सर्वसाधारण स्थिति कशी काय आहे ह्याचें साधारणपणें आकलन होतें. अपुऱ्या माहितीमुळे आणि प्रत्येक अंदाजकाच्या निरनिराळ्या पद्धतीमुळे उत्पन्नांत फरक पडत असला तरी वरील सर्व आकडयांवरून एक गोष्ट सिद्ध होते, ती म्हणजे बहुजनसमाजाची आत्यंतिक दरिद्री स्थिति! वर्षाला ५० रु. किंवा ६० रु. म्हणजे महिना ४॥–५ रुपये. प्रत्येकाचें सरासरी उत्पन्न जर इतकें कमी आहे तर त्यानें कुठल्या तऱ्हेचें जीवन कंठावयाचें? नवल नाही की देशांतील पुष्कळसे लोक अर्धपोटीं व उपाशी राहत असतात!

ह्यामध्ये असा एक मुद्दा उपस्थित होण्यासारखा आहे की जरी आमचें राष्ट्रीय उत्पन्न कमी असलें तरी तें गेल्या ३० वर्षांत थोडें तरी वाढलें आहे. लॉर्ड कर्झनच्या वेळीं ३० रु. होतें तर आज तें पन्नास रुपये आहे. मग ही सुधारणा नव्हे काय? वरवर पाहतां हें खरें आहे असें वाटतें. परंतु जास्त खोल विचार करतां जरी सरासरी उत्पन्न वाढलेलें दिसत असलें तरी किमतींत फरक पडला आहे व

* *Planned Economy of India*:
Sir Vishveshvarayya; page 27.

संपत्तीची विषम वाटणी झाली आहे, म्हणून बहुजनसमाजाची फारशी सुधारणा झाली नाही. आपल्याकडील दर माणशीं आहार वाढला आहे अगर सुधारला आहे असें दिसत नाही. या विधानालाही पुरावा देण्याइतपत पुरेशी माहिती उपलब्ध नाही ही गोष्ट खरी आहे. तथापि वकील आणि मुरंजन यांचें असें मत आहे की, "देशांतील अन्नाचा पुरवठा कमीच असून ही अन्नाची कमतरता वाढतच आहे."*

सर जॉन मेगॉ म्हणतात की, "हिंदुस्थानांत शेकडा ३९ लोकांना चांगलें अन्न मिळतें पण ४१ लोकांना पोटभर खावयासही मिळत नाही व शेकडा २० तर घाणेरड्या अन्नावर कसेंबसें जीवित कंठीत आहेत. बंगालमध्ये तर हें प्रमाण अनुक्रमें २२, ४७ आणि ३१ आहे."

क्यामेरॉन यांनी आपल्या 'साधी राहणी व उच्च विचारसरणी' या लेखांत म्हटलें आहे की, "जरी प्रत्येक हिंदी माणसाला तुरुंगांतील अन्न द्यावयाचें ठरविलें तरी त्याच्या अन्नोदकाचा खर्च वर्षास रु. ९७–१३–० येईल. सध्या हिंदी माणसाचें उत्पन्न जवळ जवळ इतकें आहे की, सर्व जण वस्त्रप्रावरणाशिवाय राहण्यास, मैदानांत झोपण्यास, करमणुकीशिवाय सर्व जन्म कंठण्यास तयार असतील तर सर्वांना पुरेसें अन्न मिळूं शकेल आणि तें सुद्धा जाडें भरडें, अगदी कमी प्रतीचें आणि पोषणाच्या दृष्टीने हिणकस असेल."†

लखनौ येथे भरलेल्या लोकसंख्या परिषदेमध्ये (१९३६ सालीं) प्रो. मुकर्जी यांनी म्हटलें आहे की, "देशांत जवळ जवळ ६ कोटि

---

* *Currency and Prices in India*; Vakil and Muranjan; page 363.

† *Indian Economic Journal, 1932.*

लोकांना अर्धपोटी राहावें लागतें." ह्या सर्व अप्रत्यक्ष माहितीवरून बहुजन समाजाची स्थिति फारशी सुधारली नाही असेंच म्हणावें लागेल.

**विषम वाटणी.** दुसरी गोष्ट अशी की समाजांतील उत्पन्न विषमा रीत्या वाटलें गेलें आहे. त्यामुळे खालच्या बहुजनवर्गाकडे त्यांतील कमी भाग येतो. जमीनदार, कारखानदार व व्यापारी आणि वरचा सुशिक्षित वर्ग यांच्याकडे उत्पन्नाचा जास्त वाटा जातो. शहा आणि खंबाटा ह्यांच्या म्हणण्याप्रमाणे शंभर लोकांत एका–त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्ति लक्षांत घेतां शंभरांत पांच–व्यक्तीकडे राष्ट्रीय उत्पन्नाचा तिसरा हिस्सा जातो; राहिलेल्या ९५ लोकांपैकी ३० लोकांकडे दुसरा हिस्सा जातो व उरलेला हिस्सा शेकडा ६० लोकांना मिळतो. म्हणजे त्यांच्या अंदाजाप्रमाणे १९२१–२२ सालीं दर माणशीं उत्पन्न ३१ रु. असतांना ह्या शेकडा ६० लोकांचें उत्पन्न १७ रु. पडतें!

**प्रांतीय विभागणी.** तिसरी गोष्ट अशी की, हें राष्ट्रीय उत्पन्न सर्व प्रांतांत सारखें विभागलें गेलें नाही. जेथे जमीन सुपीक आहे अगर व्यापारी पिकें लावलीं जातात व जेथे उद्योगधंदे जास्त आहेत अशा प्रांतांमध्ये–उदाहरणार्थ, मुंबई, पंजाब, आसाम, मध्य-प्रांत, वऱ्हाड यांमध्ये–हें उत्पन्न जास्त आहे. पण मद्रास, बिहार, ओरिसा, संयुक्त प्रांत यांमध्ये तें कमी आहे.

**शेतीचें उत्पन्न.** शिवाय उद्योगधंद्यांपेक्षा शेतीचें उत्पन्न एकंदरींत कमी असल्यामुळे शेतकऱ्याचें उत्पन्न जर निराळें काढलें तर तें दरमाणशीं सरासरी उत्पन्नापेक्षा कमी भरेल. सेंट्रल बँकिंग कमिटीने असें नमूद केलें आहे की, "१९२८ सालच्या किंमतीं-प्रमाणे ब्रिटिश हिंदुस्थानचें सर्व शेतीपासून होणारें उत्पन्न १२०० कोटी रुपयांचें होईल. याशिवाय शेतकऱ्यांना आणखी २० टक्के उत्पन्न इतर उद्योगधंद्यांपासून मिळतें. तथापि १९२८ साला-पासून मालाच्या किंमती उतरल्या आहेत व लोकसंख्या वाढली

आहे, या दोनही गोष्टींकडे दुर्लक्ष करूनही प्रत्येक शेतकऱ्याच्या वाटयाला ४२ रुपयांपेक्षा अधिक उत्पन्न येऊं शकत नाही ! म्हणजे महिना ३॥ रुपये हें शेतकऱ्याचें उत्पन्न ! हे आकडे पाहिले असतां शेतकऱ्यांची म्हणजेच देशांतील ८० टक्के लोकांची कष्टमय स्थिति थोडीतरी लक्षांत येते. शिवाय त्यांच्या डोक्यावर कराचें आणि कर्जाचें ओझें आहेच !

**तुलना.** आपली स्थिति लक्षांत येण्यास सर्वांत उत्तम मार्ग म्हणजे आपल्या संपत्तीची व उत्पन्नाची इतर देशांच्या संपत्तीशीं व उत्पन्नाशीं तुलना करणें होय.

**कोष्टक बारावें. संपत्तीची व उत्पन्नाची तुलना.**

| देश | वर्ष | राष्ट्रीय संपत्ति कोटि रु. | दर माणशी संपत्ति | वर्ष | रा ट्रीय उत्पन्न कोटि रु. | दर माणशीं रा.उ.रु. |
|---|---|---|---|---|---|---|
| ब्रिटिश हिंदुस्थान | १९३० | १२००० | ४४१ | १९२२ | २२२३ | ८२ |
| | | | | १९३२ | १६०० | ५८ |
| युनायटेड किंग्डम | १९२५ | २९४३२ | ६३७१ | १९३१ | ४९९५ | १०९२ |
| अमेरिकन सं. संस्थानें | १९२८ | ११२३१५ | ९३६५ | १९२८ | २४५३३ | २०५३ |
| कानडा | १९२९ | ८३४४ | ८०२३ | १९३० | १३११ | १२६८ |
| फरान्स | १९२८ | १८८५७ | ४५८१ | १९२८ | २६१८ | ६३६ |
| जपान | १९२४ | १३६४५ | २३०८ | १९२८ | १४७१ | २७१ |
| जर्मनी | — | — | — | १९२५ | ३२५३ | ५२० |
| इटली | — | — | — | १९२७ | १२९३ | ३२० |
| ईजिप्त | — | — | — | १९२८ | ४०१ | २८० |
| रशिया | — | — | — | १९२५ | १९४७ | १३३ |

वरील पत्रकावरून ब्रिटिश हिंदुस्थानची संपत्ति व उत्पन्न इतरांच्या मानाने किती तरी कमी आहे हें दिसून येतें. हिंदुस्थानांत

बहुतेक प्रदेशांतील हवा इतर पाश्चात्य देशांच्या मानाने उष्ण आहे म्हणून हिंदी माणसांना कपडा कमी लागतो, उष्णता उत्पन्न करण्याची जरूरी पडत नाही, वगैरे गोष्टी खऱ्या आहेत. तसेंच हिंदी माणसाच्या गरजा कमी आहेत, हेंही जमेस धरलें तरी देखील आमच्या व इतरांच्या उत्पन्नांत जमीन अस्मानाचें अंतर आहे. सायमन कमिशनला सुद्धा असें म्हणण्याची पाळी आली की, "अगदी जास्तींत जास्त उत्पन्नाचे आकडे (१९२०-२१ मध्ये रु. १०७ व १९२१-२२मध्ये रु. ११६ *) पाहिले तरी ते ८ पौंड इतकेच दिसतात आणि इंग्लंडचें दर माणशीं उत्पन्न तर ९५ पौंड (१९२२ सालीं) आहे. ह्या दोन देशांतील लोकांच्या गरजांतील फरक लक्षांत घेऊनही दोन उत्पन्नांतील विरोध थक्क करणारा आहे." †

**संपत्तीचा प्रवाह.** एवढ्या माहितीवरूनही बहुजनसमाजाची अनुकंपनीय स्थिति आपल्या लक्षांत चटकन येते. यावर साहजिकच असा प्रश्न मनांत उभा राहतो की, आमचें राष्ट्रीय उत्पन्न इतकें कमी कां असावें? याला, एका बाजूने उत्पन्नामध्ये उद्योगधंद्याच्या वाढीने व शेतीसुधारणेने भर पडत नाही, आणि दुसरीकडून ज्याबद्दल लोकांना फारच थोडा मोबदला मिळतो असा संपत्तीचा प्रवाह देशाबाहेर चालला आहे, हेंच उत्तर आहे. तशांत लोकसंख्येची वाढ गेल्या दशकांत बरीच झाल्यामुळे आधीच कमी असलेलें राष्ट्रीय उत्पन्न जास्त लोकांत विभागलें जात आहे. त्यामुळे प्रत्येकाच्या वाट्यास कमी भाग येऊं लागला आहे.

जित राष्ट्र जेत्या राष्ट्राचें सर्वस्वी मिंधें असतें व जेतें राष्ट्र त्याचा शक्य तितका स्वतःकरितां फायदा करून घेतें ही जगाची

---

* फिंडले शिरास यांचा अंदाज. तो इतरांच्यापेक्षा जास्त आहे हें आपण पाहिलेंच आहे.

† सायमन कमिशन रिपोर्ट, भाग १ ला. प्यारा ३७४.

अजूनही नीति आहे; तरी या नियमाला हिंदुस्थान अपवाद असणें शक्य नाही. आज पावणेदोनशें वर्षांची ब्रिटिश अमदानी हेंच सांगत आहे. "१७९७ ते १८५७च्या शंभर वर्षांत ज्यापासून हिंदुस्थानाला कसलाही उलट फायदा झाला नाही असा संपत्तीचा प्रवाह या देशाबाहेर गेला."* कै. दादाभाई नौरोजींनी तर देशांतील या संपत्तीच्या प्रवाहाबद्दल फार कडक उद्गार काढले आहेत. "हिंदुस्थानची स्थिति फारच दुःखद आहे. सतत लुटणाऱ्या लोकांची लूट चाललीच आहे अशी वस्तुस्थिति आहे. ब्रिटिशांच्या पूर्वी हिंदुस्थानाची लूट केव्हा केव्हा होत असे. परंतु मध्यंतरीं बराच काळ लोटत असल्यामुळे लोकांना समृद्धीचे दिवस लाभत असत. पण आता तशी स्थिति नाही. ब्रिटिशांची लूट (ती सुद्धा कायदेशीर, म्हणून कमी भयंकर नव्हे) जराही खंड न पडतां सतत चालली आहे. वेळेला ती वाढते आणि अशा कंगाल होत चाललेल्या हिंदुस्थानाला डोकें वर काढण्याची संधि मुळीच मिळत नाही."

**प्रवाहाचीं रूपें.** सर विश्वेश्वरय्यांनी पण म्हटलें आहे की सर्वसाधारणपणें दरवर्षीं हिंदुस्थानांतून २२० कोटि रु. जातात.‡ म्हणजे दर माणशीं ७ रु. असे परदेशीं जातात. शहा आणि खंबाटा ह्यांनीही तोच अंदाज काढला आहे. त्यांच्या मतें खालील रूपाने संपत्ति जात आहे:-

---

* *Company's Finance in India*–Banarji.

† *Poverty and un-British Rule in India*–
D. Nowroji

‡ *Planned Economy of India*–
Sir M. Vishveshvarayya.

| | कोटि रु. |
|---|---|
| होम चार्जेस (हिंदुस्थानाला द्यावी लागणारी वार्षिक देणगी) | ५०·०० |
| परदेशी भांडवलावरील व्याज.... .... .... | ६०·०० |
| परदेशी कंपन्यांना नेआण केल्याबद्दल.... .... | ४१·६३ |
| बँकिंग कमिशन्ससाठी .... .... .... | १५·०० |
| परदेशी व्यापाऱ्यांचे आणि धंदेवाइकांचे नफे .... | ५३·२५ |
| एकूण | २१९·८८* |

१९२१-२२ सालीं २२० कोटि रुपये अंदाजें हिन्दुस्थानांतून बाहेर गेले असें ह्या उभयतांचें म्हणणें आहे. तरी आपण ह्यांतील प्रत्येक बाबीचा विचार करूं.

**होम चार्जेस.** पहिले ५० कोटि रुपये जे हिंदुस्थानांतून निष्कारण बाहेर जातात त्यांबद्दल शहा आणि खंबाटा यांनी असें म्हटलें आहे की, एवढा भुर्दंड देशाला दरवर्षी आपल्याकडून पाठवावाच लागतो. आणि एकदा तो बाहेर गेला की, त्याचा उलट हिंदुस्थानाला कांहीच फायदा मिळत नाही. अर्थात् इतकी संपत्ती राष्ट्रीय उत्पन्नांतून वजा करणें हें 'योग्य आणि न्याय्य आहे' असें त्यांनी म्हटलें आहे. यामध्ये फक्त जेवढ्या पैशाचा माल, हिंदुस्थानचे हाय कमिशनर इंग्लंडमध्ये हिंदुस्थानाकरितां विकत घेतात तेवढी किंमत घालणें योग्य होणार नाही. तथापि हिन्दुस्थानांत जे परकीय लोक नोकरी करतात, त्यांना हा देश आपला असा केव्हाच वाटत नाही, ते नोकरीच्या काळांत केलेली बचत हिंदुस्थानांतून बाहेर नेतातच की! ती कोठे जमेस धरली नाही. तेव्हा विलायतेंत खरेदी केलेल्या मालाची किंमत ५० कोटि रुपयांत समाविष्ट झाली तरी हरकत नाही.

---

* *Wealth and Taxable Capacity of India*—Shah & Khambata.

**परदेशीय भांडवलावरील व्याज.** दुसरा ६० कोटि रुपयांचा हप्ता परदेशी जातो, तो परकीय लोकांनी ह्या देशांत जें भांडवल गुंतविलें आहे त्याचें व्याज म्हणून भरावा लागतो. सर विश्वेश्वरय्या ह्यांच्या अंदाजानुसार हें व्याज ६५ कोटि रु. आहे. १९३३ सालापर्यंत निरनिराळ्या रूपाने ब्रिटिशांचें हिंदुस्थानांत १३०० कोटि रु. भांडवल गुंतलेलें होतें, असें ब्रिटिश असोसिएटेड चेंबर ऑफ कॉमर्स यांनी म्हटलें आहे. ह्यांपैकी ९०० कोटि रु. इतकें राष्ट्रीय कर्जच आहे. आणि हें कर्ज गेल्या दहा बारा वर्षांत वाढतच गेलें आहे. शिवाय ज्या अर्थीं ह्याच काळांत निर्गतीपेक्षां आयात जास्त झाली नाही त्या अर्थी नवीन कर्ज जें भरण्यांत आलें तें म्हणजे इकडील मिळालेला नफा पुनः ह्याच देशांत भांडवलाच्या रूपाने गुंतविण्यांत आलें! मिळून देशांतून जाणारा संपत्तीचा पाट कांही कमी होत नाही!

**वाहतुकींबद्दल.** तिसरा हप्ता वरील पत्रकांत ४१ कोटि रु. दाखविला आहे. आणि तो माल व उतारू नेण्याआणण्याबद्दल परदेशी आगबोटीच्या कंपन्यांना देण्यांत येत असतो. देशाच्या बंदराबंदरांतील वाहतूक तरी हिंदी जहाजांना राखून ठेवावी ह्या लोकांच्या मागणीला (हाजी बिल) सरकारने अजून वाटण्याच्याच अक्षता लावल्या आहेत. तसेंच कलकत्त्याला जहाजें बांधण्यास डॉकयार्ड बांधावें असें मर्कंटाइल मरीन कमिटीने सुचविलें, पण त्याबद्दलही अजून कांहीच करण्यांत आलें नाही. बंदराबंदरांतील वाहतुकीपैकी शेंकडा १३ व परदेशी वाहतुकीपैकी शेंकडा २ इतकीच हिंदी व्यापाऱ्यांच्या हातांत आहे.

**बँकरूपाने.** केवळ वाहतूक करण्याबाबतच परदेशी आगबोट कंपन्यांना पैसा जातो असें नसून विमा कंपन्या व परदेशी बँका ह्यांच्याकडून देशाचे १९ कोटि रु. दरवर्षी बाहेर जातात! ह्यापुढील अंदाज परकीय व्यापाऱ्यांचा नफा, परकी उच्च धंदेवाले

लोक आणि सरकारी नोकर ह्यांच्यामुळे जाणारे ५३ कोटि रुपये हा होय! साधारणपणे अशी अटकळ आहे की, सरकारी सर्व खात्यांत मिळून परकीय लोक २००० असावेत. त्यांचा लठ्ठ पगार आणि पेन्शनें देशाला भरावीं लागतातच पण शिवाय तेवढा पैसा देशाबाहेर कायमचा जातो. जणू ह्या २००० लोकांची जागा घेण्यास कोणी लायक हिंदी माणसेंच नाहीत! ह्याबद्दल कांही मंडळींचें म्हणणें असें आहे की, हे लोक देशांतील मोठीं जबाबदारीचीं कामें सांभाळतात. गोष्ट खरी आहे, परंतु तीं कामें आम्ही खुषीने त्यांना दिलीं नाहीत इतकेंच नव्हे, तर त्याबद्दल आमच्या शक्तीपलीकडे आम्हांला घस सोसावी लागते!

**निर्गत माल.** ह्याची वास्तविक कल्पना जेव्हा आपण कोणच्या रीतीने ही भरपाई करतों हें लक्षांत घेऊं तेव्हा येईल. प्रत्येक देशाचा इतर देशांशीं व्यापार चालू असतो. परंतु त्यामध्ये शक्य तों इतर देशांना आपल्याकडील पक्का माल व जास्त असलेला कच्चा माल देण्याचें धोरण पुढारलेल्या राष्ट्रांचें असतें. त्यामुळे एतद्देशीय उद्योगधंद्यांना उत्तेजन मिळतें. शिवाय होतां होईल तों आयातीपेक्षा निर्गत जास्त ठेवण्यांत येते. म्हणजे व्यापार देशाला फायदेशीर होतो. हिंदुस्थानाला दरवर्षीं २०० कोटि रु.* भरपाई करावयाची असल्यामुळे तेवढा कच्चा माल हिंदुस्थानांतून परदेशांत जातो. ह्याच कच्च्या मालाचा तयार माल होऊन तो दुप्पट तिप्पट किंमतीने आम्ही परत विकत घेतों! या रूपाने आम्हांला परदेशी जिनसांकरितां त्याचप्रमाणें परदेशांतून येणारी यंत्रसामग्री वगैरेकरितां जबर किंमत द्यावी लागते, आणि देशांतील लोकांना उद्योगधंदे मिळत नाहीत व लोकांची क्रयशक्ति वाढत नाही! शिवाय धान्याच्या रूपाने जाणारा

---

* सर विश्वेश्वरय्यांचा अंदाज.

प्रवाह शेतकऱ्याला पोटाला चिमटा घेऊन द्यावा लागतो. मग देशांतील लोकांना पुरेसें अन्न मिळत नसल्यास आश्चर्य नाही.

**कच्चा माल.** आपण जवळ जवळ १७० कोटि रुपयांचा माल अशा कच्च्या स्वरूपांत पाठवितों की ज्याचा पक्का माल देशांत तयार करतां येईल आणि अशा रीतीने दुसऱ्यांना पक्का माल तयार करण्याकरितां द्यावी लागणारी जबर किंमत व दुहेरी वाहतुकीचा खर्च वाचेल.

**कोष्टक तेरावें. १९२५–२६ सालची निर्गत**

| | | | |
|---|---|---|---|
| कच्चा ताग | .... ३६ | कोटि | रुपये. |
| कापूस | .... ९६ | ,, | ,, |
| गळिताचीं धान्यें | .... १८ | ,, | ,, |
| न कमावलेलीं कातडीं | .... ७ | ,, | ,, |
| धातु | .... ७ | ,, | ,, |
| इतर | .... ६ | ,, | ,, |
| | १७० | कोटि | रुपये. |

१९३१–३२ सालच्या आयात मालापैकी शेंकडा ८० माल अशा प्रकारचा आहे की, ज्याचा पक्का माल येथेच तयार करतां येईल. या दिग्दर्शनावरून देशांतील संपत्तीचा पाट कशा रीतीने बाहेर जात आहे हें दिसून येईल.

**सरकारी उत्पन्न.** देशाची सांपत्तिक स्थिति कशा प्रकारची आहे हें अजमावण्याचा दुसरा मार्ग म्हणजे सरकारी जमाखर्च पाहणें हा होय. तसेंच देशाचें राष्ट्रीय कर्ज किती आहे आणि त्यांतील विधायक कार्याकरितां किती काढलें होतें हें पाहिलें म्हणजे देखील आर्थिक परिस्थितीची कल्पना येते. पकी मध्यवर्ती व प्रांतिक सरकारें जमाखर्चाची तोंडमिळवणी पूर्वी शक्य तों करीत. परंतु जमेच्या बाबतींत हिंदुस्था-

नचें स्थानिक, प्रांतिक आणि मध्यवर्ती सरकारचें उत्पन्न फार हळूहळू वाढत आहे. शिवाय सरकारी धोरण आजपर्यंत देशाच्या संपत्तींत भर घालील असें नव्हतें. १९१४ सालीं मध्यवर्ती सरकारचें उत्पन्न ८० कोटि रुपये होतें. १९२१–२२ सालीं तें ११५ कोटि रुपये झालें आणि १९२९–३० या वर्षीं (आर्थिक मंदीपूर्वी) तें १३२ कोटीपर्यंत चढलें. फिरून १९३३–३४ सालीं तें ११९ कोटीपर्यंत घटलें. तेंच जपानचें उत्पन्न १९१४ सालीं ९६ कोटि रुपये होतें तें १९३० या वर्षीं २०८ कोटि रुपये झालें. १९१९ च्या सुधारणा कायद्यापासून मध्यवर्ती व प्रांतिक सरकारचें उत्पन्न वेगळें करण्यांत आलें आहे. परंतु उत्पन्नावरील कर आणि जकातीसारखीं उत्पन्न देणारीं खातीं मध्यवर्ती सरकाराकडे आहेत. प्रांतिक सरकाराकडे जमीन महसूल, कालव्याचें उत्पन्न, अबकारी वगैरेसारखीं खातीं असून आरोग्य, शिक्षण वगैरे खर्चाच्या बाबी जास्त आहेत. त्यामुळे हल्लीच्या सुधारणा कायद्याखाली सुद्धा लोकोपयोगी खात्यांवर अधिक खर्च करणें प्रांतिक सरकारला बिकटच होऊन बसणार आहे.

**तूट.** महायुद्धाच्या काळांत आणि तत्पूर्वी सरकारी जमा, खर्चापेक्षा जास्त होती. परंतु महायुद्धानंतर तीन वर्षें फारच त्रासाचीं गेलीं. अफगाणिस्थानांतील लढाई, वायव्य सरहद्दीवरील चकमकी, वगैरेंनी १०० कोटि रुपयांची तूट पडली. एकट्या अफगाणिस्थानच्या लढाईमुळेच ३४ कोटि रुपये बुडीत खर्च आला. नंतर १९२१ सालापासून मध्यवर्ती सरकारचें उत्पन्न वेगळें करण्यांत आलें तेव्हा त्यांच्या उत्पन्नांत १० कोटींची भर पडली. पण ५२॥ कोटि रुपये राष्ट्रीय कर्ज कमी करण्याकरितां खर्च करण्यांत आले. ३१ ते ३३ च्या दरम्यान १० कोटींची तूट आली तरी १३ कोटि कर्जफेडीकरितां घातले ! ह्या राष्ट्रीय कर्जाचा विचार आपण पुढे करणारच आहोंत.

**खर्च.** १९२१ नंतरच्या १५ वर्षांत सर्व प्रांतांत मिळून २३

कोटि रुपये खोट आली. त्यांपैकी १० कोटि रुपये प्रांतांनी मध्यवर्ती सरकारला भरावयाचे होते. म्युनिसिपालिटयांचें व लोकल बोर्डांचें उत्पन्न थोडें वाढलें आहे. परंतु ज्या मानाने त्यांना खर्च करावयास सवड पाहिजे त्या मानाने वाढलें नाही. १९३० सालीं दर माणसामागे स्थानिक संस्था २ रुपये खर्च करीत; तर जपानमध्ये ३६ रुपये खर्च करण्यांत येत असत आणि संयुक्त संस्थानांमध्ये तर दर माणशीं १५० रुपये खर्च करण्यांत येत. ह्या स्थानिक संस्थांकडे प्राथमिक शिक्षण वगैरेसारख्या समाजहिताच्या अत्यावश्यक बाबी असतात. आणि ह्याच बाबतींत लोकांच्या गरजांकडे कसें दुर्लक्ष करण्यांत आलें आहे, हें आपण तिसऱ्या प्रकरणांत पाहिलें आहे. त्याच सरकारला सैन्यावर व परकीय अंमलदारांवर देशाच्या सांपत्तिक मानापेक्षा किती तरी अधिक पट खर्च करतां येतो! आणि अगदी अलीकडच्या सुधारणांनी सुद्धा हा खर्च कमी करण्याचा अधिकार हिंदी लोकांना दिलेला नाही. जपानसुद्धा परवापर्यंत सैन्यावर इतका खर्च करीत नव्हतें. कानडामध्ये तर सरकारी उत्पन्नापैकी शेंकडा ४ इतका खर्च लष्करी खात्याकडे होत असे. तर आमच्याकडे जवळजवळ शेंकडा ३७ एवढा खर्च करण्यांत येतो. ह्या बाबतींत आजपर्यंत कित्येक पुढाऱ्यांनी सरकारच्या कानीं कपाळीं ओरडून सांगितलें. पण साम्राज्यसंरक्षणासाठी अवाढव्य लष्कर ठेवण्याची जरूरी आणि त्याचा भयंकर खर्च हिंदी जनतेवर लादण्याची आवश्यकता अजूनही हिंदी सरकारला वाटते. तसेंच सिव्हिल सर्व्हिसच्या बाबतींत. जगांतील कुठल्याही राष्ट्रापेक्षा आमच्याकडील राज्यकारभार प्रमाणतः अधिक खर्चाचा आहे. देशाच्या अगर रयतेच्या सहनशक्तीच्या मानाने ह्यांचे पगार किती तरी अधिक आहेत. ते जरी आम्हाला कमी करतां येत नाहीत तरी हल्ली कॉंग्रेस मंत्रिमंडळांनी ५०० रु. पगार स्वीकारून एकटया मुंबई प्रांतांत १ लक्ष ३४ हजारांची बचत केली आहे. ह्यावरून बचत

करण्यास किती सवड आहे ती दिसून येईल.

**कर.** यापैकी बहुतेक सर्व पैसा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष कराच्या रूपाने सरकार जनतेकडूनच घेतें. दर माणशीं १० रु. सरकार ह्या रूपाने घेतें. इतर राष्ट्रांशीं तुलना करतां हें प्रमाण फार नाही. परंतु उत्पन्नाच्या मानाने कर अधिक आहेत आणि पुनः प्रत्यक्ष करापेक्षा अप्रत्यक्ष कर अधिक आहेत. अर्थशास्त्राचा असा एक सिद्धांत आहे की कमी उत्पन्नावर जर जबर कर बसविला तर त्याने मनुष्याला आवश्यक वस्तूंचा त्याग करावा लागल्यामुळे त्याच्या उत्पादन-शक्तीवर परिणाम होतो. व असा कर थोडा असला तरी तो जास्त जाणवतो. अधिक संपत्तींतून थोडया जास्त प्रमाणांत भाग काढून घेतला तरी तें इतकें जाणवत नाही. फार तर थोडयाशा चैनींना फाटा मिळतो येवढेंच. याच तत्त्वावर इनकमटॅक्स व सुपर टॅक्सची उभारणी केलेली असते. तसें पाहिलें तर बहुजन समाजांतील हिंदी माणसाचें उत्पन्न अगोदरच कमी. त्यामध्ये हे १० रुपये कराच्या रूपाने गेले म्हणजे त्यांना ते अधिकच जाणवतात. हिंदुस्थानच्या एकंदर करपद्धतींत अप्रत्यक्ष करच जास्त आहेत. तेंच इंग्लंड, अमेरिका वगैरे ठिकाणीं डेथ् डयूटी (मृत्यूवर कर), इनहेरिटन्स डयूटी (वारशावर कर), अशा प्रकारचे प्रत्यक्ष कर जास्त बसविले जातात. प्रो. के. टी. शहा ह्यांनी, १९२३–२४ सालीं जें करांचें उत्पन्न येत असे त्यापैकी श्रीमंत वर्ग १११½ कोटि रुपये कर देत होते आणि गरिबांना १६७ कोटि रुपये द्यावे लागत, असें म्हटलें आहे. १९३०–३१ नंतर मध्यवर्ती सरकारने सुपर टॅक्स बसवून व इनकमटॅक्स वाढवून ह्या बाबतींत सुधारणा केली आहे, ही गोष्ट खरी. पण त्याचबरोबर मिठासारख्या अत्यावश्यक बाबींवरील कर काढला नाही अगर कमी केला नाही. प्राप्तीवरील

---

* *Sixty Years Finance in India*–Prof. K. T. Shah; p. 374.

करामध्ये जी हजार अगर दोन हजारांखालील उत्पन्नांना सूट ठेवण्यांत येते ती आजवर जमीन महसुलाच्या बाबतींत मुळीच नसे. आता कॉंग्रेस मंत्रिमंडळाने अधिक उत्पन्नावर जादा कर बसविण्याचें सरकारी धोरण राहील असें जें जाहीर केलें आहे, तें बहुजनसमाजाच्या हिताचेंच ठरेल ह्यांत शंका नाही.

**कराचा विनियोग.** करपद्धतीच्या प्रश्नाची दुसरी एक बाजू अशी आहे की देशांतील कराच्या रूपाने आकृष्ट केलेल्या पैशाचा विनियोग समाजहितवर्धक गोष्टींकडे जितका केला जातो, तितकी व्यक्तीची उत्पादनशक्ति वाढते, इतकेंच नव्हे तर त्यांच्या सुखसोयींतही भर पडते. उदाहरणार्थ, रशियांतील मजुराला पाश्चात्य मजुराच्या मानाने कमी पगार मिळतो; तरी रेल्वेचा फुकट प्रवास, फुकट औषधोपचार, वाचनालयें, बगीचे, पोहावयाचे तलाव, आजारीपणांत महिना दोन महिने विश्रांति घेण्यास निवासस्थानें वगैरे अनेक प्रकारच्या सुखसोयी सरकारकडून बिनामोल करण्यांत येतात. याचा अर्थ, दरएक माणसाच्या उत्पन्नांत तितकी भरच पडते. तशा दृष्टीने येथील सरकारांच्या खर्चाकडे पाहिलें तर निराशाच पदरीं पडते. एखादी दुष्ट बाई ज्याप्रमाणें आपल्या सख्ख्या मुलांना अजीर्ण होईपर्यंत खावयास घालते आणि सावत्र मुलांना उपाशी ठेवून रडावयास लावते त्याप्रमाणेंच सरकार लष्करासारख्या खात्यावर आजवर खर्च करीत आलें आहे; आणि शिक्षण, आरोग्य वगैरे खात्यांची उपासमार करीत आलें आहे! त्यामुळे सरकारला रयतेकडून दर माणशीं दिल्या गेलेल्या दहा रुपयांपैकी अवघे २ रुपये परत मिळतात! ह्यापुढे तरी प्रांतिक कारभार लोकनियुक्त प्रतिनिधींच्या हातांत आल्यावर त्यांच्याकडे असलेल्या मर्यादित उत्पन्नाचा शक्य तितका भाग लोकोपयोगी खात्यांकडे खर्च केला जाईल अशी आशा आहे.

**राष्ट्रीय कर्ज.** करपद्धतीचा विचार केल्यानंतर राष्ट्रीय कर्जाचा विचार थोडया विस्तृतपणें करणें योग्य होईल. व्यक्तीच्या बाबतींत कर्ज डोक्यावर ठेवून जीवनक्रम कंठणें गैरशिस्त तर समजलें जातेंच, परंतु तें त्याच्या हिताच्या दृष्टीनेंही गैरच असतें. तशी गोष्ट राष्ट्राची नाही. संपन्न पण अधिक आर्थिक प्रगति करूं इच्छिणारीं राष्ट्रें पुष्कळ वेळां इतरांचें कर्ज काढतात. अशाच हेतूने हिंदुस्थान सरकारने कर्ज काढलें असतें तर गोष्ट निराळी होती. आणि कराची काँग्रेसला कर्ज-विषयक बाबतींत कमिटी नेमून प्रश्नाचा विचार व्हावा अशी मागणी करण्याची अवश्यकताही वाटली नसती. पण वस्तुस्थिति ह्याच्या उलट आहे. ३१ मार्च १९३४ पर्यंत हिंदुस्थानचें कर्ज १२१० कोटि रुपये होतें. तेंच दहा वर्षांपूर्वी ९१९ कोटि रुपये होतें. ह्यापैकी ५०० कोटि रुपये परकीय कर्ज आहे आणि ७१० कोटि रुपये स्वकीय कर्ज आहे. परकीय कर्जामुळे पैशांतून व्याजाच्या रूपाने कसा भयंकर संपत्तीचा प्रवाह बाहेर जातो हें आपण वर पाहिलेंच आहे. मध्यवर्ती सरकारने आपल्या उत्पन्नांत तूट पडतांच पुष्कळ वेळां थोडया मुदतीचें परकीय कर्ज काढलें आहे. आणि त्यामुळे अनुत्पा-दक कर्जांत भर पडली आहे. यापैकी ९७८ कोटि रुपये उत्पादक व बाकीचें २३२ कोटि रुपये कर्ज अनुत्पादक आहे. यांपैकी १५६ कोटि रुपयांचें कर्ज महायुद्धानंतरचें आहे. पण त्याच्या पूर्वी कंपनी सरकारच्या कारभारांत हिंदुस्थान जिंकण्याकरितां जो खर्च आला तोही हिंदुस्थानावरच लादण्यांत आहे. आर. सी. दत्त यांनी म्हटलें आहे की, "आम्ही स्वतःच आम्हांला जिंकून गुलाम बनविलें." नंतर जेव्हा इंग्रज सरकारकडे ह्या देशाचा कारभार गेला तेव्हा दळणव-ळणाचें साधन म्हणून आगगाडी बांधण्याकरितां कोटयवधि रुपयांचें कर्ज काढण्यांत आलें. अर्थात त्यांत अंतस्थ हेतु इंग्लंडचा पक्का माल इकडे खपला जावा आणि इकडील कच्चा माल तिकडे जावा

हाच होता. ब्रिटिश मालाला सवलतीचे दर रेल्वेकडून देण्यांत येत असत ही गोष्ट महशूर आहे! रेल्वेचें खातें अजूनही बुडीत आहे. स्ट्रॅटेजिक रेल्वेची २ कोटि रुपयांची तूट हिंदुस्थान सरकारला भरून काढावी लागते.

**व्याजाचा दर.** शिवाय परदेशीं कर्ज काढतांनाही सरकारने हिंदुस्थानच्या हिताकडे कसें दुर्लक्ष केलें आहे पहा! हिंदुस्थानच्या बाजारांत ६ टक्के दराने कर्ज मिळत असतांनाही भारतमंत्र्यांनी ७ दराने लंडनमध्ये कर्ज काढलें. आणि त्याच वेळेस आफ्रिकेच्या व ऑस्ट्रेलियाच्या सरकारांना ५ टक्के दराने कर्ज मिळालें. त्याचप्रमाणे नुकतेंच १९३५–३६ त काढलेलें ४० कोटि रुपयांचें कर्ज हिंदुस्थानांत ३ टक्के दराने व लंडनच्या बाजारांत २॥ टक्के दराने मिळत असतां भारतमंत्र्यांनी ५॥ टक्के दराने लंडनमध्ये काढलें.

**कायमचे हितसंबंध.** हिंदुस्थानाला दिलेल्या ह्या कर्जामुळे हिंदुस्थानाला दर वर्षी नफ्याच्या रूपाने ६० कोटि रुपये व व्याजाच्या रूपाने ६५ कोटि रुपये द्यावे लागतात हें आपण वर पाहिलेंच आहे. पण यांत आणखी एक गोष्ट अशी की ह्यामुळ परकीयांचे कायमचे हितसंबंध (Vested interests) निर्माण होतात आणि ते आमच्या हिताच्या आड येतात! नव्या सुधारणा देण्याच्या वेळीं लोकांच्या हातांत पूर्ण सत्ता न देण्याचें एक कारण हे कायमचे हितसंबंध होत. ब्रिटिश सरकारला ही एक मोठी धास्ती वाटली की, परदेशीय भांडवलवाल्यांवर अन्याय (?) केला जाईल; व वेळेला त्यांची हकालपट्टी करण्यांत येईल. म्हणून त्यांच्या संरक्षणार्थ नव्या कायद्यांत कांही कलमें घालून ठेविलीं आहेत! म्हणजे आमच्या संपत्तीवर पुष्ट होऊन आज हे आमच्याच हिताच्या आड येत आहेत! तरी ह्या सर्व गोष्टींचा विचार करतां अतःपर लोकांना जबाबदार असलेल्या हिंदुस्थान सरकारच्या हातांत ही ऋण काढण्याची सत्ता देण्यांत

यावी आणि मागील ऋणाची योग्य ती चौकशी व्हावी, हें हिंदी जनतेचें न्याय्य मागणें आहे.

**आर्थिक स्थितिविषयक अनुमान.** इतर राष्ट्रांच्या मानाने हिंदी राष्ट्राचें उत्पन्न आणि त्यावरून निघणारें दर माणशीं उत्पन्न फार कमी आहे. तें जरी गेल्या ३० वर्षांत थोडें वाढलें आहे तरी जागतिक मंदीनंतर तें घटूं लागलें आहे. देशाच्या सरकारी जमाखर्चाकडे पाहिलें तरीही उत्पन्नांत फारशी भर पडलेली नाही. अनुत्पादक कर्ज वाढत आहे, करांचा भार कमी झालेला नाही आणि त्याचा फार थोडा मोबदला सरकारकडून रयतेला मिळतो. देशांतून कोटयवधि रुपयांचा संपत्तीचा प्रवाह देशाबाहेर जात आहे. आणि त्याला आळा घालण्याचें अजून तरी लोकनियुक्त कायदेमंडळांस शक्य झालें नाही. ह्या सर्व समालोचनावरून बहुजनसमाजाची आर्थिक स्थिति अत्यंत असमाधानकारक आहे, एवढें अनुमान काढण्यास कांही हरकत नाही. आता ह्यापुढील प्रकरणांत दुसऱ्या दृष्टीने लोकांच्या आर्थिक स्थितीचा विचार करूं.

---

**प्रकरण पांचवें**

# उपजीविकेचीं साधनें, बेकारी व राहणीचा दर्जा

देशांतील सद्यःस्थितीमध्ये उपासमारीचा प्रश्न बहुजनसमाजापुढे आहे की काय, ह्या प्रश्नाचा विचार करण्याकरितां गेल्या प्रकरणांत आपण दर माणशीं सरासरी वार्षिक उत्पन्न पाहिलें व तें किती कमी आहे हें दिसून आलें आहे. आणि बहुजनसमाजाला त्या तुटपुंज्या उत्पन्नावर जीवन कंठणें कसें कष्टप्रद जात असेल ह्याची अंधुकशी कल्पना वाचकांना आली असेलच. सदरहू प्रकरणांत समाजाचें

उत्पन्न ज्या साधनांवर अवलंबून आहे त्यांचा विचार करून त्यांतून बेकारी कशी निर्माण होते हें पाहावयाचें आहे. शेवटीं बहुजन-समाजाच्या राहणीच्या दर्जाचें संक्षेपतः विवेचन करावयाचें आहे.

**साधनें.** उपजीविकेचीं मुख्य साधनें म्हटलीं म्हणजे शेती, उद्योगधंदे, वाहतूक, व्यापार व नोकरी हीं होत. ह्यांपेक्षा जर लहान लहान भेद पाहिले तर हीं साधनें १९५ पर्यंत भरतात; परंतु इतक्या बारीक साधनांचा विचार करणें प्रस्तुत स्थलीं शक्य नसल्यामुळे कांही कांही मोठ्या साधनांचाच विचार करणें योग्य होईल. तरी ह्या उपजीविकेच्या साधनांत जनतेची विभागणी कशी होते हें पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

**कोष्टक चवदावें.**

| उद्योगधंदा | काम करणारे (लाख) | एकंदर काम-कऱ्यांशीं प्रमाण | अवलंबित (लाख) | एकंदर धंद्या-वर अवलंबून (लाख) | लोकसंख्येशीं शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|---|---|
| १ शेती | १०३३ | ६७·१ | १३१५ | २३४८ | ६७·० |
| २ उद्योगधंदा, कारखाने | १५४ | १०·० | १८८ | ३४२ | ९·७ |
| ३ व्यापार | ७९ | ५·१ | १०९ | १८८ | ५·४ |
| ४ वाहतूक | २३ | १·५ | ३० | ५३ | १·५ |
| ५ बौद्धिक व्यवसाय व कला | २३ | १·५ | ३६ | ५९ | १·७ |
| ६ राज्यकारभार | १० | ·७ | १८ | २८ | ·८ |
| ७ संरक्षक दल | ८ | ·६ | ९ | १७ | ·५ |
| ८ खाणींत काम करणारे | ३ | ·२ | २ | ५ | ·१ |
| ९ इतर–उत्पन्नावर राहणारे, ज्यांनी बरोबर माहिती दिली नाही असे | २०५ | १३·३ | २६१ | ४६६ | १३·३ |

**अवलंबित.** वरील पत्रकाचा विचार करण्यापूर्वी ही एक गोष्ट येथे स्पष्ट करावीशी वाटते की, एक हजार लोकसंख्येमध्ये ५६१ लोक काम न करणारे व इतरांवर अवलंबून असणारे आहेत; म्हणजे निम्या-पेक्षा अधिक लोक समाजाच्या संपत्तींत भर घालण्यास असमर्थ आहेत. उलट त्यांच्या पोषणाचा भार निम्याहून कमी लोकांना उचलावा लागतो. हे ५६१ लोक म्हणजे १० वर्षांखालील मुलें व ६० वर्षांवरील वृद्ध माणसें होत. आपल्या समाजाचा आर्थिक दर्जा मागसलेला आहे असें तिसऱ्या प्रकरणांत म्हटलें आहे त्याचें एक कारण ही अवलंबित संख्या जास्त आहे हें होय. दुसरें, भिकारी, वेडे वगैरे जे लोक निरुपयोगी आहेत अशांचें प्रमाण हजारांत ५ आहे. एकंदरींत ५६६ लोक हजारांतून आर्थिक दृष्ट्या बाद होतात. तिसरी गोष्ट अशी आहे की काम करणाऱ्यांच्या मानाने अवलंबित लोकांची संख्या १९२१ च्या पेक्षा १९३१ त वाढली आहे असें ३१ चा खानेसुमारी रिपोर्ट म्हणतो. ह्याचें एक कारण त्या रिपोर्टांत दिलें आहे की, मध्यम वर्गांतील तरुणांना काम मिळण्याची वाढती अशक्यता, हें असावें. तेव्हा अवलंबित मंडळींची संख्या वाढत आहे हें कांही देशाच्या प्रगतीचें लक्षण म्हणवत नाही.

समोरच्या पानावर दिलेल्या आकृतीवरून देशांतील बराच मोठा भाग शेतीवर अवलंबून आहे हें चटदिशीं लक्षांत येईल. आणि त्या मानाने इतर साधनांवर फार थोडी लोकसंख्या अवलंबून आहे हेंही तितकेंच उघड होतें. ह्याचेंच स्पष्टीकरण आकडयांमध्ये वरील कोष्टकांत दिलें आहे. एकंदर लोकसंख्येपैकी शेंकडा ६७ लोक शेतीवर उदरंभरण करणारे आहेत. ह्यांमध्ये कांही स्त्रियांची शेतीवर उपजीविका असूनही घरगुती काम जास्त मानाचें वाटल्यामुळे त्या सदरांत त्यांनी आपलीं नांवें घातलीं आहेत. अशा स्त्रिया व शेतीच्या उत्पन्नावर राहणारे जमीनदार घेतले तर हें प्रमाण शेंकडा ७३ पर्यंत जातें. सेन्सस कमिशनर डॉ. हटन ह्यांच्या मतें हें प्रमाण १९२१ इतकेंच आहे, तर

कांहींच्या मतें तें वाढलें आहे. ह्याच्या उलट उद्योगधंद्यांची स्थिति ! ह्यांवर उपजीविका करणारे अवघे शेंकडा ९.७ आहेत. आणि लोकसंख्या वाढली असतांही १० वर्षांत उद्योगधंद्यांतील लोकांची संख्या शेंकडा १ ने घटली आहे. व्यापारामध्यें शेंकडा ५ लोक आहेत. वाहतुकीच्या कामांत व बौद्धिक व्यवसायांत शंभरापैकी एक एक मनुष्य गुंतला आहे; व पुढील प्रमाण फारच अल्प आहे.

**तुलना.** निरनिराळ्या उपजीविकेच्या साधनांवर अवलंबून असणाऱ्या लोकांचें इतर देशांतील प्रमाण पुढील कोष्टक देत आहे:-

**कोष्टक पंधरावें. उपजीविकेच्या साधनांचें तुलनात्मक कोष्टक**

**( एकंदर लोकसंख्ये या मानानें शेंकडा प्रमाण )**

| देश | वर्ष | शेती | उद्योग-धंदे व खाणी | व्यापार व वाहतूक | राज्य-कारभार | बौद्धिक व्यवसाय | इतर |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ब्रिटिश हिंदुस्थान | १९३१ | ६७·२ | १०·२ | ६·६ | १·२ | १·५ | १३·३ |
| ग्रेट ब्रिटन | १९२१ | ७·१ | ४७·२ | २०·७ | ९·९ | ४·४ | १४·७ |
| संयुक्त संस्थानें | १९३० | २२·० | ३१·७ | २४·५ | २·२ | ७·० | १२·६ |
| फरान्स | १९२६ | ३८·३ | ३३·३ | १७·० | २·२ | ३·६ | ५·६ |
| जर्मनी | १९२५ | ३०·५ | ४१·३ | १६·४ | २·० | ४·० | ५·७ |
| कानडा | १९३१ | ३१·२ | २४·९ | १७.७ | २·९ | ६·२ | १७·२ |
| जपान | १९३० | ५०·३ | १९·५ | २०·२ | ७·० | ... | ३·० |

वरील कोष्टकांतील तुलनेवरून आपल्या देशांत शेतीवर कसा जास्त भर दिला गेला आहे हें लक्षांत येईल. ज्यांच्यांत लागवडीला बरीचशी जागा आहे अशीं अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें, त्याचप्रमाणें उद्योगधंद्यांत नुकतेच पदार्पण करणारे कानडा जपान सारखे देश, ह्यांच्यांतील उद्योगधंदा व व्यापार ह्यांवर उपजीविका करणाऱ्यांच्या संख्येकडे पाहिल्यास व आमच्याकडील तेच आकडे लक्षांत घेतल्यास आमचें प्रमाण किती अल्प आहे हें अधिकच स्पष्ट होईल.

दुसरी गोष्ट म्हणजे, निरनिराळ्या उपजीविकेच्या साधनांमध्ये लोकसंख्या इतर देशांत प्रमाणबद्ध विभागली गेली आहे तर हिंदी लोकांपैकी ³⁄₄ लोकांना शेती हेंच उपजीविकेचें एकमेव साधन आहे.

**ऐतिहासिक अवलोकन.** ब्रिटिश अमदानीपूर्वी, किंबहुना कंपनी सरकारच्या आगमनापूर्वी, देशामध्ये बरेचसे उद्योगधंदे त्या काळच्या परिस्थित्यनुसार लहान प्रमाणावर कां होईना पण चालू होते. त्यामुळे निव्वळ शेतीवर अवलंबून राहणाऱ्यांची संख्या कमीच असली पाहिजे. शिवाय शेतकऱ्यांना इतर उपव्यवसाय होतेच. येथील कापड व इतर कारागिरीच्या मालाला इतर देशांत फार मागणी असे हें इतिहासप्रसिद्धच आहे. ग्रीक स्त्रिया हिंदुस्थानांत बनविलेल्या कापडाच्या भारंभार सुवर्ण देऊन तें खरेदी करीत असें म्हणतात. हिंदुस्थानाशीं व्यापार करण्याकरितां पाश्चात्य राष्ट्रांत चुरस चालत असे. यावरून इकडील मालाला त्या काळीं असलेली मागणी लक्षांत येते. पण हे लहान प्रमाणावर चाललेले धंदे हिंदुस्थानांत ईस्ट इंडिया कंपनीचा शिरकाव होतांच ऱ्हास पावूं लागले आणि शेतीवर अवलंबून राहणाऱ्यांचें प्रमाण वाढूं लागलें. आपणांस शेतीवर उपजीविका करणाऱ्यांचें त्या काळचें प्रमाण जरी माहीत नाही, तरी १८९१ सालीं शेतीवर उपजीविका करणाऱ्यांची संख्या शेंकडा ६० आढळून आली तर १९३१ मध्ये ती शेंकडा ७२ होती !

**शहरांतील व खेड्यांतील लोकसंख्येची तुलना.** हीच गोष्ट दुसऱ्या रीतीने पाहावयाची झाल्यास खेडयांतील लोकसंख्येची शहरांत राहणाऱ्या लोकांच्या संख्येशीं तुलना करून पाहिली पाहिजे. जर देशांत उद्योगधंदे वाढत्या प्रमाणांत असते तर शहरांची वाढ जास्त प्रमाणांत झाली असती. पण लोकांना दिवसेंदिवस शेतीवर अवलंबून राहावें लागत असल्यामुळे शहरांच्या मानाने खेडयांतील लोकसंख्या वाढत आहे व शहरांची वाढ त्या मानाने कमी होत आहे.

**जमिनीची विभागणी.** आणखी एका दृष्टीनें पाहावयाचें तर लागवडीखाली असलेल्या जमिनीचें दर माणशीं पडणारें प्रमाण होय. १९०१ सालीं दर माणशीं सरासरी १·२८ एकर इतकी जमीन येत होती, तर १९११ मध्ये ती १·२४ एकर झाली आणि १९३१ मध्ये हें प्रमाण १·२ एकर जमीन इतक्यावर आलें. यावरून जमीन अधिकाधिक लोकांत कशी विभागली जात आहे हें दिसून येतें.

**शेतीची स्थिति.** ह्या शेतीवर पडणाऱ्या वाढत्या भाराचा परिणाम दोन तऱ्हेने वाईट होतो. एक तर शेती अधिकाधिक अनुत्पादक होऊं लागली आहे आणि दुसरें म्हणजे तीवर अवलंबून असणाऱ्या लोकांची स्थिति अधिकाधिक अनुकंपनीय होऊं लागली आहे.

शेतीवर ज्याअर्थी जास्त लोक काम करूं लागले आहेत त्याअर्थीं देशांतील लोकांना पुरेल इतकें धान्य सहज उत्पन्न होत असेल असें कोणास वाटेल. परंतु तें खरें नाही. सध्या २० कोटि एकर जमिनीवर साधारणपणें ६ ते ७ कोटि टन धान्य निपजतें. ह्यांतील बीजाकरितां ठेवलेलें आणि निर्गत होणारें जर वजा केलें तर अदमासें ५ कोटि टन धान्य उरतें. आणि सर्व देशांतील लोकांना ८॥ ते ९ कोटि टन धान्य पाहिजे. अर्थात कांही लोकांना अर्धपोटीं राहावें लागतें हें उघडच दिसतें. रावबहादुर विश्वनाथ (सरकारी ॲडव्हायसरी केमिस्ट) यांच्या मतेंही हिंदुस्थानांतील जमिनींत ५ लाख टन नायट्रोजनची कमतरता असल्यामुळे $\frac{2}{3}$ लोकसंख्येला पुरेल एवढेंच धान्य निर्माण होतें.

शेती हा धंदा असा आहे की, ज्याच्यामध्ये शेतकऱ्याला निसर्गाच्या मर्जीवर अवलंबून राहावें लागतें. पर्जन्य योग्य काळीं आणि पाहिजे तितका—कमी अगर जास्ती नव्हे—नेहमींच पडतो असें घडत नाही. सर जॉन मेगॉच्या म्हणण्याप्रमाणें दहा वर्षांत जरी मोठें अवर्षण अगर दुष्काळ पडला नाही तरी दहांपैकी एका खेडयांत तरी अन्नाची दुर्भिक्षता होते.

**एकरीं उत्पन्न.** देशामध्ये शेतीच्या बाबतींत नवीन शास्त्रीय पद्धतीचा अंगीकार न केला गेल्यामुळे किंबहुना शेतकऱ्याच्या असहायतेने व अज्ञानाने त्याला सुधारणा न करतां आल्यामुळे दर एकरीं हिंदुस्थानांत उत्पन्न फारच कमी आहे हें पुढील पत्रकावरून दिसून येईल.

**कोष्टक सोळावें. दर एकरीं १९२२ सालचें उत्पन्न दाखविणारें**

| देश | गहू (बुशेल्स ६०पौ.) | जव (बुशेल्स ५६पौं.) | धान्यें (बुशेल्स ४८पौं.) | तांदूळ पौंड | कापूस पौंड | तंबाखू पौंड |
|---|---|---|---|---|---|---|
| कानडा | १७·८ | ४३·४ | २७·६ | — | — | — |
| संयुक्त संस्थानें | १३·९ | २८·३ | २४·९ | १०९० | १४१ | ७३५·६ |
| इंग्लंड | ३१·२ | — | ३१·० | — | — | — |
| फरान्स | १८·६ | १६·० | २३·९ | — | — | १४२६·१ |
| ईजिप्त | २४·१ | ३६·३ | ३०·१ | १४५६ | ३५२·० | — |
| हिंदुस्थान | १३·० | १५·६ | १९·८ | ९११ | ९८·० | — |
| जपान | २२·५ | २७·७ (१९२१) | ३१·७ | २४७७ | — | — |

**शेतीचे तुकडे.** आमच्याकडील समान वारसा हक्काच्या पद्धतीमुळे आणि शेतीवर पडणाऱ्या बोजामुळे शेतीचे फार लहान लहान तुकडे झाले आहेत. मुंबई व मद्रास प्रांतांत शेताचा आकार सरासरी २–३ एकरांचा असतो. डॉ. मॅन यांनी पुणें जिल्ह्यांतील पिंपळे–सौदागर ह्या खेडयाची पाहाणी केली. तेव्हा त्यांना असें आढळून आलें की, ब्रिटिश अमदानीपूर्वी सरासरी शेतें ९–१० एकरांचीं होतीं व दोन एकरांखालील शेत माहीतही नव्हतें. १७७३त शेतांचा सरासरी आकार ४० एकर इतका होता तो १८१८त १७॥ एकर झाला व १९१९ त ७ एकर झाला. शेंकडा ८० शेतें दहा एकरांखालील असतात व

त्यांपैकी शेंकडा ६० तर ५ एकरांच्या खाली आहेत. ॲग्रिकल्चर कमिशनने शेंकडा ७२ शेतें अनुत्पादक असतात असें म्हटलें आहे. इतकेंच नव्हे तर शेतकी कमिशनने असेंही म्हटलें आहे की, 'जमिनींतून हजारों वर्षं पिकें काढल्यामुळे जमिनीचा सुपीकपणा अशा स्थितीला पोचला आहे की, यापेक्षा जमिनीला निकृष्टावस्था येणें शक्य नाही.'

**शेतकऱ्याचें कर्ज.** शेतीबरोबरच शेतकऱ्याची होत चाललेली अनुकंपनीय स्थिति त्याच्या कर्जबाजारीपणाने व्यक्त होते. एकंदरींत ९५० कोटि रुपयांचें शेतकऱ्यांचें कर्ज आहे अशी अटकळ आहे. म्हणजे दर शेतकऱ्याच्या डोक्यावर ५० रुपये कर्ज सरासरीने पडतें अगर लागवड केलेल्या दर एकरामागे ३६ रुपयांचें कर्ज पडतें. हा कर्जाचा अंदाज १९३१ सालचा आहे. ह्या सात वर्षांत धान्याच्या किंमती उतरल्याकारणाने आणखी कर्जांत भर पडली असेल. शिवाय दर वर्षाचें शेतकऱ्याचें उत्पन्न अंदाजें ४८ अगर ५० रुपये पडतें, तर त्या मानाने हें कर्ज किती तरी आहे हें कोणीही मान्य करील. शिवाय त्यावर सावकार शक्य तितका जास्त व्याजाचा दर आकारीत असतो तो निराळाच !

**शेतकऱ्याची बेकारी.** बरें, शेतीच्या दिवसांखेरीज इतर दिवसांत शेतकऱ्याला स्वस्थ बसावें लागतें. ३६५ दिवसांपैकी फार तर १५० पासून २७० दिवस काम असतें. बंगालमध्ये नुसता ताग पिकविणाऱ्या शेतकऱ्याला तर तीनच महिने काम असतें! अशी बेकारी शेतकऱ्याच्या पदरीं येते. पण ह्या बेकारीची जाणीव ज्या मानाने मजुराला भासते त्या मानाने शेतकऱ्याला वाटत नाही, ह्याचें मुख्य कारण तो आपल्या स्थितीला नशीब मानीत असतो; अर्थात् नशिबापुढे इलाज नाही म्हणून स्वस्थ बसतो आणि आहे त्या स्थितींत दिवस कंठतो. मजुराची स्थिति तशी नसते. शहरामध्ये राहणें अधिक खर्चाचें असतें. शिवाय आपल्या स्थितीला कोणती तरी मानवी संस्थाच

जबाबदार आहे ह्याची थोडी तरी कल्पना त्याला असते. म्हणून त्याची असंतुष्टता वाढत असते. शिवाय एकंदरींत शहरांत राहिल्यामुळे त्याचें सर्वसाधारण ज्ञानही वाढलेलें असतें; तेव्हा ही असंतुष्टता कशी ना कशी तरी संपांच्या वगैरे रूपाने व्यक्त होतेच!

**शेतकऱ्याची असहायता.** एथवर केलेल्या विवेचनावरून देशांतील चारांपैकी तीन लोकांच्या उपजीविकेचें साधन जें शेती त्याची स्थिति कशी काय आहे ह्याची थोडीबहुत कल्पना वाचकांना आली असेलच. ह्याचा सारांश असा की, मूठभर जमीनदार वर्ग सोडून दिला तर सद्य:स्थितींत शेती पोटभर उत्पन्न देऊं शकत नाही. शेतीचे लहान तुकडे असल्यामुळे व लागवडपद्धतींत कांहीही सुधारणा न झाल्यामुळे अगोदरच शेतीचें उत्पन्न फार कमी आहे. त्यामध्ये प्रथम त्याला शेतसारा* भरावा लागतो. सरकारच्या हुंडणावळीच्या दरामुळे धान्याचे भाव उतरले आहेत, त्यामुळे तोच शेतसारा भरावयास त्याला धान्यामध्ये अधिक किंमत द्यावी लागते. शिवाय त्याच्या डोक्यावर कर्ज आहेच. ह्या सर्वांतून सुटण्यास त्याला मार्ग दिसत नाही; म्हणून तो आहे त्या स्थितींत दिवस कंठीत असतो.

**उद्योगधंदे.** उपजीविकेचें दुसरें साधन जें उद्योगधंदे त्याच्याविषयीं आता आपण विचार करूं. शेतीच्या वाढीपेक्षाही देशाला उद्योगधंद्यांच्या वाढीची आवश्यकता जास्त आहे हें तत्त्व सर्व पुरोगामी राष्ट्रांना पटलें आहे. शेतीने नुसता चरितार्थ चालवितां येतो तर उद्योगधंद्यांमुळे देशाला संपन्न करतां येतें. उद्योगधंद्यांची वाढ हें देशाच्या प्रगतीचें एक लक्षण समजण्यांत येतें. देशांतील वाढत्या लोकसंख्येला

---

* खेर मंत्रिमंडळाने मुंबई प्रांतांत एक वर्षापूर्वीचा शेतसारा माफ केला आहे व कांही शेतकऱ्यांना सूट दिली आहे. ह्यावरून त्यांना शेतकऱ्यांविषयीं वाटणारी कळकळ दिसून येते.

वात्र उद्योगधंद्यांतच, पुरोगामी राष्ट्रांकडून देण्यांत येतो. इंग्लंडचेंच उदाहरण घेऊं. औद्योगिक क्षेत्रांत प्रथम पदार्पण करून सुद्धा गेल्या ३० वर्षांत आणखी पावणेपांच कोटि लोकांचा समावेश उद्योग-धंद्यांत झाला आहे. आणि आमच्याकडे दोन कोटींहून कमीच लोक उद्योगधंद्यांत आहेत. आणि हें प्रमाणही घटत आहे. १९०१ सालीं शेंकडा १५ लोक उद्योगधंद्यांत होते तर ३१ सालीं शेंकडा ९ होते. शिवाय उद्योगधंद्यामुळे पडणारें दर माणशीं उत्पन्न किती कमी आहे हें पुढील आकडे दाखवून देतील:—

| | | | |
|---|---|---|---|
| हिंदुस्थान | १२ रु. | इंग्लंड व स्कॉटलंड | ४१२ रु. |
| जपान | १५८ ,, | कानडा | ४७० ,, |
| स्वीडन | ३८४ ,, | संयुक्त संस्थानें | ७२१ ,, |

**भांडवल.** लहान प्रमाणांत चालविलेले व मोठया प्रमाणांत चालविलेले असे उद्योगधंद्याचे दोन विभाग करण्यांत येतात. ज्या ठिकाणीं २० पेक्षा कमी लोक काम करतात ते पहिल्या विभागांत येतात व ज्यांमध्ये २० पेक्षा जास्त लोक काम करीत असून बरेंच मोठें भांडवल गुंतविलेलें आहे ते मोठया प्रमाणांत चालविलेले असें समजण्यांत येतें. हिंदुस्थानांत विस्ताराच्या व लोकसंख्येच्या मानाने मोठया प्रमाणांतील कारखाने फार कमी आहेत व त्यांत शेंकडा १·५ इतकेच लोक गुंतलेले आहेत. कारखान्यांची संख्या ८१४८ आहे व त्यांत ७०० कोटि रु.—त्यांपैकी फक्त ३०० कोटि रु. भांडवल हिंदी आहे—भांडवल गुंतलेलें आहे. इंग्लंडमध्ये १०७५०० कारखाने आहेत आणि त्यांत ७०६७ कोटि रु. भांडवल गुंतलें आहे. जपान तर हिंदुस्थानच्या मानाने चिमुकला देश, पण तेथें सुद्धा १३७११ कारखाने व १००९ कोटि रु. भांडवल घातलें गेलें आहे. त्यांतल्या

त्यांत समाधानाची गोष्ट एवढीच आहे की, येथील कारखान्यांची संख्या व त्यांतील भांडवल पूर्वीपेक्षा वाढत्या प्रमाणांत आहे.

**मुख्य धंदे.** प्रस्तुत ठिकाणीं सर्व उद्योगधंद्यांचा विचार विस्ताराने करणें अप्रस्तुत होईल. करितां त्यांतील मुख्य धंद्यांचा विचार अधिकाधिक किती लोकांना उपजीविकेचें साधन होऊं शकेल एवढयापुरता करावयाचा आहे.

१ कपाशीचा धंदा. १९३४–३५मध्ये केलेल्या अंदाजावरून दर माणसीं १५.६ वार कापडाचा खप आहे असें समजतें. त्यांपैकी गिरण्या ९·०३ वार कापड पुरवीत होत्या, हातमागावर ३·९५ वार निघत होतें व परदेशांतून २·६२ वार येत होतें; अशा रीतीने ही मागणी पुरविण्यांत येते. हिंदुस्थानांत खपणाऱ्या कापडापैकी शेंकडा १७ इतकेंच कापड परदेशांतून येतें. १९३१ मध्ये हातमागांवर व गिरण्यांमध्ये ३१ लक्ष लोक काम करीत होते. त्यांपैकी गिरण्यांत सारे ४·९२ लक्ष लोक काम करीत होते. हिंदुस्थान कापडाच्या बाबतींत पूर्ण स्वयंसिद्ध झालें तरी आणखी या धंद्यांत जास्तींत जास्त २ लक्ष लोकांना वाव मिळेल. कापडाचा दर माणशीं खप वाढला तर, म्हणजेच लोकांची क्रयशक्ति वाढली तर, आणखी कांही लक्ष लोकांना काम मिळेल इतकेंच.*

२ तागाचा धंदा. ह्या धंद्यांत १९३५ सालीं ६$\frac{3}{4}$ लक्ष लोक व २८ कोटि रु. भांडवल गुंतलेलें होतें. जगांतील सर्व उत्पादनाच्या दुप्पट तागाचें उत्पन्न एकटया बंगालमध्ये होतें. पण हा धंदा

---

* नुसता धंदा ह्या दृष्टीने पाहिल्यास त्यांत आश्चर्यकारक प्रगति आहे. पहिल्यापासून सरकारी धोरण विरुद्ध असूनही व अजूनसुद्धा हिंदुस्थान सरकारचा कल लँकॅशायरच्या हिताकडे लक्ष पुरविण्याचा असूनही गिरण्यांची संख्या व त्यांतील भांडवल वाढलें आहे. पण वाढत्या लोकसंख्येच्या दृष्टीने मात्र त्यांतून फारसा आशेचा सूर निघत नाही.

बहुतांशीं परदेशांतील मागणीवर अवलंबून आहे व त्यामुळे या धंद्यांत निश्चितपणा नाही. शिवाय रशियाची चढाओढ ह्या धंद्याला भोवूं लागली आहे. मंदीच्या काळांत तर कांही गिरण्या बंद ठेवाव्या लागल्या व इतर कमी तास काम करीत होत्या. हा धंदा बहुतांशीं परदेशी भांडवल व त्याबरोबरच परदेशी देखरेख ह्यांच्या मदतीने चालला आहे. सध्याच्या हिशेबाने जास्तींत जास्त मागणी वाढली तर आणखी १॥ लाख लोक यांत सामावूं शकतील.

३ लोखंडाचा धंदा. ह्या धंद्यांत काम करणारे ३४५०२ लोक आहेत. त्यांपैकी कारखान्यांत काम करणारे ३०४०० लोक आहेत. देशांत लागणारें लोखंड सर्व देशांतच होतें. इतकेंच नव्हे तर बाहेर पण पाठविण्यांत येतें. १९०० सालीं ३४ हजार टन उत्पादन होतें. तें आता १४ लक्ष टनांपर्यंत वाढलें आहे व पोलादाचें ६ लक्षांपर्यंत वाढलें आहे. सरकारच्या मदतीने व संरक्षणाने ह्या धंद्याची भरभराट झाली. १९४० मध्ये त्याला संरक्षणाची गरज राहणार नाही असा उत्पादकांचा अंदाज आहे.

४ साखरेचा धंदा. देशांतील उद्योगधंदे खासगी प्रयत्नाने वाढत नसतील तर सरकारी संरक्षणाने किती झपाटयाने वाढूं शकतात ह्याचें उत्तम उदाहरण म्हणजे साखरेचा धंदा होय. लढाईपूर्वी २५ लक्ष टन साखर हिंदुस्थानांत तयार होत होती व जवळ जवळ ३५–४० लक्ष टन परदेशांतून येत होती. पण संरक्षण मिळाल्याबरोबर उत्पादन वाढत गेलें व एक दोन वर्षांत देश स्वयंसिद्ध होईल अशी अपेक्षा आहे. तेव्हा देशांतील मागणी वाढल्याशिवाय ह्या धंद्यांत ६५ हजार माणसें काम करीत आहेत त्यांपेक्षा अधिक संख्या सामावणार नाही.

५ कागदाचा धंदा. सध्या ह्या धंद्यांत ५००० लोक काम करीत आहेत. देशांत येणाऱ्या आयात मालाची निपज जर इकडे होऊं लागली तरच ७००० लोक आणखी सामावूं शकतील.

६ खनिज तेल. ब्रह्मदेश हिंदुस्थानापासून वेगळा करण्यांत आल्यामुळे ह्या धंद्याचें महत्त्व कमी झालें आहे. कारण तेलाच्या बऱ्याचशा खाणी ब्रह्मदेशांत आहेत.

७ सिमेंट. ह्या धंद्यांत २० ते २५ हजार लोकांना काम मिळतें. १९३२ सालीं ५ लक्ष टन सिमेंट इकडे तयार होत होतें व परदेशांतून ८३हजार टन आलें. तरी ही आयात थांबल्यास आणखी ३–४ हजार लोकांना काम मिळेल.

८ आगकाडयांच्या पेटया. ह्यांत १७१३७ लोक १९३१ सालीं काम करीत होते.

९ कोळसा व मँगनीज. हिंदुस्थानास पुरेसा कोळसा सध्या येथेच निघतो. उलट तो मागणीनुसार बरोबर पाठवितां न आल्यामुळे पुष्कळसा फुकट जातो. मँगनीजच्या धंद्यांत रशियन चढाओढीमुळे फारसा वाव दिसत नाही.

**उद्योगधंद्यांत लोकसंख्येचा समावेश.** प्रो. कर्वे यांनी आपल्या पुस्तकांत* १९०० सालापासून १९३० पर्यंतचे कांही मोठया धंद्यांचे आकडे देऊन असें दाखविलें आहे की, ह्या ३० वर्षांत मोठया धंद्यांची वाढ शेंकडा २४८ इतक्या प्रमाणांत झाली आहे. पण त्याबरोबर हिंदुस्थानांतील लोकसंख्येची वाढ किती झाली आहे हें पाहिलें तर निराशाच पदरांत येते. कारण १९०० सालीं सर्व उद्योगधंद्यांत ४ लाख लोक काम करीत होते, ती संख्या १० लाख झाली. पण त्याच काळांत एकटया ब्रिटिश हिंदुस्थानांत ४ कोटींची वाढ झाली. कांही नियोजन न करतां मोठया धंद्यांची अशीच वाढ होत गेली तरी सुद्धा २०–२५ लाखांपेक्षा जास्त लोक त्यांत सामावणार नाहीत. पण १९३१–४१ च्या दशकांत कांही जास्त कमी आपत्ति न आल्यास ५ कोटींची

---

* *Poverty & Population in India*–Prof. Karve.

वाढ होईल असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. हिंदुस्थानांतील कांही मोठया प्रमाणावर चालणाऱ्या उद्योगधंद्यांची आपण थोडक्यांत पाहणी केली. तीवरून त्यांमध्ये किती लोकांना अजमासें वाव मिळेल याची साधारण अटकळ बांधतां येते. सध्या जे लोक काम करीत आहेत त्यांपेक्षा ह्याच उद्योगधंद्यांची अधिक वाढ झाल्यास व तदनुषंगानें उत्पन्न होणाऱ्या नव्या व्यवसायामुळे आणखी कांही लोकांना काम मिळेल; पण मोठया उद्योगधंद्यांमध्ये सर्व वाढती संख्या समावेल अशी फारशी आशा तूर्त तरी दिसत नाही. तेव्हा लहान प्रमाणांत चालणाऱ्या धंद्यांपासून लोकांना कितपत आशा आहे, ह्याचा विचार करणें योग्य होईल.

**लहान धंदे.** पाश्चात्य देशांतील यांत्रिक मालापुढे हिंदी मालाचा टिकाव न लागल्यामुळे बरेचसे एतद्देशीय उद्योगधंदे बसले, ही गोष्ट इतिहासप्रसिद्धच आहे. तथापि एतद्देशीय विशिष्ट मागणीमुळे कांही हातमागासारखे धंदे आपला जीव धरून आहेत. मोठया उद्योगधंद्यांच्या जोडीला किंबहुना काकणभर जास्तच ह्या लहान उद्योगधंद्यांचें महत्त्व हिंदुस्थानच्या आर्थिक व्यवस्थेंत राहील. सध्या प्रांतिक व मध्यवर्ती सरकारांनी आपली सक्रिय सहानुभूति ह्या धंद्यांना देण्याचें ठरविलें आहे; तसेंच कांग्रेसनेही ग्रामोद्योग चळवळीने खेडयांतील धंद्यांना उत्तेजन दिलें आहे. तेव्हा ह्या धंद्यांना ऊर्जितावस्था आल्याखेरीज राहणार नाही. तथापि हे उद्योगधंदे विशेषेंकरून खेडयांत असल्यामुळे शेतकरी लोकांना दुय्यम व्यवसाय म्हणून त्यांचा उपयोग फार होईल.

हा त मा ग. लहान प्रमाणांतील धंद्यांपैकी हातमागाचा धंदा विशेष महत्त्वाचा आहे. त्यामध्ये साठ लक्ष लोक गुंतले आहेत. ज्या प्रांतांमध्ये कॉंग्रेस सरकार आहे तेथे खादी सरकारी कामांत वापरण्यांत येणार आहे. अशा तऱ्हेने मागणी बरीच वाढेल व या धंद्याला उत्तेजन येईल. तथापि हातमागाच्या धंद्याला उत्तेजन देतांना हात-

मागावर स्वदेशी गिरणींतील सूत वापरणें योग्य होईल असें आम्हांस वाटतें. खादीची वाढती मागणी पुरविण्यास आणखी पन्नास लक्ष लोकांची जरूरी लागेल असें वाटतें.

लो क री चा धं दा. दुसरा लहान प्रमाणांतील धंदा म्हणजे लोकरीचा धंदा होय. पूर्वी हिंदी गालिचे, सतरंज्या व शाली ह्यांना परदेशामध्ये बरीच मागणी येत होती. एतद्देशीय मागणीपेक्षाही ही मागणी पुरविण्याकरितां हा धंदा बराच जोरांत चालत असे. परंतु या शतकाच्या सुरुवातीपासून परदेशी मागणी बंद झाली, त्यामुळे या धंद्याला बरीच मंदी आली आहे. अगदी थोडया श्रीमंत लोकांखेरीज या महाग जिनसा या देशांत कोणी घेत नाही. कांबळीं करण्याचा धंदा मात्र सर्वत्र आहे व त्यांत सुधारणा करून तो ऊर्जितावस्थेला आणणें शक्य आहे. या हातमागावरील धंद्याकरितां १९३६ सालापासून पांच वर्षेपर्यंत पांच लाख रुपये मदत करण्याचें मध्यवर्ती सरकारने ठरविलें आहे.

रे श मा चा धं दा. रेशीम तयार करणें आणि त्याचा कपडा बनविणें हा एक लहान प्रमाणांत चालणारा धंदा आहे. रेशमांच्या किडयांचें जतन करणें वगैरे बाबतींत सशास्त्र माहिती पुरवून ज्या भागांत किडयांची निपज करणें शक्य आहे त्या भागांत उत्तेजन द्यावें. जपानमध्ये हा धंदा बराच जोरांत चालतो. त्याच्या जोडीला कृत्रिम रेशमी कपडाही निघूं लागला आहे. तो इकडे बराच स्वस्त विकला जात असे, परंतु सरकारने त्याच्यावर १५ टक्के जकात बसविली आहे. सरकारने एतद्देशीय धंद्यास पैशाचीही मदत दिली आहे. तरी हा धंदाही ऊर्जितावस्थेस येईल अशी आशा आहे.

इ त र. कातडीं कमावणें, भांडीं तयार करणें, साबू, जरीचें काम वगैरे बरेचसे इतर धंदे आहेत आणि ते हयापुढे प्रांतिक सरकारच्या अनुकल वातावरणामध्ये भरभराटीस येतील यांत शंका नाही.

परंतु वर म्हटल्याप्रमाणें शेतकरी लोकांना दुय्यम व्यवसाय म्हणून ह्यांचा जास्त उपयोग होईल. व थोडया लोकांना स्वतंत्र धंदा म्हणून उपजीविकेचें साधन होईल.

**बेकारी.** एकंदरींत वरील विवेचनावरून उपजीविकेच्या साधनांची साधारणतः कल्पना येते. ह्या सर्व साधनांची शक्य तेवढी वाढ झाल्यावरही उपासमारीचा प्रश्न शिल्लक राहील की काय हें पुढील प्रकरणांत पाहूं. आता बेकारीच्या प्रश्नाचा थोडक्यांत विचार करून राहणीचा दर्जा कसा आहे तें पाहूं.

**कारणें.** औद्योगिक क्रांतीनंतर निर्माण झालेल्या भांडवलशाही पद्धतींत बेकारी हें एक कायमचें व्यंग होऊन बसलें आहे. युरोपमध्ये २ कोटि व अमेरिकेंत ४० लाख इतके बेकार आहेत. ह्या व्यंगाची तीव्रता शक्य तों कमी करण्याकरितां सरकार हर प्रयत्न करीत असतें. परंतु जोंपर्यंत मालाची पैदास ही जितका उपयोग तितकीच करावयाची असें न होतां नफ्याकरतां करावयाची असें धोरण आहे, तोंपर्यंत कायमची बेकारी नाहीशी होणें शक्य नाही. परंतु अशा तऱ्हेचे मोठे उद्योगधंदे आपल्या देशांत थोडेच आहेत आणि त्यांत काम करीत असलेल्या मजुरांची संख्या देशाच्या मानाने अल्प आहे. हल्लीच्या मंदीच्या काळांत ह्या अल्पसंख्येवरही बेकार होण्याचे प्रसंग येतातच! ह्यांपैकी कांही बेकार लोक काम नसलें म्हणजे पुन्हा 'देशावर' निघून जातात. त्यामुळे त्यांची बेकारी तशी लक्षांत येत नाही. तथापि यावरून बेकारीचा प्रश्न हिंदुस्थानांत कमी महत्त्वाचा आहे असा निष्कर्ष निघत नाही. इकडील बेकारी व पाश्चात्य बेकारी ह्यांत फार फरक आहे. इकडील लोक उद्योगधंद्याच्या अभावीं शेतीकडे वळतात. तथापि तीवर कसा अगोदरच विलक्षण दाब पडला आहे हें आपण मागे पाहिलें आहे. त्यांमध्ये

शहरांतील मजुरांची भर पडली म्हणजे दाब अधिकच वाढतो. बरें ह्या शेतकऱ्यांनाही ३ महिन्यांपासून ९ महिनेपर्यंत कामाशिवाय राहावें लागतें. तेव्हा इकडील बेकारी ही अशा प्रकारची आहे. ह्या देशांतील लहान प्रमाणांतील उद्योगधंदे बसल्यामुळे बहुतेकांना शेतीशिवाय अन्य मार्ग राहिला नाही. त्यांत शेती तर पर्जन्य-राजाच्या मर्जीवर अवलंबून असते. त्याची कृपा झाली तर ठीक, नाहीतर नशिबाला हात देऊन बसण्याची वेळ येते. तसेंच दुष्काळ पडला तर सरकार दुष्काळनिवारणार्थ कामें काढतें व त्यांना शक्य तितकी मदत करतें; पण अपुऱ्या कामामुळे कायमची बेकारी बहुजन-समाजाच्या पाठीशीं लागली आहे, तिचें निराकरण आर्थिक व्यवस्थेंत आमूलाग्र बदल झाल्याशिवाय होणें शक्य नाही.

**मध्यम वर्गांतील बेकारी.** अलीकडे सुशिक्षित मध्यम वर्गांतील बेकारीकडे सर्वांचें लक्ष अधिक लागलें आहे. सरकारी कामकाज पाहण्यास उपयोगी असे लोक तयार व्हावे या उद्देशाने इंग्रजी आमदानीच्या सुरवातीस मुख्यतः शिक्षणक्रम आखण्यांत आला. प्रथमतः ज्यांनी ह्याचा फायदा घेतला ते मागल्या पिढींतले लोक मानाच्या व हुद्द्याच्या सरकारी नोकऱ्या मिळवून प्रतिष्ठित झाले. त्यांचें उदाहरण पुढील पिढीने फार जोराने गिरविण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे हल्ली मागणीच्या मानाने या लोकांची संख्या अनेक पटींनी वाढली आहे. अर्थात् बेकार शिक्षित तरुण दृष्टीस पडावे यांत नवल नाही. या प्रश्नाचें महत्त्व पाहून निरनिराळ्या प्रांतांनी त्याबाबत समित्या नेमल्या. त्यांच्या कांही सूचना विचार करण्यासारख्या आहेत. त्यामध्ये संयुक्त प्रांतांतील सप्रू कमिटीने म्हटलें आहे की, मध्यम वर्गाच्या बेकारीचा संबंध देशाच्या सर्व आर्थिक व्यवस्थेबरोबर निगडित झालेला आहे. बेकारी कमी करण्याकरितां त्यांनी जरी कांही उप-युक्त सूचना केल्या आहेत, तरी पण देशामध्ये लोकसंख्या व उपजी-

विकेचीं साधनें अगर दुसऱ्या शब्दांत म्हणावयाचें म्हणजे उत्पादन आणि व्यय यांचा मेळ बसविल्याशिवाय हा प्रश्न पूर्णपणें सुटणार नाही. इंग्लंडमध्ये सैन्य, आरमार व सरकारी नोकरी ह्यांखरीज सोळा हजार उद्योगधंदे लोकांना मोकळे आहेत, तर तेच आमच्याकडे चाळीसहूनही कमी आहेत! तरी हा प्रश्न सुटण्यास कशा प्रकारचें नियोजन करावयास पाहिजे, ह्याचा विचार शेवटल्या प्रकरणांत करूं.

**राहणीचा दर्जा.** कोणच्याही राष्ट्राची प्रगति कोठवर झाली आहे हें पाहण्याचें एक साधन म्हणजे तेथील बहुसंख्य लोकांच्या राहणीचा दर्जा कसा आहे हें पाहणें होय. लोकांची राहणी सुधारत चालली म्हणजे त्यांचें जीवन सुधारतें. उलटपक्षीं जीवन सुधारलें म्हणजे त्यांना आपल्या ऐहिक व बौद्धिक उन्नतींत भर घालतां येते, हेंही खरेंच आहे. पण साधी राहणी, म्हणजे जी असेल ती अगर शक्य तितक्या गरजा कमी करून राहतां येईल तो राहणी, असें ध्येय लोकांपुढे ठेवल्याने आहे ती परिस्थिति बदलण्याची महत्त्वाकांक्षा खुंटते.* तसें तिकडील लोकांचें नाही. आपल्या सुखसोयींत जेवढी भर घालतां येईल तेवढी ते घालतात. ह्याचा परिणाम निरनिराळे शोध लावून एकंदरींत मानवी जीवन अधिक सुखमय करण्यांत झाला आहे. त्याचबरोबर विध्वंसक शोध लागून मानवी जीवन तितकेंच धोक्यांत आलें आहे; ही खेदाची गोष्ट आहे. पण त्याला कारणें निराळीं आहेत. त्यांचा विचार आपल्यास कर्तव्य नाही.

---

* एच. जी. वेल्सने 'मानवी जातीचें काम, संपत्ति व सुख' या पुस्तकांत लिहितांना हिंदी लोकांविषयीं म्हटलें आहे की, "मानवी उलाढालींचा विचार करतां आपण त्या कोटयवधि हिंदी लोकांना त्यांच्या अपुऱ्या आहारासहित वगळून टाकूं. जागतिक रंगभूमीवर ते अप्रत्यक्ष भाग घेत आहेत. जणू स्वप्नांत असल्याप्रमाणें ते जगत आहेत." (पान ६५९)

तथापि आधुनिक शोधांनी पूर्वीच्या मानाने मानवजातीच्या राहणीचा दर्जा सुधारला आहे यांत मात्र कांही शंका नाही. ह्या सर्वसाधारण नियमाला हिंदी समाज अपवाद नाही. जागतिक घडामोडींमुळे झालेल्या सुधारणा आमच्याही येथे आल्या आहेत. वाहतुकीची सोय, बातमी पोचवण्याची त्वरित योजना, नेहमीच्या आयुष्यक्रमांत अधिक जिनसांचा अंतर्भाव वगैरे गोष्टी हिंदी जीवनांतही आल्या आहेत; पण त्यावरून हिंदी मनुष्याच्या राहणीचा एकंदरींत दर्जा सुधारला आहे की काय, हा प्रश्न आहे.

**किमानपक्ष जरूरी.** मनुष्याला पोटभर अन्न, स्वच्छ पाणी, अंगभर वस्त्र, राहावयास योग्य जागा, आणि नागरिकत्वास योग्य करून सोडणारें शिक्षण हा प्रत्येकाचा जन्मसिद्ध हक्क आहे असें म्हटलें तर त्यांत अतिशयोक्ति होणार नाही. ह्याप्रमाणें जर पाहिलें तर हिंदी बहुजनसमाजाचा दर्जा समाधानकारक आहे, अगर सुधारला आहे, असें म्हणवत नाही.

**सुधारणा की कुधारणा.** मागील प्रकरणांत पाहिल्याप्रमाणें दर माणशीं हिंदी सरासरी उत्पन्न फार कमी आहे. त्यामध्ये गेल्या तीस वर्षांत वाढ झालेली दिसत असली तरी उत्पन्न विषमरीत्या विभागलें आहे. उपजीविकेचीं साधनें फार थोडीं. त्यांत शेतीवर अधिक भर पडत आहे. शेंकडा ६० वर लोकांचीं शेतें अनुत्पादक स्थितींत आहेत.* सर्व प्रांतांत मिळून शेतकऱ्यांना ९०० कोटि रुपये कर्ज आहे असें १९२८ सालीं सेंट्रल बँकिंग कमेटीने म्हटलें होतें. पण कर्जावरील व्याज, मंदीमुळे पडते भाव, हें सर्व लक्षांत घेतां प्रो. टॉमस ह्यांनी असा अंदाज केला आहे की, १९३२ मध्ये हें कर्ज १८०० कोटि रुपये तरी झालें असावें.† याच ४ वर्षांच्या (१९२८–३२) काळांत

* शेतकी कमिशन.

† *Economic Journal.*

शेतीची पैदास मात्र १०१८ कोटि रुपये होती ती ५३६ कोटि रुपये झाली. म्हणजे उत्पन्नाच्या तिपटीने कर्जाचा बोजा आहे. उद्योगधंद्यांच्या अभावीं अपुऱ्या कामाने उत्पन्न होणारी बेकारी खालच्या वर्गांना भोवत आहे, तर मध्यम वर्गांतील शिक्षित तरुणांना काम नसल्यामुळे केव्हा केव्हा आत्महत्या करण्यापर्यंत पाळी येते.* ह्या सर्व गोष्टींवरून हिंदी जनतेच्या राहाणीचा दर्जा सुधारला आहे असें कांही म्हणवत नाही.

वर उल्लेखिलेल्या प्रत्येक बाबीनुसार आता आपण बहुजनसमाजाच्या दर्जाचा विचार करूं. बहुजनसमाजाचा दर्जा म्हणण्याचें कारण एवढेंच की समाजामध्ये जमीनदार, व्यापारी व वरील सुशिक्षित यांचा असा एक अल्पसंख्याक वर्ग आहे की, ज्यांना सर्व आबादानी आहे. पण यांची संख्या अवघी ३ लाख आहे, असें शहा आणि खंबाटा यांचें मत आहे. तेव्हा ३५ कोटींच्या मानाने तीन लाख लोक हे फारच थोडे आहेत, म्हणून त्यांचा प्रश्न तूर्त बाजूला ठेवून बहुजनसमाजाकडे वळूं.

**आहार.** पहिला प्रश्न पोटभर अन्नाचा. सर्व लोकांना पोटभर मिळण्याइतपत धान्य देशांत उत्पन्न होत नाही हें आपण मागे पाहिलेंच आहे. त्यांत आणि देशांतून ५ टक्के धान्याची निर्गत होते. अधिकाधिक लोक शेतीकडे जाऊं लागल्यामुळे शेतीचे लहान लहान तुकडे होत आहेत. ती अगोदरच अनुत्पादक स्थितींत आहे, त्यामध्ये ह्या भरीने अनुत्पादनास मदत होते. शिवाय अलीकडे धान्याची लागवड करण्याऐवजी व्यापारी पिकें अधिक काढण्याकडे लोकांची प्रवृत्ति होऊं लागली आहे. कारण व्यापारी पिकांना भाव जास्त येतो. गेल्या ३४ वर्षांत व्यापारी पिकांखालील जमीन १ कोटी ६८

* नुकतीच एका वकिलाने आपली व आपल्या कुटुंबाची हत्या करून घेतली.

एकरांनी, म्हणजे ३॥ टक्क्यांनी वाढली आहे. तर धान्याखालील जमिनीचें—जरी तिची एकर संख्या वाढली असली तरी—शेंकडा प्रमाण ३॥ टक्क्यांनी घटलें आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांत उत्पन्न होणारें सर्व धान्य जर देशांतच खपलें व त्याची समप्रमाणांत विभागणी केली तर प्रत्येक माणसाच्या वाटणीला दररोज सरासरीने १ पौण्डापेक्षा कमी धान्य येतें. मुंबई प्रांताच्या तुरुंगांत माणशीं १·६९ पासून १·८७ पौंड अन्न मंजूर केलेलें आहे. इतकें अन्न सुद्धा बाहेर दर माणशीं मिळत नाही. तुरुंगांतील अन्न म्हणजे माणसाला किमानपक्ष आवश्यक इतकेंच असतें. तितकें सुद्धा सर्वसाधारण हिंदी मनुष्याला मिळूं नये ? लीग ऑफ नेशन्सने जी पोषक कमिटी नेमली होती तिनें साधारणपणें मनुष्याला २४०० क्यालरी उष्णता मिळेल (१९३६) असा प्रत्येक वेळचा आहार पाहिजे असें म्हटलें आहे. पण अॅक्रॉइडने* म्हटल्याप्रमाणें हिंदी अन्नांत पिष्ट पदार्थांचें प्रमाण जास्त असल्यामुळे तो अयोग्य आहार होतो. आणि अशा आहारांत १७५० क्यालरीच उष्णता असते. शिवाय त्यामध्ये 'संरक्षक' अन्नाचा भाग फार कमी असतो; त्यामुळे मुलें व गरोदर आणि बाळंत स्त्रिया ह्यांच्यावर फार वाईट परिणाम होतो; असें आणखी म्हटलें आहे.

**प्रो. शहांचें म्हणणें.** पण हें निकृष्ट प्रतीचें अन्न तरी लोकांना दोन वेळां मिळत असेल तर ना ? प्रो. के. टी. शहा यांनी म्हटलें आहे की, 'तीन माणसांत एकाला तरी उपाशी राहावें लागतें.' त्याचा परिणाम व्हावयाचा तोच होतो. प्रत्येकाची शारीरिक संपत्ति ढासळत जाते. इतरांच्या मानाने हिंदी लोक अधिक अशक्त व कमी कार्यक्षम आहेत ह्याचें कारण त्यांना पोटभर खावयास मिळत नाही हें होय. अर्धपोटीं राहिल्यामुळे अंगांत शक्ति व उत्साह राहत नाही

---

* *Health Bulletin. 1937.*

आणि अगदी साध्या संसाराला आवश्यक असलेलीं साधनेंही त्यास मिळवितां येत नाहीत.

**मि. डार्लिंगचें मत.** मि. डार्लिंग ह्यांनी पंजाबच्या शेतकऱ्यांचें वर्णन करतांना म्हटलें आहे की, "पन्नास वर्षांपूर्वीच्या व आताच्या शेतकऱ्यांच्या परिस्थितींत कांही एक फरक नाही. वेल वांगीं व कांदे याशिवाय भाजी त्यांना पाहावयास मिळत नाही. रोजच्या अन्नांत लग्नाच्या वेळेला सुद्धा फारसा फरक होत नाही. वेळवांच्या चिवाट्यांचें व कळकाचें वर छप्पर आणि मातीच्या कशा तरी उभारलेल्या चार भिंती हें त्यांचें निवासस्थान. चार गाडगीं मडकीं, एखादें जातें, बाजलें, चरखा, खोरें आणि कामाला न्यावयाची पाटी म्हणजे त्यांचें वैभव." असें हें शेतकऱ्यांचें जीवन !

**महाराष्ट्र कॉंग्रेस कमिटीचें संशोधन.** महाराष्ट्र कॉंग्रेस कमेटीने उदाहरणादाखल दिलेल्या दहा कुटुंबांच्या जमाखर्चामध्ये ८ कुटुंबांना डोईजड कर्ज आहे असें म्हटलें आहे. सहा जणांना जमाखर्चाची तोंडमिळवणी करतां येत नाही. चारांपैकी २ मध्ये मुलगा मजूर म्हणून कामाला आहे, तर एकामध्ये शेतीशिवाय इतर उद्योगधंद्यापासून उत्पन्न येतें म्हणून जमतेम तोंडमिळवणी होते असें म्हटलें आहे. उत्पन्नापैकी शेंकडा ८० भाग अन्नावरच खर्च केला जातो तरी पोटभर अन्न मिळत नाही ! ही स्थिति ज्यांच्याजवळ कांही शेतीवाडी आहे अशांची. पण जे शेतीवर मजूर म्हणून कामें करतात त्यांची स्थिति ह्याहीपेक्षा वाईट आहे. आणि ह्या मजुरांची संख्या वाढतच आहे. १९२१ मध्ये ती अखिल देशांत २ कोटि १६ लक्ष होती तर १९३१ सालीं ३ कोटि १५ लक्ष झाली. त्यांना मजुरी १ ते ३ आणे रोजीं मिळते आणि तीसुद्धा वर्षांतून सहा महिने ! ही संख्या सध्याच्या मंदींत पुष्कळच वाढली असली पाहिजे. त्यांत विशेष हें की, महाराष्ट्रासारख्या रयतवारी प्रांतांत सुद्धा ही

संख्या वाढत आहे. कारण शेती कर्जापायीं जाऊन पुष्कळ शेतकऱ्यांना खंडकरी म्हणून काम करावें लागतें! अर्थात इतक्या थोडया मजुरींत पोटभर अन्न कसें बरें खावयास मिळणार ?

**ॲक्रॉइड ह्यांचें संशोधन.*** ॲक्रॉइड ह्यांनी दक्षिण हिंदुस्थानांत निरनिराळ्या उत्पन्नाच्या—वर्षाकाठीं ५० ते १००० रु. पर्यंत उत्पन्नाच्या—४४ कुटुंबांची अन्नविषयक पाहणी केली. त्यांत त्यांना आढळून आलें की, १९ पासून २२ पर्यंत कुटुंबांचें अपुरें पोषण होतें. ३१ कुटुंबांत दूध घेत नाहीत. प्रोटीन व फॅट हीं पोषक द्रव्यें अन्नांत नसतात. ह्यांपैकी ५० ते ८० रु. वार्षिक उत्पन्नाच्या ८ कुटुंबांतील लोक अर्धपोटीं आहेत असें निश्चितपणें आढळून आलें. दर माणशीं आहारांतील क्यालरीचें प्रमाण १६६४ इतकेंच असतें! मागील प्रकरणांत आपण पाहिलें आहे की, सरासरी दर माणशीं हिंदी उत्पन्न ५० रु. पडतें. ह्या उत्पन्नांत पोटभर अन्न मिळणें अशक्य आहे हें वरील आकडयांवरून अधिक स्पष्ट होतें.

वरील अप्रत्यक्ष माहितीवरून ( पुरेशा पोषक द्रव्यांसहित ) पोटभर अन्न बहुसंख्याक लोकांना मिळत नाही हें तर दिसून येतें. बरें, त्यांचीं घरें कशीं असतात हें सर्वविश्रुत आहेच. उत्पादन वाढल्यामुळें त्यांच्या कपडयाच्या प्रमाणांत मात्र थोडी वाढ झाली आहे एवढें खरें. पण त्यावरून त्यांच्या राहणीचा दर्जा सुधारला आहे असें म्हणवत नाही.

**मजुरांची स्थिति.** तिसरा खालचा वर्ग म्हणजे शहरांतील अल्पसंख्याक मजुरांचा. त्यांची स्थिति शेतकऱ्यांपेक्षा बरी आहे; म्हणजे समाधानकारक आहे असें मात्र नव्हे. मजुराचें उत्पन्न दरमहा २० रु. पासून ९० रु. पर्यंत मुंबईसारख्या शहरांत असतें.

---

* Indian Journal of Medical Research.

त्यांपैकी दर माणशीं दरमहा ९–२–० रु. अन्नावर व १–३–३ रु. कपडयांवर सरासरीने खर्च होतो. पण शहरांत राहण्याची अतिशय अडचण असते. एकाच खोलींत १९–१६ माणसें वेळेला राहतात! शेंकडा ८१ लोकांना एका खोलीवर जागा मिळत नाही. बरें करमणुकीचीं कांही साधनें उपलब्ध न झाल्यामुळे ते दारू पिऊं लागतात आणि कर्जबाजारी होतात. शेकडा ७५ लोकांना कर्ज असतें. ह्या कर्जाबद्दल लेबर कमिशनने (अहवाल, पान २२४) म्हटलें आहे की, "मजुराच्या कमी प्रतीच्या राहणीला असलेल्या कारणांपैकी एक अतिशय महत्त्वाचें कारण त्यांचा कर्जबाजारीपणा होय. आमचें असें ठाम मत आहे की, ह्या कर्जाच्या जाचामुळे मजुराला हीनपणा येतो व त्याची कार्यक्षमता कमी होते. कार्यक्षमतेच्या बाबतींत कर्जबाजारीपणा ही धोंड आहे. कारण त्यामुळे त्याची प्रयत्नशीलता नष्ट होते."

**मध्यम वर्ग.** मध्यम वर्गांतील राहणीचा दर्जा कसा आहे हें आता पाहूं. इंग्रजी अमदानीच्या पहिल्या काळांत ज्या लोकांनीं आपला फायदा करून घेतला त्यांपैकी बहुतेक ह्या वर्गांत मोडतात. पण उच्च शिक्षणामुळे होणारा आर्थिक फायदा एका पिढीपलीकडे दुसऱ्या पिढीला लाभला नाही. ह्याचा असा परिणाम झाला आहे की, ह्या लोकांच्या गरजा पूर्वीच्या मानाने अधिक वाढल्या आहेत. पण वाढत्या बेकारीमुळे उत्पन्न घटत आहे. पूर्वीचा आब राखण्याकरितां त्याला खर्च कमी करवत नाही आणि उत्पन्न तर येत नाही. मग मध्यमवर्गीय मनुष्य जी पहिली गोष्ट करूं लागतो ती म्हणजे शक्यतों आपल्या पोटाला चिमटा घेऊं लागतो! अर्थात् ह्याला तुलनात्मक आकडे देतां येत नाहीत ही गोष्ट खरी आहे. पण जेथे दोन शिक्षित तरुणांत एक बेकार असें साधारणपणें प्रमाण पडतें तेथे राहणीचा दर्जा खालावला आहे असें म्हणणें चुकीचें होणार नाही.

**स्त्रियांची संख्या.** पण आमच्या मतें राहणीचा दर्जा खालावत चालला आहे ह्याचें मुख्य द्योतक दर दहा वर्षांच्या खानेसुमारी रिपोर्टावरून पाहतां स्त्रियांची संख्या घटत चालली आहे हें होय. तसेंच त्यांच्यामध्ये मृत्यूचें प्रमाण अधिक आहे. एकंदरींत त्यांच्या एकाही वयोमान गटाच्या आयुर्मानांत वाढ झाली नाही. (कोष्टक तिसरें पहा.) समाजाच्या खालावलेल्या आर्थिक स्थितीचा मुख्य फटका स्त्रियांनाच बसतो. अगदी साध्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे घरांत पोटभर अन्न नसलें तर पुरुषांना शक्य तितकें घालून बायका जें उरेल त्यावर राहतात. हें अगदी सर्वांच्या परिचयाचें आहे. गरोदर व बाळंत स्त्रिया यांना अधिक आहाराची जरूरी असते, पण घरांतच पुरेसें नसल्यास त्यांना कोठून मिळणार? अर्थात वाढत्या गर्भाचें व स्तनपान करणाऱ्या बालकाचें पोषण तिला स्वतःच्या शरीरांतील द्रव्यें देऊन करावें लागतें. ह्या सर्वांचा परिणाम म्हणजे अशक्त होणारी प्रकृति आणि येणारें अकालीं मरण! शिवाय मातांची मृत्युसंख्या किती जबरदस्त आहे हें आपण दुसऱ्या प्रकरणांत पाहिलेंच आहे. सारांश काय की, स्त्रियांचें घटतें आयुर्मान व घटणारी संख्या हें देशाच्या आर्थिक विपन्नावस्थेचें अतएव खालावलेल्या राहणीच्या दर्जाचें भरीव द्योतक आहे.

देशाच्या आर्थिक स्थितीचें अवलोकन गल्या व ह्या प्रकरणांत लोकसंख्येच्या प्रश्नापुरतें केलें आहे. त्यावरून देशाची आर्थिक अवनति लक्षांत येण्यास कोणतीही हरकत नाही. तरी ह्या सर्व अनर्थाला कोण जबाबदार आहे असा प्रश्न स्वाभाविकपणेंच उद्भवतो. ह्या प्रश्नाचें उत्तर पुढील प्रकरणांत पाहूं.

---

## प्रकरण सहावें

# कारणमीमांसा

**समालोचन.** हिंदी लोकसंख्येचें चित्र जें मागील प्रकरणांत रेखाटण्यांत आलें आहे त्याचा थोडक्यांत प्रथम आढावा घेऊन नंतर कारणमीमांसा करणें योग्य होईल. लोकसंख्या, क्षेत्रफळ आणि दर माणशीं सरासरी उत्पन्न ह्या दृष्टीने हिंदुस्थान इतर राष्ट्रांच्या मानाने कशा परिस्थितींत आहे हें आपण उपोद्घातांत पाहिलें. त्यावरून मर्यादित क्षेत्रांत कोटयवधि लोकांचा समावेश झालेला दिसून येतो. त्यांतच त्यांचें अगदी कमी असलेलें उत्पन्न विशेष ठळकपणाने दिसून येतें. संख्येच्या बाजूने पाहिलें तर १८७१ ते १९२१ सालच्या ५० वर्षांत म्हणण्यासारखी भर पडली नाही तरी १९२१ ते ३१ च्या दरम्यान ३ कोटींची वाढ झाली आहे. आणि १९३१ पुढील वर्षांत ही वाढ अशीच होत राहिली आहे. पाश्चात्य राष्ट्रांप्रमाणे ह्या संख्येला देशान्तराचा मार्ग खुला नाही. उलट परदेशस्थ हिंदी लोकांची स्थिति शोचनीय असून त्यांनाच मायदेशाकडे परत फिरावें लागत आहे. बरें, जी ही संख्येंत वाढ होत आहे ती मानवी शक्तीचा भयंकर मोबदला देऊन होत आहे ! जननसंख्या जास्त, त्याच्या जोडीला बालमृत्युसंख्या अधिक आणि एकंदरींत मृत्युसंख्येचेंही प्रमाण जास्त आहे. स्त्रियांची संख्या घटत आहे. ह्या सर्वांवर ताण म्हणूनच की काय देशांतील लोकांचा हरएक तऱ्हेने दर्जा कमी प्रतीचा आहे. त्यांचें आयुर्मान कमी आहे. निरक्षरता आहेच व आर्थिक उत्पादनही कमी आहे.

दुसरी बाजू लक्षांत घेतां सरासरी दर माणशीं उत्पन्न कमी असून तें वाढविण्यास उपजीविकेचीं साधनें फार थोडीं आहेत. जीं

साधनें उपलब्ध आहेत त्यांची स्थिति समाधानकारक नाही, शिवाय कर्जाचा प्रश्न येतोच! अपुऱ्या कामाची बेकारी, सुशिक्षितांची बेकारी असे प्रश्न आज समाजापुढे उभे आहेत. ह्या सर्वांचें द्योतक म्हणूनच की काय राहणीचा दर्जा अगदी असमाधानकारक आहे.

अर्थातच मग असा प्रश्न उपस्थित होतो की देशाच्या ह्या सद्यः-परिस्थितीला जबाबदार कोण?

**राजकीय परावलंबन.** अनेक वर्षांची राजकीय परतंत्रता* आणि त्यायोगें निष्पन्न होणारी आर्थिक अवनति ही सर्वांच्या बुडाशीं आहे. ही इतकी सूर्यप्रकाशाएवढी ढोबळ गोष्ट आहे की, ती सिद्ध करण्यास कोणत्याच दिवटीची जरूरी नाही. देशाचें उत्पादन अगर उत्पन्न वाढण्यास किंवा आंतरराष्ट्रीय संबंधांत देशाचा आर्थिक दर्जा वाढण्यास कसलीच पद्धतशीर उपाययोजना आजवर करण्यांत आली नाही. समाजोन्नतीस आवश्यक असें शिक्षण, उद्योगधंदे व स्वसंरक्षण ह्या बाबतींत देशाची उपासमार करण्यांत आली आहे. देशाच्या विधायक शक्तीवर मुळांतच घाव घालण्यांत आला आहे. कंपनी सरकारच्या राज्यांत तिकडील माल इकडे खपवून इकडील उद्योगधंदे अजीबात बसवून टाकले. पुढेही अगदी अलीकडील काळापर्यंत, म्हणजे १९१८ सालापर्यंत, खुल्या व्यापाराचें तत्त्व

---

* सध्याच्या स्थितीला "मुख्य कारण म्हणजे परकीय सरकार हे होय. महत्वाचे कायदे व धोरण लोकांच्या पूर्ण संमतीशिवाय ह्या राज्य-व्यवस्थेंत आखलें जातें. आणि लोकांना त्याप्रमाणें राहणें भाग पडतें." "प्रत्येक स्वतंत्र देशांतील सरकार संपत्तीच्या उत्पादनास व वाढीस लोकां-करवी मदत करतें. बेकार लोकांना काम देतें. आर्थिक क्षेत्रांतील कार्यास उत्तेजन देतें आणि देश शक्य तितका स्वयंसिद्ध करतें. पण हिंदुस्थानांत ह्या सर्व बाबतींत उलट प्रवृत्ति दिसून येते." (आर्थिक नियोजन—सर विश्वेश्वरय्या—पान २१०)

इंग्लंडला मानवतें म्हणून हिंदुस्थानालाही लागू करण्यांत आलें. त्यामुळे कुठल्याच धंद्याला भरभराट येणें अशक्य झालें. रेल्वेची वाढ करून तद्देशीय माल अधिक सवलतीने गावोगावीं पाठविला जात असे. अनेक रूपाने संपत्तीचा प्रवाह बाहेर जातच आहे. शिवाय चलन-पद्धतीचें धोरण हिंदी लोकमताविरुद्ध व हिंदी तज्ज्ञांच्या सूचनेविरुद्ध असून तें देशाच्या औद्योगिक प्रगतीस हितकर होईल असें आखण्यांत आलें नाही. महायुद्धोत्तर काळीं मात्र सरकारी धोरणांत थोडा हिंदुस्थानाला हितकारक असा बदल झाला होता. म्हणून थोडेंफार संरक्षक जकातीचें धोरण अवलंबण्यांत आलें. पण त्याला मारक म्हणूनच की काय तज्ञांच्या मतें आर्थिक उन्नतीच्या दृष्टीने निरुपयोगी असा १९३६ सालचा सुधारणा कायदा हिंदुस्थानास देण्यांत आला आहे. त्यांमध्ये ब्रिटिश व्यापारी, भांडवलवाले इत्यादिकांचे 'कायमचे हितसंबंध' संरक्षण्याकरितां अनेक तऱ्हेने सरकारने आपल्या हातांत सत्ता राखून ठेविली आहे. इतर देश पहा! ते उत्तरोत्तर उद्योगधंद्याकडे आपलें लक्ष घालीत आहेत, तर हिंदुस्थान अधिकाधिक शेतकी-प्रधान होत चालला आहे. तिकडे शहरांची संख्या व वस्ती वाढत आहे तर इकडे खेडेगावांतील वस्ती वाढत चालली आहे; देशावरील वाढतें कर्ज, कमी उत्पन्न, विविध व्यवसायांचा अभाव अशा एक ना दोन तऱ्हेने परकीय अमलाचे परिणाम जनतेला भोगावे लागत आहेत. बरोबरच आहे! 'मायेशिवाय रड नाही आणि जाळाशिवाय कढ नाही.' परकीयांनी आमच्या हितानहिताकडे लक्ष दिलें नाही तर आश्चर्य नाही!

**सामाजिक दोष.** ह्या राजकीय परावलंबनामुळे झालेल्या आर्थिक पिछेहाटीनुसार हिंदुस्थानाला सध्याची स्थिति प्राप्त झाली आहे असें आमचें मत आहे. इतकेंच नव्हे तर परकीय अमलामुळे आमच्याकडील सामाजिक दोषांची वाढ झाली आहे. हिंदुस्थानांत

निरनिराळे धर्म आहेत, अनेक जाती आहेत, बालविवाहासारख्या दुष्ट चाली आहेत, लोकांत अज्ञान व धर्मभोळेपणा आहे, इत्यादि दोष विशेषतः परकीयांकडून पुष्कळ वेळां पुढे केले जातात आणि त्यामुळे देशाची मागसलेली स्थिति आहे असें सांगण्यांत येतें. वरील दोष हिंदी समाजांत नाहीत असें आमचें म्हणणें नाही. परंतु स्वतंत्र हिंदुस्थानांत हे दोष खात्रीने सुधारावयास लागले असते तर उलट आज त्यांतील कांही दोष परकीय अमलामुळे वाढीस लागले आहेत. उदाहरणार्थ, धर्माधर्मांतील वैमनस्य! एकराष्ट्रीयत्वाच्या भावनेखाली स्वतंत्र हिंदुस्थानांत तें केव्हाच दडून गेलें असतें. परंतु सरकारने १९०३ सालापासून जातवार प्रतिनिधित्वाची पद्धत राजकारणांत घुसडून दिल्यामुळे धर्मभिन्नतेला वाढतें महत्त्व मिळालें. तेंच, जेव्हा निरनिराळ्या देशांतील लोक अमेरिकेमध्ये प्रथम वसाहत करावयास गेले तेव्हा त्यांच्या धर्ममतांतही फार विरोध होता; पण आज त्या देशाचे धर्मामुळे तुकडे न पडतां एक राष्ट्र झालें आहे. तुर्कस्थानांत तर पूर्वी बायकांना पडद्यांत राहावें लागत असे. पण त्यांच्याच पुढाऱ्यांनी जेव्हा त्यांना पडद्याबाहेर काढलें तेव्हा त्या पुढे आल्या आणि आमच्याकडे तर अजूनही पडद्याची चाल बऱ्याच ठिकाणीं आहे. तशाच दुसऱ्या अनेक अनिष्ट चाली रूढ आहेतच! साक्षरतेची तीच गोष्ट. हिंदी सरकाराजवळ शिक्षणाप्रीत्यर्थ खर्च करावयास केव्हाच पुरेसा पैसा नव्हता, तेंच रशियाने २० वर्षांत सर्व देशाला साक्षर व सज्ञान केलें! अशा एक ना दोन गोष्टी दाखवून देतां येतील. एवढें खरें की, आमची भौगोलिक परिस्थिति, इत्यादि कांही नैसर्गिक गोष्टी देशाच्या प्रगतीला थोड्या प्रतिकूल आहेत. परंतु त्याच सर्वस्वी हिंदी देशाच्या अपकर्षाला जबाबदार आहेत असें म्हणतां येणार नाही.

**जननसंख्येच्या प्रमाणाचीं कारणें.** इतकें सामान्य विवेचन केल्यानंतर विशिष्ट कारणपरंपरेकडे वळूं. प्रथम आमच्या देशांत

पाश्चात्य देशांपेक्षा अधिक परंतु ईजिप्त व चीन ह्या देशांपेक्षा कमी असें जननसंख्येचें प्रमाण कां असतें तें पाहूं. पाश्चात्य राष्ट्रांतील लोकांचा राहणीचा दर्जा वाढला आहे. स्त्रियांना स्वतंत्रता आहे. तसेंच बऱ्याचशा स्त्रिया आर्थिक उत्पादनांत गुंतल्या आहेत. आपली जी राहणी आहे तीच पुढील पिढीला असावी ह्या उद्देशानें व मुख्यत: स्त्रियांच्या कार्यांत मातृपद आड येऊं नये ह्याही हेतूनें बुद्धयाच संतति-नियमन करण्यांत येतें. त्यामुळे अलीकडील वर्षांत पाश्चात्य संस्कृतीच्या सर्व राष्ट्रांत जननसंख्या कमी झालेली दिसून येते. हीं कारणें हिंदुस्थान, ईजिप्त व चीन ह्या देशांत नाहीत. उलट कमी उत्पन्न, अतएव खाला-वलेला राहणीचा दर्जा व अज्ञान ह्यांच्या योगानें जननसंख्या अधिक आहे. "दारिद्र्य आणि जननसंख्येची वाढ हीं परस्परांना कारणीभूत होतात" असें कॉक्स यानें म्हटलें आहे.* "जशी आर्थिक परिस्थिति खालावत जाते तशी कुटुंबांची संख्या वाढते. कुटुंबांची संख्या वाढल्यामुळे राहणीचा दर्जा खालावतो. तर कांही ठिकाणीं दारिद्र्या-मुळे कुटुंब वाढतें. दोहोंतील कार्य कोणतें व कारण कोणतें हें मात्र बरोबर सांगतां येत नाही." असें डॉ. मॅनने हिंदी खेडेगावांविषयीं केलेल्या पाहणींत म्हटलें आहे. उपर्युक्त तीनही देशांत लोकांच्या राहणीचा दर्जा वाढलेला नाही. स्त्रियांना स्वतंत्र जीवन माहीत नाही. लोकांमध्ये विविध प्रकारच्या आयुष्याचा, करमणुकीच्या साधनांचा अभाव आणि जनन मरण हें दैव अगर देव यांच्या अधीन ही ठाम समजूत. अशा ह्या अनेक गोष्टींमुळे जननसंख्येवर कसलाच दाब राहत नाही आणि ती वाढत जाते.

**इकडील विशिष्ट कारणें.** आपल्याच देशापुरतें बोलावयाचें तर आपल्याकडे लग्न करण्याची सररहा प्रथा दिसून येते. प्रजोत्पादन करून पितृऋण फेडलें पाहिजे असें हिंदुधर्म सांगतो. म्हणून एका

*Problem of Population–Cox, Page 110.

बायकोपासून पुत्रसंतान झालें नाही तर शक्य असल्यास दुसरी करण्यांत येते. महंमदानेही म्हटलें आहे की, "लग्न केलें म्हणजे मनुष्य अर्धा धर्म पुरा करतो." म्हणून हिंदुस्थानामध्ये शंभर स्त्रियांमध्ये ४९ स्त्रिया व शंभर पुरुषांमध्ये ४७ इतके विवाहित आहेत; १६ विधवा व ५ विधुर आहेत. ह्यावरून विवाहाची प्रथा दिसून येते. विवाह हा शारीरिक गरज भागविण्याचा उत्तम मार्ग व भावी प्रजेच्या पालनाकरितां स्त्रीपुरुषांना जबाबदार धरण्याचा स्वाभाविक उपाय, ह्या दृष्टीने विवाहाची सररास चाल योग्य आहे असेंच म्हणावें लागेल. पण मातापिता होण्याची पात्रता नसतांही अगर ती जबाबदारी ओळखण्याची शक्ति येण्यापूर्वीच विवाहबद्ध होणें अयोग्य होय.

**विवाहसमयीं वय.** विवाह कोणत्या धर्मांत कुठल्या वयांत होतात हें पुढील कोष्टक दाखवून देईल.

**कोष्टक १७ वें. स्त्रीचें लग्नसमयीं वय.**

(एकदर लग्नसंख्येमध्ये भिन्न भिन्न वयांत झालेल्या लग्नांचें प्रमाण.)

| धर्म | १५च्या खाली | १५ ते १९ | २० ते २९ | ३० च्या पुढे |
|---|---|---|---|---|
| सर्व धर्म | ४०·७ | ४३·६ | १३·८ | १·९ |
| हिंदु | ४५·३ | ४३·४ | ९·९ | १·४ |
| मुसलमान | ३०·१ | ४३·६ | २३ | ३·३ |
| ख्रिश्चन | ३४·२ | ५१·६ | १२·९ | १·३ |
| शीख | ३६·७ | ४५·५ | १५·६ | २·२ |

हिंदूंतील वरच्या जातींखेरीज बहुतेक सर्व जातींत व मुसलमान, जैन ह्या धर्मांतही बालविवाहाची चाल रूढ आहे. पण त्यांतल्या त्यांत ती हिंदूंमध्ये अधिक प्रमाणांत रूढ आहे.

बालविवाहाचा एक परिणाम बालमृत्युसंख्या वाढण्याकडे होतो. म्हणजे बालविवाह हाच केवळ आमच्याकडील बालमृत्यु-संख्या जास्त असण्याला कारण आहे, असें मात्र नव्हे. पण स्त्रीच्या शरीराची पूर्ण वाढ होण्यापूर्वीच जर तीस मातृपद आलें तर बाल-काची वाढ नीट होत नाही. खालील आकडे बालविवाहाचा प्रजेवर होणारा परिणाम दाखवून देतील.

| लग्नसमयीं स्त्रीचें वय | सरासरी दर कुटुंबांत मुलांचें प्रमाण | दर कुटुंबांत सरासरी जिवत मुलांचें प्रमाण |
|---|---|---|
| १३–१४ | ५·९५ | ३·७७ |
| १५–१९ | ६·२६ | ४·२४ |
| २०–२९ | ५·४७ | ३·७७ |
| ३० च्या वर | ३·५७ | २·३३ |

**बालविवाहाचे परिणाम.** वरील आकड्यांवरून २० वर्षां-च्या आंत झालेल्या विवाहापासून होणाऱ्या अपत्यांपैकी जिवंत राह-णाऱ्या मुलांचें प्रमाण कमी असतें असें दिसून येतें. दिल्ली येथील लेडी हार्डिंज् कॉलेजच्या प्रिन्सिपॉल म्हणतात, "लवकर मातृत्व प्राप्त झालेल्या स्त्रीचें मूल कमजोर, रोगाचा प्रतिकार यरण्याची शक्ति नसलेलें व वजनाने कमी असतें."

बालविवाहाने संततीवरच अनिष्ट परिणाम होतात असें नव्हे, तर स्त्रियांना ऐन उमेदीच्या काळांत मृत्यु येतो. १९३१ चा खाने-सुमारीचा अहवाल म्हणतो, "बऱ्याच विवाहित स्त्रियांच्या उदाहरणां-वरून असें आढळून येतें की, जर विवाहाची पूर्ति लवकर म्हणजे मुलगा १६ वर्षांच्या आंत व मुलगी १२ ते १३ च्या आंत असतांना झाली तर ह्यांपैकी बऱ्याचशा स्त्रिया विवाहापासून १० वर्षांच्या आंत क्षयादि फुप्फुसांच्या विकाराने किंवा गर्भाशयाच्या रोगाने मरण

पावतात." अशा तऱ्हेने संतत्युत्पादनाच्या काळांत स्त्रिया मृत्यु पावल्यामुळे जननसंख्या घटते. हिंदूंच्या मानाने मुसलमानांत प्रौढविवाह असल्यामुळे त्यांची जननसंख्या जास्त असण्याचें तें एक कारण आहे.

**विधवाविवाहाची बंदी.** ईजिप्त वगैरे देशांच्या मानाने जननसंख्या कमी असण्याला दुसरें कारण म्हणजे विधवांची फार मोठी संख्या हें होय.

| वय | संख्या |
|---|---|
| ०–१५ | ३,२१,७०१ |
| १५–५० | १,४३,१७,४८८ |
| ५० च्यावर | १,१६,०९,२७९ |

म्हणजे तीन लक्षांपेक्षा अधिक विधवा मुली आहेत. शिवाय संतत्युत्पादनक्षम अशा दुसऱ्या १ कोटि ४३ लक्ष विधवा स्त्रिया आहेत; आणि स्त्रियांची संख्या घटत आहे हें आपण मागल्या प्रकरणांत पाहिलेंच आहे. ह्या सर्व कारणांमुळे हिंदुस्थानची जनन-संख्या इतकी कमी असावी. गेल्या दशकांत थोडें जननाचें प्रमाण कमी दिसतें. त्यास वरील कारणें जबाबदार असावीं. जननाचें प्रमाण कमी होणें हें आमच्याकडे तरी सुस्थितीचें द्योतक आहे असें आम्हांस वाटत नाही.

**सारांश.** एका बाजूने वरील कारणें जननाचें प्रमाण वाढूं देत नाहीत, तर कांही कारणें त्या वाढीला अनुकूल आहेत. बहुजन-समाजाचा आर्थिक व शैक्षणिक कमी प्रतीचा राहणीचा दर्जा, निसर्ग-स्वाधीन जीवन, स्त्रियांचा परावलंबीपणा, कांही प्रमाणांत मुसलमानांत व हिंदूंच्या खालील जातींत बहुपत्नीत्वाची चाल, बालकांविषयींच्या जबाबदारीचा आईबापांना वाटणारा अभाव, एकत्र कुटुंबपद्धति, वगैरे गोष्टी वाढीला मदत करीत आहेत. म्हणून आपल्याला पाश्चात्त्य

राष्ट्रांच्या मानाने बरीच जास्त परंतु कांही ईजिप्तसारख्या राष्ट्रांच्या मानाने कमी असें जननाचें प्रमाण आपल्या येथे दृष्टीस पडतें.

**मृत्युसंख्येच्या प्रमाणाचीं कारणें.** ज्याप्रमाणें जननाच्या बाबतींत, त्याचप्रमाणें मृत्युसंख्येच्या प्रमाणाच्या बाबतींतही आपला देश मागासलेल्या राष्ट्रांच्या जोडीस बसतो हें आपण दुसऱ्या प्रकरणांत पाहिलें आहे. आमच्या येथे हें प्रमाण इतकें जास्त असण्याचें मुख्य कारण म्हणजे आमची गरीबी, शिक्षणाचा अभाव व त्यामुळे खालावलेला राहणीचा दर्जा हें होय. अपुरा आहार हें ह्या राहणीचें कसें द्योतक आहे हें आपण मागील प्रकरणांत पाहिलेंच आहे. त्यायोगें लोकांची जीवनशक्ति कमी होते आणि निरनिराळ्या रोगांना लोक स्वाभाविकपणें बळी पडतात.

ह्यांपैकी निम्मी किंवा त्याहूनही जास्त मृत्युसंख्या कमी करतां येणें शक्य आहे. मात्र लोकांची रोगप्रतिरोधक शक्तीही वाढली पाहिजे. सर जॉन मेगॉ ह्यांनी १९३३ सालीं केलेल्या खेडेगावांतील पाहणीमध्ये त्यांना असें आढळून आलें की, "३० लक्ष लोकांना गुप्त रोगांनी पछाडिलें आहे. २० लक्ष लोकांना क्षय झाला आहे. घाणेरडें अन्न खाल्ल्यामुळें ६० लक्ष लोकांना रात्रीचें दिसत नाही. तितकेच लोक आंधळे आहेत. मलेरिया दरवर्षी ९० लक्ष बळी घेतो. हा आकडा एक कोटीपर्यंतही जाण्याचा संभव आहे!"

**आर्थिक स्थिति.** देशांतील २४ कोटि लोक केवळ शेतीवर अवलंबून असल्यामुळे, शेतीचें उत्पन्न किती कमी आहे हें मागे दिसून आलेंच आहे. दुष्काळ अगर अतिवृष्टि अशा नैसर्गिक आपत्तींने लोक किती त्रस्त होत असतील ह्याची कल्पनाच करणें बरें! ह्या आपत्तींचा परिणाम लोकसंख्येच्या वाढीवरही कसा प्रतिकूल

होत होता हें पहिल्या प्रकरणांत वाढीचें पृथक्करण करतांना पाहिलें आहे. लोकांच्या चळवळीमुळे सरकारने दुष्काळनिवारणार्थ कायम फंड उभारून व इतर अनेक रीतींनी उपाययोजना केली, त्यामुळे ह्या शतकांत दुष्काळाने प्रत्यक्ष बळी घेतलेले दिसत नाहीत. पण याचबरोबर लोकांच्या राहणींत सुधारणा न झाल्यामुळे लोक वर दर्शविल्याप्रमाणें निवारण करतां येण्यासारख्या रोगांना बळी पडत आहेत. शिवाय जे लोक साथीच्या तडाख्यांतून वाचतात त्यांना वेळेला कायमचा दुबळेपणा येतो आणि आजारीपणांत दिवस आणि शक्ति ह्यांचा व्यय होतो तो निराळाच.

**रोगनिवारक मार्ग.** रोगांचें निवारण दोन प्रकारें करतां येण्यासारखें आहे. एक तर रोग होऊं न देण्याकरितां शक्य ती खबरदारी घेणें. ह्यामध्ये किमानपक्ष राहणीच्या दर्जाने प्रजेची प्रकृति सुदृढ ठेवणें हें प्रथम येतें. दुसरें अस्वच्छ व अपुरें पाणी, खेडेगावांत सार्वजनिक स्वच्छतेबद्दल दिसून येणारी उदासीनता, हवा व उजेड भरपूर नसलेलीं घरें, सांडपाणी, गटारें वगैरेबद्दल गैरसोय, ह्या सर्वांमुळे सार्वजनिक आरोग्य बिघडतें; तें न बिघडूं देणें हें होय. बरें, दुसऱ्या रीतीने रोगाला आळा घालणें म्हणजे रोगनिवारणार्थ जरूर त्या औषधपाण्याची तरतूद करणें हें होय. पण प्रो. विनयकुमार सरकारांनी म्हटलें आहे, "रोगप्रतिबंधक अगर निवारक ह्या दोनही दृष्टया हिंदुस्थानांत योग्य तरतूद नाही." १९३२ सालीं ब्रिटिश हिंदुस्थानांतील २७ कोटि लोकांकरितां ६६३१ रुग्णालयें व दवाखाने होते, म्हणजे ४० हजार लोकांना एक दवाखाना असें प्रमाण पडतें. एकदरींत ६९८३९ इतके बिछाने आहेत म्हणजे ३८८० लोकांना एक बिछाना असें प्रमाण पडतें, तर जर्मनींत १७४ लोकांना एक असें प्रमाण आहे. तसेंच २७ कोटि हिंदी जनतेंत अवघ्या ७८० स्त्री डॉक्टर आहेत, तर जपानच्या ६ कोटि लोकांत २२१४ आहेत.

"मुंबई इलाख्यांतील २० हजार माणसांना एक डॉक्टर असें प्रमाण पडतें," असें म्हणून डॉ. देशमूख ह्यांनी ता. ७ मे १९३७ रोजीं केलेल्या भाषणांत वरील गोष्टीची सत्यता प्रतिपादिली आहे. त्यामध्ये विशेष हें की, रुग्णालयें वगैरे जरी गरीब लोकांकरितां उघडण्यांत आलीं असलीं तरी तीं बऱ्याच खेडेगावांना दूर असल्यामुळे त्याचा फायदा श्रीमंत लोकांनाच घेतां येतो. यामुळे बिचारे गरीब लोक मंत्रतंत्र, जादूटोणा वगैरे उपाय करीत असल्यास नवल काय? औषधपाण्यावाचून लोकांचे होत असलेले हाल पाहून "वैद्यकीय धंदा तरी सार्वजनिक केला पाहिजे" असें जें रूटरने म्हटलें आहे तें पटतें. समाजसत्तावादाचें तत्त्व सर्वांनाच पटेल असें नाही. तथापि औषधपाणी आणि डॉक्टर व परिचारिका ह्या सरकारनियुक्तच असाव्यात असें म्हटलें तर त्यांत समाजाचें हितच आहे.

**बालमृत्यूच्या प्रमाणाचीं कारणें.** वर दिग्दर्शित केलेलीं आर्थिक व सामाजिक कारणें जीं आमच्या मृत्युसंख्येच्या अधिक प्रमाणाला जबाबदार आहेत तींच बालमृत्युसंख्या व स्त्रियांची घटणारी संख्या यालाही जबाबदार आहेत. तथापि ज्या अर्थी हजारांत १८० म्हणजे एकंदरीने दरवर्षीं जवळ जवळ १९ लक्ष मुलें एक वर्षाच्या आंत मृत्युमुखीं पडतात त्या अर्थीं ह्या भयंकर संहाराला आणखीही कांही विशेष कारणें जबाबदार असलीं पाहिजेत. मुंबई प्रांताच्या हेल्थ कमिशनरने १९२४ ते २८च्या अहवालांत म्हटलें आहे की, शेकडा ४४ मुलें गर्भांत नीट पोसलीं न गेल्यामुळे मृत्युमुखीं पडतात. तेव्हा गरोदरपणामध्ये स्त्रियांच्या शरीराचें पोषण भरपूर न होणें हें एक कारण आहे. दुसरें, अकालीं व वरच्येवर येणारें मातृत्व होय. बालविवाहाचा परिणाम प्रजेवर कसा प्रतिकूल होतो हें वर पाहिलेंच आहे. त्यामध्ये वरचेवर मुलें झाल्याने मातेला बालकांना पोसण्यास पुरेसें सामर्थ्य राहत नाही. त्यांतच पहिलें बालक लवकर मृत्युमुखीं

पडलें तर पुन: लवकर गर्भारपण येतें. बरें, गरोदरपणीं व बाळंतपणाच्या वेळीं कोणती खबरदारी घेणें अवश्यक आहे ह्याबद्दल स्त्रियांमध्ये बरेंच अज्ञान दिसून येतें. शिवाय प्रसूतिकालीं शिक्षित सुईणींची मदत खेडेगावांत तरी नसते. ह्या सर्व कारणांमुळे बालमृत्युसंख्या वाढते. दरसाल २ लाख स्त्रिया बाळंतपणांतच मृत्यु पावतात. १९३३ च्या सॅनिटरी कमिशनरने आपल्या अहवालांत म्हटलें आहे की, "आज हजार मातांमध्ये शंभर स्त्रिया मृत्यु पावतात तितक्याच प्रमाणांत जर एखाद्या साथीच्या रोगाने बळी घेतले असते तर तिकडे स्थानिक सरकारचें लक्ष केव्हाच वेधलें असतें."

**स्त्रियांच्या मृत्यूच्या प्रमाणाचीं कारणें.** बाळंतपणांतच स्त्रिया मृत्यु पावतात असें नाही. तर एकदरींत १५ ते ३० च्या वयांत मृत्यूचें प्रमाण पुरुषांच्यापेक्षा स्त्रियांमध्ये हजारांत ६० नी जास्त आहे. म्हणूनच आमच्याकडे पुरुषांपेक्षा स्त्रियांची संख्या १ कोटि १० लक्षांनी कमी आहे. उलट पाश्चात्य देशांत पुरुषांपेक्षा स्त्रिया अधिक असतात हें आपण माग पाहिलेंच आहे. हेंच आमच्या खालावलेल्या आर्थिक स्थितीचें द्योतक आहे असें वाटतें. कारण आमच्या समाजव्यवस्थेमध्ये स्त्रियांच्या आर्थिक परावलंबनामुळे व एकंदरींत असहायतेमुळे कुटुंबाच्या आर्थिक स्थितीचा परिणाम स्त्रीवर्गावर अधिक होत असला पाहिजे. स्त्रियांच्या असहायतेचें द्योतक म्हणजे अजून प्रचारांत असलेली पडद्याची चाल होय. जिथे स्त्रियांना आपलें तोंड दाखविण्याची मोकळीक नसते तिथे त्यांचें जीवन किती बरें परतंत्र असलें पाहिजे! स्त्रीजन्म हा एक आमच्या समाजांत घोर अपराधच आहे म्हणूनच, "गर्भांत मुलगी आहे असें समजतांच कांही वेळां गर्भ पाडून टाकण्यांत येतो."* पुढेही जन्मल्यावर मुलगी म्हणून नाक मुरडतात. निदान पुत्रजन्मासारखा आनंद मानीत नाहीत.

* खानेसुमारी अहवाल, १९३१.

पुष्कळ वेळां तिची हयगय करण्यांत येते. एकदाचें लग्न उरकून टाकलें की झाली बाळंतपणाला सुरुवात! की त्यांतच वेळेला दुखणें येऊन शेवट व्हावयाचा. असें हें बहुसंख्य हिंदी स्त्रियांचें जीवन! अलीकडे वरच्या वर्गांतील स्त्रियांची स्थिति सुधारत चालली आहे ही गोष्ट खरी, पण बहुसंख्याक स्त्रियांची स्थिति वर दिग्दर्शित केल्या-प्रमाणेंच आहे. मग स्त्रीचें आयुर्मान पुरुषापेक्षा कमी असल्यास आश्चर्य नाही.

**निराशामय दृष्टिकोण.** प्रतिकूल परिस्थितीमुळे लोकांचा दृष्टिकोण निराशामय होणें स्वाभाविक आहे. त्यांतच संसार माया आहे ह्या धार्मिक शिकवणीचाही परिणाम होतो. आणि ह्या परिस्थितीं-तच कसेबसे दिवस ढकलण्याची प्रवृत्ति होते. अशा वेळीं लोकांना प्रत्यक्ष जाऊन जरी स्वच्छतेच्या, शिक्षणाच्या अगर बालविवाहापासून परावृत्त होण्याच्या गोष्टी सांगितल्या आणि त्यांना त्या वेळेला पटल्या, तरी आचरणांत आणणें कठीण जातें. जसें दारूसारख्या व्यसना-पायीं होणारें नुकसान कितीही भडक रीत्या दाखवून दिलें तरी तें सुटत नाही, त्याप्रमाणेंच आपल्या आजपर्यंतच्या चालीरीतींत फरक करण्यास बहुजनसमाज नाखूष असतो; कारण त्यापासून होणारे फायदे चटकन् दिसून येणारे नसतात. तरी त्यांचा हा आयुष्याकडे पाहण्याचा दृष्टिकोण प्रथम बदलला पाहिजे हें जितकें खरें, तितकेंच त्यांना प्रथम आर्थिक स्वास्थ्य देणें अवश्य आहे हेंही खरें. तसेंच लोकांचा हरएक प्रकारचा राहणीचा दर्जा सुधारण्यास सरकार-कडूनच प्रयत्न झाले पाहिजेत. हे प्रयत्न विविध दिशेने कसे करावयाचे हें आमच्या मतानुसार आम्ही उपाययोजनेमध्ये दाखविणार आहोंत. सध्याच्या कांग्रेस प्रांतिक सरकारच्या आस्थेच्या धोरणावरून, सुधा-रणा कायद्याने जरी विशेष सत्ता दिली नसली तरी, केवळ आपुल-कीच्या भावनेने बरेंचसें कार्य होईल अशी आशा आहे.

---

प्रकरण सातवें

# बेसुमार वाढ व उपासमार

हिंदी समाजाची सद्यःस्थिति कशी आहे हें मागील सहा प्रकरणांत सविस्तर रीत्या चित्रिल्यानंतर गेल्या प्रकरणांत ह्या सद्यःस्थितीला जबाबदार असलेलीं कारणें दाखवून दिलीं आहेत. परंतु परिस्थितीची जबाबदारी कारणपरंपरेवर सोडून देऊन लोकसंख्येच्या प्रश्नाचें विवेचन पुरें होत नाही. तर उपोद्घातांत म्हटल्याप्रमाणें संपत्ति आणि जनता ह्यांच्यांतील समतोलपणा बिघडला आहे काय व बिघडला असल्यास कितपत बिघडला आहे हें पाहण्यास प्रथम हिंदी लोकसंख्या हल्लीच्या काळांत व परिस्थितींत बेसुमार झाली आहे की काय हें पाहणें अवश्य आहे आणि तेंच पाहण्याचा प्रयत्न प्रस्तुत प्रकरणांत करावयाचा आहे.

**सीमान्त लोकसंख्या.** कोणत्याही देशामध्ये अमक्या काळांत अमुकच संख्या श्रेयस्कर अथवा सीमान्त (Optimum) संख्या होय असें बरोबर आकडे देऊन सांगतां येणें शक्य नाही. समुद्रसपाटीवर पाण्याची उष्णता शंभर डिग्री सेंटिग्रेडपर्यंत वाढली म्हणजे पाण्याचें रूपांतर बाष्परूपांत होतें असा सिद्धांत पदार्थविज्ञान शास्त्रांत घालून देतां येतो, तसा अर्थशास्त्रामध्ये घालतां येत नाही. कारण ह्या शास्त्राचा संबंध मनुष्याशीं आहे आणि मनुष्य हा फार गूढ प्राणी आहे. तो आपल्या परिस्थितीची सुधारणा करून संपत्तीचें उत्पादन वाढवितो अथवा स्वतःची संख्या कमी करून फिरून विचारांत पडतो. असें जरी आहे तरी एखाद्या देशाची संख्या सीमान्ता-

पर्यंत पोचली आहे किंवा पलीकडे गेली आहे हें ठोकळ मानाने सांगणें शक्य आहे.

डॉ. कॅननने म्हटलें आहे की, "ज्या संख्येने राष्ट्राचें उत्पन्न जास्तींत जास्त वाढेल व संख्येचें परिमाण अशा एका विवक्षित बिंदूला पोचलेलें असेल की संख्येंत थोडा फार जरी फरक झाला तरी दर माणशीं उत्पादक शक्ति घटेल, ती संख्या त्या वेळची सीमान्त संख्या समजावी."* डाल्टनने हाच सिद्धान्त जास्त विशद करतांना म्हटलें आहे की, "विवक्षित परिस्थितींत लोकसंख्येचें सीमान्त प्रमाण ठरवितांना नुसत्या जास्तींत जास्त उत्पादनाचा विचार न करतां प्रत्येक मनुष्याला ज्यामुळे अधिकांत अधिक सुखस्थिति प्राप्त होईल, म्हणजेच प्रत्येकास शक्य तितकी अधिक संपत्ति (विशद अर्थाने) मिळेल, ती लोकसंख्या सीमान्त किंवा उत्तम लोकसंख्या होय. ह्यापेक्षा जास्त संख्या असल्यास तो बेसुमार होय व कमी असल्यास ती अपुरी संख्या समजावी."†

**कशावर अवलंबून?** वरील स्पष्टीकरणानुसार सीमान्त लोकसंख्या कुणास म्हणावयाचें ह्याची साधारण कल्पना येते. परंतु देशाची संपत्ति व उत्पादन आणि त्याची विभागणी, तसेंच तदनुषंगाने प्रस्थापित होणारा राहणीचा दर्जा हें त्या त्या देशाच्या नैसर्गिक देणगीवर, राजकीय परिस्थितीवर आणि मुख्यत्वें त्या देशांतील जनतेच्या कार्यक्षमतेवर अवलंबून राहील. उदाहरणार्थ, संयुक्त संस्थानें, कानडा, आस्ट्रेलिया वगैरे नूतन वसाहतींतील नैसर्गिक संपत्तीचा शक्य तितका उपयोग करून घेण्याचें ज्ञान तेथील रहिवाशांना नव्हतें.

---

* *A Review of Economic Theory* —Dr. Cannan–Page 81.

† *Essay on Population*—Dalton.

जेव्हा तेथे युरोपियन लोक गेले तेव्हा उपयोगांत न आणली गेलेली बरीचशी नैसर्गिक संपत्ति त्यांच्या वाट्यास आली. अर्थात त्या प्रदेशाचें राजकीय स्वामित्व त्यांच्याकडे आल्यावर देशाचें उत्पादन व लोकांचा राहणीचा दर्जा वाढला. तसेंच जनतेच्या कर्तृत्वशक्तीवर राहणीचा दर्जा अवलंबून राहतो ह्याचीं उदाहरणें म्हणजे इंग्लंड व जपान होत. फक्त औद्योगीकरणामुळेच दर चौरस मैलास इतकी मोठी लोकसंख्या तिकडे सामा शकते.

**राष्ट्रीय सामर्थ्य.** लोकसंख्येची कमाल मर्यादा ठरवितांना आणखीही एक महत्त्वाचा प्रश्न उद्भवतो. तो म्हणजे लोकसंख्येने निदर्शित होणारें राष्ट्रीय सामर्थ्य व संख्येचें आंतरराष्ट्रीय महत्त्व. युद्ध-प्रसंगीं इतर युद्धसामग्री समान असतां जें राष्ट्र जास्त कार्यक्षम सैन्य उभें करूं शकतें तें अखेर प्रभावी ठरतें. म्हणूनच हें संख्येचें महत्त्व लक्षांत घेऊन जर्मनी, इटली, फ्रान्स आदिकरून राष्ट्रांना आपली लोकसंख्या वाढविण्याचा ध्यास लागला आहे व त्याकरितां विवाहास उत्तेजन, जास्त मुलें होणाऱ्या आईबापांस अधिक सवलती वगैरे उपायांनी देशांतील संख्या वाढविण्याचे प्रयत्न तिकडील सरकार करीत आहे. पण ही दृष्टि ज्या ज्या देशांना चढाई करावयाची आहे अगर चढाई झाल्यास बचाव करणें अवश्य आहे अशा देशांकरितां आहे. हिंदुस्थानापुढे तूर्त अशाप्रकारचा प्रश्न उद्भवत नाही आणि ह्या देशाच्या संरक्षणाचा मक्ता व काळजी इंग्रज लोकांनी आपल्या अंगावर घेऊन आम्हांला निष्काळजी केलें आहे !!

**संपत्तीचें उत्पादन.** तसेंच दुसराही एक विचार लोक-संख्या ठरवितांना पुढे येण्याचा संभव असतो. देशांतील उत्पादन-पद्धति बदलून गर्भित संपत्तीचा उपयोग करण्यास मनुष्यबलाची जरूरी वाटूं लागते. १९१५ सालीं रशियांतील लोकसंख्या कमाल मर्यादा ओलांडून गेली आहे व त्यामुळे पुष्कळ लोकांना अर्धपोटीं

राहावें लागतें असें सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ कीन्स् ह्यांनी म्हटलें होतें. पण त्याच रशियांत नवीन समाजव्यवस्थेमध्ये दोन पंचवार्षिक योजना अमलांत आणतांना अधिक मनुष्यबळाची जरूरी भासूं लागली व आहे ही लोकसंख्या अपुरी आहे असें दिसून आलें. संपत्तीची वाढ झपाट्याने होत असल्यामुळे व तिच्या समान विभागणीमुळे राहणीचा दर्जाही वाढत आहे. देशांतील गर्भित संपत्तीचा उपयोग करून घेण्यांत आल्यावर व परचक्राची भीति नसल्यास आहे हीच लोकसंख्या कदाचित् अधिक वाटूं लागेल. अर्थात हा पुढचा प्रश्न आहे. सारांश, आर्थिक उन्नतीकरितांही वेळेला मनुष्यबळाची जरूरी वाटूं लागते. पण हिंदुस्थानच्या बाबतींत आर्थिक नियोजन करूं म्हटलें तरी मनुष्यबळाची कमतरता पडणार नाही. कारण सध्या आहेत त्यांनाच बेकारी सतावते किंवा पुरेसें काम मिळत नाही.

ह्यावर असेंही म्हणतां येईल की बेकारी ही भांडवलशाही उत्पादन पद्धतीचें एक कायमचें अंग होऊन बसलें आहे. संयुक्त संस्थानासारख्या संपन्न राष्ट्रांत सुद्धा मंदीच्या काळापूर्वी ४० लक्ष बेकार होते व ती संख्या आर्थिक मंदीच्या काळांत एक कोटीपर्यंत म्हणजे लोकसंख्येच्या तेराव्या हिश्शाइतकी होती. युरोपमध्ये सुद्धा साडेतीन कोटि बेकार आहेत. म्हणून बेकारी हें बेसुमार लोकसंख्येचें लक्षण आहे असें म्हणतां येणार नाही. पण हिंदुस्थानाच्या बाबतींत तें कदाचित् असूं शकेल की काय हें आपण आता पाहूं.

**हिंदुस्थानचा जागतिक दर्जा.** जगांतील राष्ट्रांमध्ये आज हिंदुस्थानचें स्थान कोठे आहे ह्याची साधारणपणें कल्पना उपोद्घातांतील पहिल्या पत्रकावरून येते. अठरा लक्ष चौरस मैलांच्या विस्तारांत ३९ कोटि लोकसंख्या सामावली आहे. अखिल मानवजातीचा जवळजवळ एकषष्ठांश भाग या देशामध्ये एकत्रित झालेला

आहे. त्यामुळे दर चौरस मैलास लोकसंख्येचें प्रमाण १९६ पडतें. हें प्रमाण उद्योगप्रधान इंग्लंड, जर्मनी, जपानादिकरून राष्ट्रांपेक्षा कमी असलें तरी नूतन वसाहतींच्या मानाने जास्त आहे. इतकेंच नव्हे, तर हा देश कृषिप्रधान असल्यामुळे प्रदेशावर संख्येचा दाब अधिक आहे हें अगदी स्पष्ट होतें. त्यांतच देशांतील संख्या १९२१ सालापासून झपाट्याने वाढत आहे हें आपण पहिल्या प्रकरणांत पाहिलें आहे. तसेंच ह्या संख्येला परदेशांत जाण्यास मुळीच वाव नाही. बरें, देशांतल्या देशांत संख्येची समविभागणी करूं म्हटलें तरीही फारशी आशा करावयास जागा नाही. येथील जनतेची सामुदायिक संपत्ति व उत्पन्न, तसेंच त्यावरून निघणारें सरासरी दरमाणशीं वार्षिक उत्पन्न अतिशय कमी, जपान ईजिप्त इ० पूर्वेकडील देशांच्या मानानेही फार कमी आहे. दरवर्षी ५० रु. म्हणजे दरमहा ४-२-६ रु. चें उत्पन्न ! त्यांतून कशा प्रकारचा राहणीचा दर्जा निष्पन्न होतो ह्याचें वाचकांनी कल्पनेने चित्र रंगवावें. देशांतील बहुजनसमाजाचा राहणीचा दर्जा कशा प्रकारचा आहे हें विस्तृत रीत्या पांचव्या प्रकरणाच्या अखेर दाखवून दिलेंच आहे. तेव्हा बहुजनसमाजास 'अधिकांत अधिक सुख' (डाल्टनच्या म्हणण्याप्रमाणें) प्राप्त होत आहे असें कांही म्हणतां येत नाही.

**अनुकूल गोष्टी.** हा राहणीचा दर्जा ज्या गोष्टींवर अवलंबून आहे त्यांपैकी प्रथम हिंदुस्थानाच्या अनुत्पादित संपत्तीचा विचार करूं. हिंदुस्थान हा देश एशियाच्या मध्यभागीं व दक्षिणेकडे असल्यामुळे व्यापाराच्या दृष्टीने मध्यवर्ति स्थान म्हणून योग्य देश आहे. त्यामध्ये देशाच्या मानाने नैसर्गिक बंदरांचा अभाव ही एक उणीव आहे. तरीपण हल्लीच्या अंतरिक्षगमनाच्या कालांत मध्यवर्ति स्थान म्हणून, त्याचें महत्त्व वाढण्यासारखें आहे. देशामध्ये हरएक प्रकारची हवा आहे. तसेंच जमीन बऱ्याच ठिकाणीं निरनिराळ्या

पिकांना अनुकूल अशी आहे; जंगलाने व लोखंड वगैरे वेगवेगळ्या खनिज द्रव्यांनीं समृद्ध असा हा देश आहे. तेलाचा पुरवठा बहुतेक ब्रह्मदेशांतून होतो आणि तो देश हिंदुस्थानापासून वेगळा करण्यांत आल्यामुळे तेलाचा पुरवठा देशांतल्या देशांत होणें शक्य नाही. हिंदुस्थानांत कोळशाच्या खाणी आहेत, परंतु जर देशाचें औद्योगीकरण झपाट्याने होऊं लागलें तर कोळशाचा पुरवठा भरपूर होणार नाही अशी भीति आहे. तथापि तेल व कोळसा ह्यांची उणीव विजेच्या पुरवठ्याने भरून निघण्याची शक्यता आहे. टाटा डायड्रो इलेक्ट्रिक वर्क्स सारखीं मोठमोठीं वीज पुरविण्याचीं मंडळें निघत आहेत व देशाच्या मागणीप्रमाणें अधिक निघतीलही. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे देशाची संपत्ति व उत्पादन वाढण्यास अनुकूलता बरीच आहे.

**भविष्य.** अर्नोल्ड ल्प्टन आपल्या 'हॅपी इंडिया' ह्या पुस्तकांत म्हणतात, " उत्तम मार्गदर्शकत्वाखाली सध्या आहे ह्याच्या दुप्पट लोकसंख्या, आरोग्यांत, सुखांत व चैनींत सहज राहूं शकेल." तसेंच श्री. जाफर हुसेन आपल्या लेखांत* म्हणतात, "हिंदुस्थानची भूगर्भस्थित संपत्ति लक्षांत घेतां त्याला जितकें उत्पादन करणें शक्य आहे त्याच्या एकदशांश सुद्धा हल्ली होत नाही." कांहींच्या मतें तर हिंदुस्थान ३९ कोटीच काय पण १०० कोटि लोकसंख्येचें सुद्धा सहज पोषण करूं शकेल.

**सद्यःस्थिति.** पण ही झाली भविष्य काळाची गोष्ट आणि ती सुद्धा दुसऱ्या अनेक गोष्टींच्या अनुकूलतेवर अवलंबून आहे. त्यांपैकी पहिली म्हणजे देशाची राजकीय स्वतंत्रता. परतंत्रतेमुळे देशाला किती आर्थिक नुकसान सोसावें लागतें हें सहाव्या प्रकरणांत पाहिलें आहे. महायुद्धोत्तर कालांत जरी सरकारच्या आर्थिक धोरणांत थोडाबहुत हिंदुस्थानच्या हितास अनुकूल असा बदल झाला होता;—

* एकॉनॉमिक जर्नल १९३३.

जी. आय्. पी. व ई. आय्. आर. हे लोहमार्ग कंपन्यांकडून सरकारकडे घेण्यांत आले, संरक्षक जकातीचें धोरण थोडें फार अवलंबण्यांत आलें, खेडेगावांतील उद्योगधंद्यांकडे सरकारने लक्ष घातलें, वगैरे— तथापि सत्ताधारी लोकांच्या कायमच्या आर्थिक हितसंबंधांस (Vested Interests) बिलकूल धक्का लागूं नये अशी व्यवस्था १९३५च्या सुधारणा कायद्याने केल्यामुळे राजकीय सत्ता हिंदी जनतेपासून हिरावून घेतल्यासारखें झालें आहे! तेव्हा आर्थिक उत्पादनाच्या वाढीच्या मार्गांत हें प्रतिकूल राजकीय वातावरण म्हणजे फार जबरदस्त अडचण आहे. ह्याचा अर्थ असा नव्हे, की ती अडचण दूर करण्याचा, म्हणजेच आमच्या न्याय्य हक्काची मागणी करण्याचा, प्रयत्न करावयाचा नाही, अगर केल्यास तो निरर्थकच होणार आहे.

प्रतिकूल राज्यपद्धतीमुळे जनतेची आर्थिक स्थिति सुधारत नाही; इतकेंच नव्हे, तर राहणीचा दर्जा निकृष्ट प्रतीचा झाला आहे. तथापि आज देशांतील लोकसंख्या बेसुमार झाली आहे की नाही ह्याबद्दल अर्थशास्त्रज्ञांचें दुमत आहे.

**देशांतर.** उभयपक्षांच्या अर्थशास्त्रज्ञांच्या मताचा विचार करण्यापूर्वीं ज्याप्रमाणें युरोपियन राष्ट्रांना आपल्या लोकसंख्येला वसाहतींत वाव मिळाला त्याप्रमाणें हिंदुस्थानाला देशान्तराचा मार्ग खुला आहे की काय ह्याचा विचार करणें योग्य होईल. अलीकडील युद्धांची कारणमीमांसा करूं लागलें तर त्यांच्या बुडाशीं त्या त्या देशांत असलेल्या समाजरचनेनुसार व सध्या असलेल्या राहणीच्या दर्जानुसार लोकसंख्येला वाव मिळविणें हें कारण असतें. इटलीचें ॲबिसीनियावर आक्रमण अगर जपानची चीनवर चढाई हीं अगदी अलीकडील उदाहरणें आहेत. युद्धाची जय्यत तयारी असणाऱ्या राष्ट्रांत वसाहतीसाठी चाललेली चुरस पाहतां परतंत्र हिंदी लोकांना परदेशांत आशाच नको. अमेरिकन संयुक्त संस्थानें, कानडा वगैरे देशांत तर हिंदी, जपानी,

चिनी ह्या लोकांना कायद्यानेच बंदी करण्यांत आली आहे. इतकेंच नव्हे तर दक्षिण आफ्रिकेंतील सरकार परत जाण्याचा खर्च देऊन जा म्हणून सांगत आहे! ॲबिसीनियांतून हिंदी व्यापाऱ्यांची हकालपट्टी केल्याचें अगदी ताजें उदाहरण आहे. 'वास्तविक हिंदी मजुरांनी ब्रिटिश साम्राज्याच्या भागांना संपन्न केलें, तरी सुद्धा आज हेच हिंदी मजूर सर्वत्र नकोसे झाले आहेत.'* जवळच्या ब्रह्मदेशांतही १९३६ पासून हिंदी लोकांच्या जाण्यावर नियंत्रण घालण्यांत आलें आहे. म्हणून देशांतराचा मार्ग हिंदी जनतेला तरी खुला नाही.

"जरी हिंदी लोकांना देशांतर करावयास थोडी सवड असती तरी जेथे दरवर्षी ३० लाखांनी† लोक वाढतात तेथे देशांतराने कांही सुधारणा झाली तरी तात्पुरती होईल. जेथे कुटुंबाची वाढ अमर्यादित आहे तेथे रिकामी झालेली जागा आपोआप भरून निघते. जशी लढाई अगर दुष्काळ ह्यांनी झालेली तूट भरून निघते तशीच देशांतराने झालेलीही निघते. तेव्हा देशांतर हा कांही सुटकेचा मार्ग नव्हे....(शिवाय) हे लोक चढाई करून नवीन प्रदेश ताब्यांत आणण्यास फार कमजोर आहेत आणि त्यांच्या कमजोरपणाचा दाटीशीं निकटचा संबंध आहे."‡ सारांश काय की देशांतर हा कांही हिंदी जनतेला सुटकेचा मार्ग नव्हे. तरी बेसुमार लोकसंख्ये-विषयीं अर्थशास्त्रज्ञांचीं काय मतें आहेत तें पाहूं.

**अर्थशास्त्रज्ञांचीं मतें : एक बाजू.** "सर्व बाजूंनी वाढूं शकणारें उत्पन्न त्याचप्रमाणें मजूरवर्ग व नोकरवर्ग ह्यांच्या मागणीच्या वाढीची शक्यता लक्षांत घेतां आपल्याला असें म्हणतां येईल की,

---

* *Indian Economics*–Prof. Jathar and Beri, Page 79.

† १९२१ ते १९३१ ची वार्षिक सरासरी वाढ.

‡ *World Population*–Carr Saunders, P. 293.

हिंदुस्थानची लोकसंख्या देशाला पोसतां येणार नाही अशा सीमेपर्यंत पोचलेली नाही. इतकेंच नव्हे तर ती या सीमारेषेच्या पुष्कळच खाली आहे. ह्या देशाची लोकसंख्या बेसुमार आहे असें सांगण्यांत येतें तें हास्यास्पद आहे...आमच्याकडून अन्न व कच्चा माल नेऊन पुष्ट झालेल्या भांडवलशाही साम्राज्यवाद्यांनी त्यामुळे दारिद्र्य प्राप्त झालेल्या बिचाऱ्या हिंदुस्थानच्या लोकांना ह्या देशाच्या लोकसंख्येच्या बेसुमारपणाबद्दलची केलेली ओरड मुकाटयाने ऐकून घ्यावी लागत आहे." असें प्रो. वाडिया व प्रो. जोशी म्हणतात.*

आणखी असा एक मुद्दा मांडण्यांत येतो की, १९०० पासून १९३० पर्यंतची लोकसंख्येची वाढ व उत्पादनाची वाढ हीं लक्षांत घेतां लोकसंख्येपेक्षा उत्पादन जास्त वाढतें आहे. त्यामुळे गेल्या ३० वर्षांत झालेली वाढ ही बेसुमार वाढ नव्हे व त्याने डगमगून जाण्याचें कारण नाही. प्रो. थॉमस म्हणतात, "१९०० सालीं जर लोकसंख्या बेसुमार नव्हती तर १९३१ मध्ये पण ती बेसुमार नाही. गेल्या दशकांत झालेली शेंकडा १०·६ वाढ पाहून घाबरण्याचें कारण नाही. कारण त्याबरोबर किंबहुना त्यापेक्षाही जास्तच उत्पादनाची वाढ झाली आहे. म्हणून लोकांची राहणी खालावत चालली आहे अशी व्यर्थ ओरड कशाला ?"† "हिंदुस्थानसारख्या देशाला ३९ कोटि संख्या मुळीच भारभूत नाही. याच्या दुप्पट लोकसंख्येचें पोषण करण्याची ताकद या भूमींत आहे ही गोष्ट विद्वानांच्या लक्षांत येत नाही. वाढती लोकसंख्या ही हिंदुस्थानावरील आपत्ति नसून उलट शक्ति आहे, समृद्धि आहे आणि लाभ आहे."‡ प्रो. कर्वे यांनी १९०० ते १९३० च्या दरम्यानांतील ३० वर्षांचा आढावा काढला आहे. देशांतील उत्पादन,

---

* *Wealth of India*–Prof. Wadia & Joshi.

† *Economic Journal–1933.*

‡ **प्रो. टॉमस यांचें अध्यक्षीय भाषण–इकॉनॉमिक कान्फरन्स १९३७.**

आगगाडीची वाहतूक, बंदराबंदरांतील व परदेशांतील व्यापार, बँकें-तील ठेवी व देशांतील भांडवल यांची वाढ कशी झाली आहे, ह्याचीं कोष्टकें त्यांनी आपल्या पुस्तकांत दिलीं आहेत. तसेंच लोकसंख्या व उत्पादन यांचे सूचक अंक देऊन असें सिद्ध केलें आहे की, लोक-संख्येची वाढ जमेस धरूनही उत्पादन शेंकडा २९ ने वाढलें आहे. त्याबरोबरच कमी होणारी बालमृत्युसंख्या, जननसंख्या व लोकांच्या आयुर्मर्यादेमध्ये झालेली थोडी वाढ, यावरून जनतेची स्थिति सुधारत आहे, असा अंदाज केला आहे व पुढे असें म्हटलें आहे की 'लोकसंख्येवर नियंत्रण घालून संख्येंत थोडी घट आणि त्यामुळे परि-स्थितींत थोडी सुधारणा ह्यापलीकडे फारसा बदल होणार नाही. कारण लोकसंख्या, मग ती लहान असो की मोठी असो, तिच्या-कडून जास्तींत जास्त उत्पादन होणें हें त्या लोकांच्या मानसिक प्रगतीवर व संस्थात्मक तयारीवर (Institutional Equipment) अवलंबून राहील.''* प्रो. विनयकुमार सरकार ह्यांचेंही म्हणणें जवळजवळ तसेंच आहे. "हिंदी लोकसंख्येच्या वाढीला भिण्याचें कारण नाही. कारण इतर राष्ट्रांत जशी नैसर्गिक कारणाने लोकसंख्येची वाढ कमी झाली तशी हिंदुस्थानांत पण आपोआपच होऊं लागली आहे. हिंदी लोकांचा राहणीचा दर्जा फार साधा आहे व त्यांत गेल्या तीस वर्षांत सुधारणा होत आहे. सध्याच्या संख्येने किंवा वाढत्या संख्येने आहे ह्या स्थितींत उत्पादन तेंच राहील किंवा वाढेल. ह्याच्या उलट संख्या कमी करून उत्पादन कमी होईल व राहणीचा दर्जा खालावेल. सारांश, हिंदुस्थानची सध्याची लोकसंख्या उत्तम (Optimum) आहे."†

* *Poverty & Population in India*
—Prof. Karve. P. 110-111.

† *Sociology of Population*–Prof. Sarkar P. 53.

**दुसरी बाजू.** अशी आशाजनक दृष्टि न घेतां कांही मंडळी याच्या उलट हिंदुस्थानच्या लोकसंख्येकडे निराशामय दृष्टीने पाहतात. १९३१ सालच्या खानेसुमारी अहवालांत म्हटलें आहे की, "जगांतील सर्व राष्ट्रांपेक्षा–चीनच्या अगदी अलीकडील अंदाजापेक्षाही–हिंदुस्थानची लोकसंख्या अधिक आहे. आणि हल्लीची ही वाढ अनेक दृष्ट्या समाधानकारक नसून भीतिसूचक आहे." मेजर जनरल सर जॉन मेगॉ ह्यांनी पुढील चार कारणें दाखवून वरील विधानाचाच पुरस्कार केला आहे. "(१) हिंदुस्थानांतील जनतेला पुरेसें अन्न मिळत नाही. (२) आयुर्मर्यादा असावी त्याच्या निम्म्याहूनही कमी आहे. (३) जरी दहा वर्षांत एकदा सुद्धा अवर्षण पडलें नाही तरी पांचांपैकी एका खेडयांत दुष्काळ व अन्नाची कमतरता भासूं लागते. (४) मृत्युसंख्येचें प्रमाण इतकें अधिक असूनही लोकसंख्या अन्नाच्या किंवा इतर पदार्थांच्या उत्पादनापेक्षा अधिक झपाटयाने वाढत आहे, ह्यावरून स्पष्ट होतें की जीवनाच्या आवश्यक वस्तूंच्या उत्पादनापेक्षा लोकसंख्येने आघाडी मारली आहे; त्यामुळे परिस्थितींत फार मोठा बदल झाला नाही, तर सध्याचा कमी प्रतीचा राहणीचा दर्जाही अधिक खालावेल." डॉ. दास जागतिक लोकसंख्या परिषदेपुढे म्हणाले, "एकतृतीयांश ते दोनतृतीयांश लोकसंख्येची नेहमी उपासमार होत असते. प्रत्येक माणसाला वर्षाला १२·७ लक्ष कॅलरी उष्णता देणारें अन्न कमींत कमी लागतें. पण हिंदुस्थानांतील दर माणशीं अन्नाचें उत्पादन ८·३ लक्ष कॅलरीज होतें. ह्यावरून अन्नाची कमतरता उघड होते. हिंदुस्थानच्या दारिद्र्याचें मुख्य कारण म्हणजे देशाचें उत्पादन लोकसंख्येच्या वाढीबरोबर टिकाव धरूं शकत नाही. मद्रासमधील तुरुंगांत ७४१ पौंड अन्न कैद्यांस दिलें जातें. (कैद्याच्या अन्नापेक्षा सुद्धा खालच्या वर्गाच्या लोकांचें अन्न कमी प्रतीचें असतें हें मागे दाखविलेंच आहे.) अमेरिकेंत २६६४ पौंड अन्न कैद्यांस दिलें जातें. शिवाय हिंदुस्थानांत

दिलें जाणारें अन्न कमी प्रतीचें असतें. लोकांच्या अज्ञानामुळें, अशक्ततेमुळें व अपुऱ्या कामामुळें लोकांची एकूणीयांश उत्पादन-शक्ति कमी होते...साधी राहणी व उच्च विचारसरणी हें ध्येय जरी जनतेच्यापुढें ठेविलें तरी शेवटीं कोणालाही असेंच म्हणावें लागेल की, हिंदुस्थानच्या सध्याच्या औद्योगिक परिस्थितींत अल्पस्वल्प नैतिक व आधिभौतिक प्रगतीला संधि मिळण्यास आवश्यक असलेल्या लोकसंख्येच्या दुप्पट लोकसंख्या सध्या हिंदुस्थानांत आहे."*

१९११ ते १९३४ च्या दरम्यान लोकसंख्या शेकडा २२ ने वाढली तर धान्याच्या लागवडीची जमीन सारी शेकडा ६ ने वाढली ! "निर्गतीसाठी व बीजाकरितां राखून ठेविलेलें व नष्ट झालेलें धान्य सोडून, तसेंच दूध व मासे जमेस धरून हिंदुस्थानांत सध्या (१९३५) अन्नाचें उत्पादन २२२·८ महापद्म कॅलरी आहे व लोकसंख्या ३७·३ कोटि आहे. तेव्हा अन्नाची कमतरता ४८·४ महापद्म कॅलरी दरवर्षीं पडते. तेंच दुसऱ्या रीतीनें मांडावयाचें म्हणजे हें अन्न सर्व लोकांना, त्यांचा फक्त वाजवी भाग वाटून दिला तर, ६६ लक्ष लोकांना अन्नाचा वाटा मिळणें अजीबात शक्य नाही."† ही गोष्ट गणितानें सिद्ध होते. तथापि प्रत्यक्ष व्यवहाराकडे पाहिलें तर ह्याचा अर्थ असा होतो की, ६६ लक्ष लोक तर अजीबात उपाशी राहणें शक्य नाही म्हणून त्यांचें एक वेळचें पोट भरण्याकरितां दुसऱ्या तेवढ्याच लोकांना अर्धपोटीं राहावें लागतें. शिवाय अन्नाची समान वाटणी केव्हाच होत नाही. ज्या अर्थी कांही अल्पसंख्याक

---

* *Report of the World Population Conference. 1927.*

† *Population, Capacity & Control in India*—
—Radhakumud Mukarji

लोकांकडे जास्त भाग जातो त्याअर्थी बहुसंख्याकांपैकी कांही लोकांना पोटाला थोडाफार चिमटा घ्यावाच लागतो! म्हणजे, देशांत जवळजवळ दीड कोटि लोक अर्धपोटीं राहत असले पाहिजेत.

श्री. रणदिवे म्हणतात की, "जर्मनीसारख्या उद्योगप्रधान राष्ट्रांत सुद्धा गेल्या साठ वर्षांत ३·८ कोटि लोकसंख्या उद्योगधंद्यांत सामावली. हिंदुस्थानांत उद्योगधंद्यांची भराभर प्रगति झाली व लोक-संख्येची वाढ अजीबात थांबली तरी उद्योगधंद्यांत सामावून साडेपांच कोटि लोकसंख्या शिल्लक राहते. मग हल्लीच्या वाढीप्रमाणेंच वाढ होत गेल्यास उद्योगधंद्यांच्या भरभराटीनेही शेतीवरील लोकसंख्येचा दाब कमी होणें शक्य नाही."*

प्रो. वॅटल† व प्रो. ब्रिजनारायण‡ ह्यांनी आपल्या पुस्तकांत हिंदुस्थानची सध्याची लोकसंख्या बेसुमार आहे असें निःसंदिग्धपणें म्हटलें आहे.

प्रो. के. टी. शहा म्हणतात, "हिंदी लोक कसें तरी जीवन कंठीत आहेत. पण असलें जीवन कुठल्याही सुधारलेल्या समाजाला लांछनास्पद होईल." तसेंच हिंदुस्थानांतील भावी संपत्तींत सद्यः-स्थितीमध्ये किती वाढ होणें शक्य आहे ह्याचा विचार केल्यानंतर ते म्हणतात, " जनतेने लोकसंख्येच्या वाढीला समंजसपणें व जाणून बुजून आळा घालणें ह्याशिवाय दुसरा उपाय नाही."‖

---

* *Population Problem*–Randive.

† *Population Problem of India & 1931 Sensus*
—Watale.

‡ *Population Problem*–Brijanarayan.

‖ *Wealth & Taxable Capacity of India*
—Shah & Khambata.

प्रो. जठार व प्रो. बेरी म्हणतात की, "मनुष्याची मोठ्या प्रमाणांत प्रजोत्पादन करण्याची शक्ति लक्षांत घेतां आणि वाढीवर कुठल्याही तऱ्हेचा परिणामकारक प्रतिबंधक दाब नाही हें पाहून, हिंदुस्थानाची लोकसंख्या आज बेसुमार आहे, इतकेंच नव्हे, तर वाढीची तशी प्रवृत्तीही आहे असें खात्रीने म्हणावें लागतें."*

**आमचें मत.** सध्याच्या लोकसंख्येच्या वाढीबद्दल येथपर्यंत दोनही पक्षांच्या अर्थशास्त्रज्ञांचीं मतें दिलेलीं आहेत. आमच्या मतें हिंदुस्थानची लोकसंख्या मर्यादातीत अतएव बेसुमार आहे. कारण, विवाह सर्रास करण्याची पद्धत आहे; जननसंख्येवर कोणतेंच बुद्ध्या नियंत्रण घातलें जात नाही; तसेंच विधवाविवाह बंदी, मर्यादित क्षेत्रांत विवाह आदिकरून चाली वगैरेंचा विशेष परिणाम होत नाही–अर्थात वाढ होत आहे. त्यांत विशेष हें आहे की, ही वाढ जननाच्या जोडीला मृत्यूचें प्रमाण अधिक असल्यामुळे, सुदृढ व दीर्घायुषी प्रजेची होत नाही. म्हणून उत्पादक गटापेक्षा इकडे अनुत्पादक गट जास्त आहे (आ. ४ पहा). ह्यावरून स्पष्ट होतें की, देशांतील संपत्तीच्या मानाने लोकसंख्या अधिक आहे. तसेंच गेल्या दशकांतील व त्यानंतरच्या वर्षांतील वाढीचें प्रमाण लक्षांत घेतां लोकसंख्येचा प्रश्न फार महत्त्वाचा झाला आहे. म्हणून त्याकडे सरकारचें व जनतेचें लक्ष शक्य तितक्या लौकर वेधलें पाहिजे असें आम्हांस वाटतें.

**प्रश्नाचा बिकटपणा.** वाढीची सध्याची धाव पुढे तशीच कायम राहील की घटेल अथवा वाढेल हें निश्चितपणें सांगणें पूर्ण माहितीच्या अभावीं अशक्य आहे. पण बुद्धिपुरःस्सर नियंत्रण घातल्याशिवाय एक दोन दशकें तरी सध्या चालू असलेल्या वाढींत घट होईल असें वाटत नाही. अर्थात् सध्या असलेल्या लोकसंख्येनेच

---

*Indian Economics–Jathar & Beri. P. 272.

सांपत्तिक उत्पादन व संख्या ह्यांतील तोल बिघडला आहे, तर संख्येंत भर पडल्यास प्रश्न सुटण्याऐवजी अधिकच बिकट होणार आहे.

देशाच्या वर उल्लेखिलेल्या नैसर्गिक गोष्टींची अनुकूलता लक्षांत घेतां देशाची संपत्ति अनुकूल राजकीय व आर्थिक वातावरणांत वाढण्यास हरकत नाही, ही गोष्ट खरी; तथापि त्याही मार्गांत कोणकोणत्या अडचणी आहेत हें वर दिग्दर्शित केलेंच आहे. शिवाय संपत्तीचें उत्पादन वाढणें ही कांही झालें तरी कालावधीचीच गोष्ट आहे. तसें संख्येच्या उत्पादनाचें नाही. त्यामध्ये–एखाद्या भयंकर आपत्तीखेरीज–भर ही पडत राहणारच!

भविष्यकालाची गोष्ट सोडून दिली तरी वर्तमान कालांत सुद्धा प्रश्नाचा विकटपणा कमी नाही. देशाच्या सद्यःपरिस्थितींत बहुजन-समाजाची कशा प्रकारची स्थिति आहे हें विस्तृतपणें मागील प्रकरणांत दाखविलें आहे. संपत्तीच्या उत्पादनाकरितां वा लोकसंख्येच्या निरोगी वाढीकरितां अगदी अल्पस्वल्प व विस्कळीत प्रयत्नांखेरीज सार्वराष्ट्रीय व हेतुपुर:सर असे कोणतेच प्रयत्न होत नाहीत. त्यामुळे देशाची स्थिति थोडी फार माल्थसनें रंगविलेल्या चित्राप्रमाणें भासत आहे हें दुसऱ्या प्रकरणांत दाखविलें आहे. जेथे लोकांचे दरवर्षी लाखावारी बळी रोगांनी घेतले जात आहेत (आ. नं. ६ पहा), तेथे लोकांची जीवनशक्ति ( Vitality ) फार कमी प्रमाणांत असली पाहिजे हें उघड होतें.

**संयुक्त प्रांताचें उदाहरण** प्रो. मुकर्जींनी संयुक्त प्रांताचें उदाहरण देऊन त्यांतील गेल्या ६० वर्षांचा साथीच्या रोगांनी बळी घेतलेल्यांचा आढावा काढला आहे. त्यावरून तिकडे अधिक लोकसंख्या असल्यामुळे इतर प्रांतीयांपेक्षा अधिक लोक साथींना बळी पडतांना आढळून येत आहेत. इतकेंच नव्हे, तर स्त्रियांची शक्ति कमी होऊन जननसंख्या कमी होण्याकडे त्याचा परिणाम होतो.

जी संयुक्त प्रांताची गोष्ट आहे तीच थोडया प्रमाणांत अखिल देशाची असावी. जननसंख्या गेल्या दशकांत थोडी कमी होण्याचें कारण स्त्रियांची आर्थिक निकृष्टतेमुळे कमी झालेली जीवनशक्ति व त्यांची घटत चाललेली संख्या हें असलें पाहिजे. प्रो. सरकार ह्यांच्या कल्पनेप्रमाणें तें संपन्नतेचें लक्षण खास नव्हे. शिवाय निश्चितपणें जननसंख्येचें प्रमाण कमी होत आहे असें नाही. (आ. नं. २ पहा.) संख्येची रेषा हेलकावे खात आहे. इतकेंच की पूर्वीपेक्षा थोडी खाली हेलकावे खात आहे इतकेंच.

**बिहार व ओरिसाचें उदाहरण.** प्रो. कर्वे व प्रो. टॉमस ह्यांनी आपले आकडे पूर्ण विश्वसनीय नाहीत असें म्हटलें आहे. तथापि ह्या अपुऱ्या माहितीवरूनही त्यांनी सध्याचा रहाणीचा दर्जा सुधारणेकडे झुकत आहे असें म्हटलें आहे तें मात्र मान्य होत नाही. बिहार व ओरिसा प्रांताचे खानेसुमारीचे कमिशनर मि. लॅसे ह्यांचें म्हणणें वरील विधानाला पोषक दिसत नाही. त्यांनी १९२१ ते ३१ मधील लोकांच्या राहणीच्या दर्जाचें पृथक्करण केलें आहे. त्यांच्या मतें पूर्वी ज्या कांही वस्तु चैनीच्या म्हणून समजल्या जात असत त्यांपैकी थोडया आता सरसकट वापरण्यांत येऊं लागल्या आहेत. उदाहरणार्थ—कंदील, छत्र्या, सायकली वगैरे. खाण्यापिण्यांत फारसा फरक झाला नाही. सरसकट लोकांचें चहापान वाढलें आहे व थोडा भाजीपाला लोक अधिक खाऊं लागले आहेत, एवढेंच. पण एका दशकांत एका प्रांतांत ४० लक्षांची भर पडली आहे, त्या मानानें उत्पादनाच्या साधनांत कायमची सुधारणा झाली नाही. तेव्हा राहणीच्या दर्जांत सुधारणा तर नाहीच, पण आहे हाच दर्जा कसा टिकेल ह्याविषयीं त्यांनी शंका प्रदर्शित केली आहे.

**जागतिक उत्पादन.** जागतिक उत्पादनांत गेल्या शतकापासून फार झपाटयानें भर पडत आहे. ही भर यांत्रिक व औद्योगिक

सुधारणेमुळे शक्य झाली आहे. त्याचा परिणाम असा झाला आहे की, स्थूल मानाने लोकांचा राहणीचा दर्जा सुधारला आहे. ह्या जागतिक परिस्थितीचा आघात हिंदुस्थानावर झाला असल्यास नवल नाही. त्यामुळे इकडील लोकांना पूर्वी ज्या गोष्टी दुर्मिळ होत्या त्या आता सुलभ झाल्या आहेत. शिवाय हिंदुस्थानांतही यांत्रिक उत्पादन थोडेंसें होऊं लागल्यामुळे उत्पादन वाढलेलें दिसतें, पण लोकांच्या आवश्यक वस्तूंमध्ये वाढ झालेली नाही. कारण संख्येची भर पडल्यामुळे उत्पादनांतील वाढ कुठल्याकुठेच जाते. शिवाय यांत्रिक युगाबरोबर येणारी सांपत्तिक विषमता ह्या देशांतही आली आहे. गेल्या ५० वर्षांत ही विषमता वाढत आहे. जमिनी सावकारांच्या हातांत जाऊन शेतकरी अधिक कर्जबाजारी होत आहे. विशेषतः सध्याच्या आर्थिक मंदीच्या काळांत राहणीचा दर्जा सुधारण्याऐवजी खालावूंच लागला आहे.

**आमची गति.** बरें, आमच्या लोकांचा दर्जा गेल्या ३०–३५ वर्षांत सुधारला आहे असें गृहीत धरलें तरी त्याच काळांत इतर देशांत किती आश्चर्यवत् सुधारणा झाली आहे हें पाहिलें म्हणजे वैमानिक गतीबरोबर खटाऱ्याचीच आमची गति आहे, हें मागील अनेक तुलनात्मक कोष्टकांवरून दिसून आलेंच आहे. शिवाय संख्येची जी वाढ होते ती पहिल्या १५ वर्षांच्या काळांत देशाच्या संपत्तीमध्ये भर घालण्यास असमर्थच असते; म्हणजे त्या वाढत्या संख्येच्या पोषणाचा भार समाजाच्या कार्यवाहक लोकांवर पडतो. आणि त्याच्या जोडीला सव्वीस वर्षांचें सरासरी आयुष्य! म्हणजे १५ वर्षांचा काळ* अनुत्पादक व अकरा वर्षांचा काळ उत्पादक म्हणजे प्रत्येक व्यक्तीमागे चार वर्षांच्या पोषणाचा भार समाजावर अधिक पडत असतो!

*हा ठोकळ मानानेच धरला आहे. तसें पाहिलें तर मध्यम व वरच्या वर्गांतील लोक ह्याहीपेक्षा उशिरां उत्पादनास लागतात.

**पेच.** एकूण काय की देशाच्या सध्याच्या राजकीय मर्यादेचा व त्यामुळे होणाऱ्या अनेक आर्थिक गैरसोयींचा विचार करतां आहे ही लोकसंख्या देशाच्या मानाने अधिक आहे. तसेंच संपत्ति व संख्या ह्यांच्यांतील मेळ बिघडला आहे. किंबहुना त्यांच्यामध्ये मेळ बसलेलाच नाही. जर देशाला हा मेळ घालून द्यावयाचा असेल, म्हणजेच इतर प्रगतिक्षम राष्ट्रांच्या तोडीला कांहीं कालांतराने हिंदुस्थानाला जाऊन बसावयाचें असेल, तर संपत्तीचें उत्पादन झपाट्याने होऊन त्याची शक्य तितकी सम विभागणी झाली पाहिजे व आहे ह्या संख्येमध्ये शक्य तितकी कमी भर पडली पाहिजे. नाहीपेक्षा जरी सर्व लोकांची सर्वस्वी उपासमार होणें शक्य नसलें तरी दीड कोटीपेक्षा अधिक लोकांची वाढत्या प्रमाणांत उपासमार होण्याचा व राहणीचा दर्जा खालावण्याचा संभव आहे.

**उपासमार.** सदरहू पुस्तकाला "उपासमार की नियोजन" अशा प्रकारचें नांव देतांना 'उपासमार' म्हणजे फक्त अन्नाचीच कमतरता अशाच अर्थाने ह्या शब्दाची योजना करण्यांत आली नसून एकंदरींत सर्वच आर्थिक सुखसोयींची कमतरता अशा व्यापक अर्थाने तो योजण्यांत आला आहे. अन्नाचें दुर्भिक्ष्य साधारणपणें कोटि दीड कोटि लोकांना तर आज भोवत आहेच. परंतु उत्पादनाच्या अभावीं व संख्येच्या वाढीने हें दुर्भिक्ष्य वाढत आहे.* शिवाय अगदी खालचा, त्याच्या वरचा, मध्यम व अगदी वरचा असे समाजाचे चार विभाग केले, तर खालच्या वर्गाला अन्नाचें दुर्भिक्ष्य, त्याच्या वरच्या वर्गाला जरी दोन वेळ जेमतेम खावयास मिळत असलें तरी इतर आवश्यक गोष्टींची कमतरता, आणि मध्यम वर्गालाही जरी ह्या गोष्टी

---

* "शेंकडा ९० लोक उपासमारीच्या कक्षेंत सतत आहेत असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही असें आम्हास वाटतें." असें प्रो. जठार व प्रो. बेरी म्हणतात. (Indian Economics p. 27)

थोड्या अनुकूल, तरी एकंदरीने राहणीचा दर्जा समाधानकारक नाही, अशी आज समाजाच्या तीनही वर्गांची स्थिति आहे. आणि आजच्या स्थितींत उत्कर्षाच्या दृष्टीने महत्त्वाचा फरक न झाला तर ही आर्थिक अवनति अधिकाधिक वाढणार आहे. म्हणून संख्या व संपत्ति ह्यांतील तोल बिघडला आहे असें आम्ही म्हणतों. हा तोल अधिक बिघडूं न देतां ताळ्यावर आणावयाचा असेल तर त्याला सर्वांगीण नियोजनाखेरीज अन्य मार्ग नाही. निसर्गस्वाधीन जीवन व प्रवाहपतित वृत्ति—अतएव ऐहिक जीवनाची उपासमार, की बुद्धिपुरःस्सर परिस्थिति सुधारण्याचे प्रयत्न, असा हा पेचप्रसंग हिंदी जनतेपुढे आहे. त्याचा विचार जनतेने व सरकारने करावा ह्या उद्देशाने हा प्रस्तुत प्रयत्न आहे.

---

## प्रकरण आठवें

# नियोजन—सामाजिक

**आकांक्षा.** एकेकाळीं स्वयंपूर्ण व स्वतःसिद्ध असलेली ही भारतभूमि पुनः सुखाच्या व ऐश्वर्याच्या शिखरावर नेऊन बसविण्याची महत्त्वाकांक्षा प्रत्येक खऱ्या हिंदवासीयाच्या मनांत आज खात्रीने उचंबळत असली पाहिजे. एका काळीं जेथे सुवर्णाचा धूर निघत होता म्हणतात, जेथे प्रत्येकाच्या आवश्यक गरजा भागून उरलेला वेळ तत्वज्ञानाच्या आनंदांत सहजीं घालविला जात असे, त्याच समाजाला अज्ञानाच्या खाईतून बाहेर काढून पुनः कसें प्रगमनशील बनवितां येईल व जागतिक उत्क्रांतीच्या चढाओढींत अहमहमिकेने भाग घेऊन जगाच्या प्रगतीला हातभार लावण्याची शक्ति केव्हा हिंदभूच्या अंगीं येईल, अशा प्रकारचे अनेक प्रश्न देशाच्या उन्नतीची कळकळ बाळगणाऱ्या प्रत्येक हिंदपुत्राच्या मनांत कोलाहल करीत

असावे. अखिल समाज शारीरिक, बौद्धिक, आर्थिक व नैतिक दृष्ट्या श्रेष्ठ दर्जा कसा प्राप्त करून घेईल आणि प्रत्येकाला स्वच्छ व भरपूर अन्नपाणी, आरोग्यदायक निवाऱ्याची जागा, भरपूर वस्त्र, आवश्यक इतकें शिक्षण आणि आपलें कर्तृत्व दाखविण्याची भरपूर संधि मिळेल अशी समाजव्यवस्था केव्हा होईल, ही चिंता अहर्निश देशभक्तांच्या मनाला लागून राहणें स्वाभाविक आहे.

आसेतुहिमाचल भूमि आनंदांत कालक्रमणा करीत आहे, जेथे तेथे सुखाचें, समाधानाचें आणि जिवंतपणाचें साम्राज्य दिसत आहे, असें सुखस्वप्न केव्हा तरी सत्यसृष्टींत येईल काय? की ह्या साऱ्या कविकल्पना, हवेंतले मनोरेच राहणार? ह्या प्रश्नाचें उत्तर मनुष्याच्या कर्तृत्वावर ज्याचा विश्वास आहे त्याला होकारार्थी दिल्याशिवाय राहवणार नाही. पसतीस कोटि प्रजा स्वतःच्या सुसंघटित प्रयत्नाने, बुद्धिपुरःसर जेव्हा वरील ध्येयाच्या मागे लागेल तेव्हाच—कालांतराने का होईना—वरील सुखस्वप्न शक्यतेच्या कोटींत येईल.

**नियोजनाची आवश्यकता.** वरील ध्येयाच्या प्राप्तीसाठी आणि मागील प्रकरणांत प्रतिपादिलेला वाढत्या उपासमारीचा प्रश्न सोडविण्यासाठी, लोकसंख्या व सांपत्तिक उत्पादन ह्यांत समतोलपणा आला पाहिजे. हल्लीप्रमाणें ह्या दोनही बाजू परस्परांना खाली न खेचतां एकमेकांच्या पूरक झाल्या पाहिजेत. इतकेंच नव्हे, तर समाजाला श्रेष्ठ स्थान प्राप्त करून घेण्याकरितां **नियोजन**—सामाजिक, शैक्षणिक, राजकीय आणि आर्थिक असें सर्वांगीण नियोजन—पाहिजे. तेव्हाच देशाचें पाऊल पुढे पडावयास लागेल आणि वरील सुखस्वप्नें सत्यसृष्टींत उतरतील.

**शारीरिक.** संख्या व संपत्ति ह्यांचीं पारडीं समानरेषेंत आणण्याकरितां संख्येचें पारडें अधिक जड होणार नाही अशी

खबरदारी घेतली पाहिजे आणि संपत्तीच्या पारड्यांत अधिक भर घातली पाहिजे; तेव्हा कोठे मध्यबिंदु गाठतां येईल. पण संपत्तींत भर घालण्यास जी संख्या आहे ती कर्तृत्ववान् झाली पाहिजे, म्हणजेच संपत्तीच्या उत्पादनाचे मुख्य जबाबदार घटक जे लोक त्यांचा शारीरिक व बौद्धिक दर्जा वाढविला पाहिजे.

**अपंगांची संख्या न वाढण्यास उपाय.** समाजाचा शारीरिक दर्जा वाढण्याकरितां काय केलें पाहिजे हें आपण प्रथम विचारांत घेऊं. हिंदुस्थानामध्ये शारीरिक वा मानसिक व्यंगाने पीडित असलेले व अपंग असे ११ लक्ष लोक आहेत. ह्या लोकांची संख्या वाढणार नाही अशी प्रथम खबरदारी घेतली पाहिजे. ह्यांपैकी मानसिक व्यंग म्हणजे वेड लागणें हें थोडेंबहुत परिस्थितीनेही होतें. अपुरा आहार, जीवनकलहाचा तीव्रपणा, मानसिक ताण, स्त्रियांच्या बाबतींत वारंवार बाळंतपण येणें, वगैरे गोष्टी केव्हा केव्हा वेड लागण्याच्या मुळाशीं असतात. अर्थात हीं कारणें एकंदरींत सामाजिक व आर्थिक परिस्थिति सुधारल्यास नाहीशीं होतील अशी आशा आहे. पण सुप्रजाजननशास्त्राच्या मतें वेड लागणें हें बरेंचसें आनुवंशिकही आहे. "सर्वसाधारणपणें आम्ही असा निष्कर्ष काढतों की, बऱ्याच अंशीं मनुष्यांतील फरक जन्मतःच आढळून येतो. मानसिक दौर्बल्य असणाऱ्या मुलांत तीनचतुर्थांश मुलांचे आईबाप अगर इतर नातेवाईक कुणीतरी अशाच प्रकारचे असतात, म्हणून हा त्यांचा दुबळेपणा आनुवंशिक असावा."*

**वेडावर.** वेड लागलेल्या लोकांना समाजापासून दूर ठेवण्यांत यावें. हल्ली आपल्याकडे वेडयांचीं रुग्णालयें आहेत. परंतु वेडयांच्या संख्येच्या मानाने तीं फार अपुरीं आहेत. इंग्लंडमध्ये वेडयांना वेगळें ठेवण्यांत येतें. जर्मनींत व रशियांत त्यांना विवाहाची

---

* ब्रिटानिका ज्ञानकोश, आवृत्ती १४ वी.

बंदी आहे. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत वेड लागलेले, अपस्मारी, भयंकर दारुडे व भयंकर गुन्हेगार ह्यांची, त्यांच्या संमतीने वा पालकांच्या परवानगीने, ४८ पैकी २३ संस्थानांत, प्रजाजननशक्ति नाहीशी ( Sterilization ) करण्यांत येते. १९२१ पर्यंत ३१ हजारांवर अशा शस्त्रक्रिया करण्यांत आल्या.

**महारोगावर.** हिंदुस्थानांत महत्त्वाचा व भयंकर शारीरिक रोग म्हणजे महारोग होय. त्यांची नमूद असलेली संख्या दीड लाख आहे. पण ह्याहीपेक्षा ही संख्या बरीच मोठी असावी. कारण पुष्कळ वेळां हे रोगी लपवून ठेवले जातात. हा रोग स्पर्शजन्य व आनुवंशिक आहे. "प्रशियामध्ये एक महारोगी गेला तर त्याने ३० वर्षांत ९० आपणासारखे केले."* ह्यावरून हा रोग कसा लौकर पसरतो तें दिसून येतें. आणि आमच्याकडे तर त्यांना समाजांत वावरूं देतात. भिकारी तर कितीतरी दिसतात. शिवाय "मद्रासमध्ये रोग लागलेल्यांचीं लग्नें मुद्दाम घडवून आणतात. मुलींचीं लग्नें झालीं नाहीत तर त्यांना लग्नाशिवाय मुलें होऊं देतात." इतकेंच नव्हे तर त्यांचें प्रेत न जाळतां नदींत फेकून देतात! लोकांचें किती हें अज्ञान! म्हणूनच हा रोग इकडे वाढत्या प्रमाणांत आहे. तरी लोकांचें अज्ञान लक्षांत घेऊन ह्या रोगी लोकांना दूर ठेवलें पाहिजे; व रोगी ज्याला आढळेल त्याने त्याची सरकारांत नोंद द्यावी असा कायदा केला पाहिजे.

**इतरांवर.** बहिरे, मुके व आंधळे हे त्या मानाने निरुपद्रवी आहेत आणि त्यांची वाढ दुष्काळ व उपासमार ह्या कारणांनी बहुतकरून होते. आंधळेपणा हा कांही वेळां हयगयीने व अज्ञानाने येतो आणि कांही वेळां गुप्तरोगी आईबापांपासूनही येतो. अर्थात् परिस्थितीने होणारे दोष परिस्थिति सुधारतांच नाहीसे होतील.

---

* खानेसुमारी अहवाल, १९३१.

परंतु स्पर्शजन्य रोगांची गोष्ट निराळी. त्यांना समाजापासून दूर ठेवण्याची खबरदारी समाजाने घेतली पाहिजे. ही खर्चाची बाब वाटते खरी. परंतु ह्या खर्चामुळे अखेरीस फायदाच आहे. आनुवंशिक रोगांच्या बाबतींत, म्हणजे वेड लागलेले, अपस्मारी, महारोगी, भयंकर गुन्हेगार, गंडमाळा असलेले, अशा लोकांना प्रजोत्पादन करण्याची बंदी समाजाने केली पाहिजे. विशेष लक्षांत ठेवण्याची गोष्ट ही की, ह्या लोकांची प्रजोत्पादन शक्ति जास्त असते. त्यामुळे त्यांची संख्या योग्य काळजीच्या अभावीं वाढते. म्हणून जर्मनींतल्या प्रमाणें विवाहापूर्वी डॉक्टरांच्या कमिटीकडून कोणत्याही आनुवंशिक रोगाने वधूवरें पीडित नाहीत, असें शिफारसपत्र दाखविलें जावें असा निर्बंध करावा. सध्याचें लोकांचें अज्ञान व डॉक्टर लोकांची अल्प संख्या लक्षांत घेतां ही सुधारणा आणखी थोडीं वर्षें लांबणीवर टाकावी लागेल अशी भीति वाटते, तथापि आनुवंशिक रोग्यांच्या बाबतींत प्रजाजननशक्ति नाहीशी करणें शक्य व अवश्यही आहे. मात्र तसा कायदा करण्यास जनतेने सरकारास भाग पाडलें पाहिजे. अशा प्रकारच्या शस्त्रक्रियेने स्त्रियांना थोडासा त्रास होत असला तरी पुरुषांना कांही त्रास होत नाही व वैवाहिक संबंधांतही अडचण येत नाही. तरी ह्या प्रश्नाकडे जनतेचें लक्ष वेधणें अवश्य आहे.

**प्रतिबंधक उपाय.** दुर्बलांची संख्या कमी करण्याचा विचार केल्यानंतर इतर समाजाला निरोगी कसें करतां येईल ह्याचा विचार करणें अवश्य आहे. आपल्या देशांत साथीच्या व निवार्य अशा रोगांनी कसे लक्षावधि बळी दरवर्षी घेतले जातात हें आपण मागे पाहिलेंच आहे. तरी जे निरनिराळे रोग उद्भूत होतात त्यांची कारणपरंपरा शोधून त्यांवर प्रतिबंधक उपाय योजणें अवश्य आहे. १८९६ सालीं जेव्हा प्लेगने प्रथम कहर केला तेव्हा हा रोग ताब्यांत आणणें मानवी शक्तीपलीकडे आहे असें वाटलें. परंतु त्याचीं कारणें शोधून त्यावर

प्रतिबंधक उपाय योजण्यांत आल्यापासून त्या रोगाला पूर्ववत् लोक बळी पडत नाहीत. तसेंच इतर साथीच्या रोगांतही हल्लीपेक्षा अधिक कडक उपाययोजना केली पाहिजे आणि प्रतिबंधक उपायांच्या माहितीचा प्रसार लोकांच्या मातृभाषांमधून सुलभ रीतीने सर्वत्र केला पाहिजे.

**पाणी.** अस्वच्छ पाण्याचीच गोष्ट घेऊं. त्यामुळे अनेक रोग उद्भवतात. पाणी ही तर मनुष्याच्या जीवनांतील अत्यावश्यक गोष्ट आहे. पावसाळ्यांत जेव्हा पाणी खराब होतें, तेव्हा तर खेडयांतील लोकांचे हाल विचारतां सोय नाही असे होतात. तरी प्रत्येक मनुष्याला बाराही महिने स्वच्छ व पुरेसें पाणी मिळेल अशी व्यवस्था होणें जरूर आहे. हल्लीच्या प्रांतिक सरकारांचें लक्ष पाणीपुरवठयाच्या प्रश्नाकडे वेधत आहे, ही समाधानाची गोष्ट आहे. पण सर्वांना पुरेसें पाणी मिळेपर्यंत हे प्रयत्न थांबतां कामा नयेत. शिवाय रोगांची साथ आल्यावर किंबहुना सर्वसाधारण पहिला पाऊस पडल्यापासून तों पावसाळा संपेपर्यंत अत्यंत नियमाने पाणी चांगलें उकळूनच प्यालें पाहिजे, अशा तऱ्हेच्या विचाराचा फैलाव झाला पाहिजे.

**घरें.** दुसरी आवश्यक गोष्ट म्हणजे लोकांना आरोग्यदायक घरें व झोपडया राहण्यास मिळणें ही होय. हल्ली सरकारचें व जनतेचें लक्ष ग्रामसुधारणेकडे लागलें आहे, पण देशाचा विस्तार व जरूरी लक्षांत घेतां ह्याही बाबतींत विशेष नेटाने प्रयत्न व्हावयास पाहिजेत. एखाददुसऱ्या खेडयाची सुधारणा करून भागणार नाही. घरें बांधतांना पुरेशी हवा व उजेड त्यांत येईल अशी व्यवस्था केली पाहिजे. तसेंच सांडपाणी व गटारें ह्यांकडे लक्ष देऊन गावाचें आरोग्य कायम राहील अशी काळजी स्थानिक संस्थांनी हल्लीपेक्षा विशेष घेतली पाहिजे. कारण रोगाचा फैलाव गावांतील घाण बाहेर योग्य रीतीने न नेल्यामुळे कसा होतो हें 'कारणमीमांसें'त पाहिलें आहे. सार्वजनिक आरोग्याच्या बाबतींत जनतेलाही योग्य धडे देणें अवश्य

आहे. प्रत्येक गावांत एक शाळा, एक दवाखाना, एक सार्वजनिक विहीर व एक लहानसा बगीचा असावा असें कोण म्हणणार नाही? खऱ्या ग्रामोद्धाराकरितां वरील सोयींची अत्यावश्यकता आहे.

**औषधोपचाराची तजवीज.** वरील प्रतिबंधक उपायांचा विचार केल्यानंतरही रोगनिवारणाचा प्रश्न शिल्लक उरतोच. क्षय, गुप्तरोग इत्यादि जे सांसर्गिक रोग आहेत, त्यांचें प्रमाण कमी करण्याकरितां प्रयत्न होणें अवश्य आहे. लेडी लिनलिथगो ह्यांनी क्षयरोगाला आळा घालण्याकरितां एक योजना आखीत असल्याचें जाहीर केलें आहे. पण या रोगाचें प्रमाण कमी करण्याचा प्रथम पाया म्हणजे लोकांची जीवनशक्ति वाढविणें हा होय. आणि ती वाढण्याकरितां राहणीचा दर्जा अतएव आर्थिक स्थिति सुधारली पाहिजे, हें ओघानेच प्राप्त होतें. आर्थिक स्थितीचा विचार तूर्त दुसऱ्या प्रकरणावर सोपवून आपणास रोग हटविण्याकरितां इतर कोणते उपाय योजण्यासारखे आहेत हें पाहूं. ह्या बाबतींत रशियाने इतर राष्ट्रांच्याही पुढे पाऊल टाकलें आहे. रोग्यांच्या स्थितीप्रमाणें त्यांना रुग्णालयांत अगर आरोग्यभुवनांत ठेवण्यांत येतें. शिवाय कुणाही मनुष्याची प्रकृति खालावत आहे असें दृष्टीस पडतांच डॉक्टरी सल्ल्यावरून त्यांना रात्रीच्या आरोग्यभुवनांत दोन तीन महिने ठेवण्यांत येतें. म्हणजे दिवसा त्यांनी कामावर जावें व रात्रीं वरील आरोग्यभुवनांत येऊन गरम पाण्याने स्नान, चांगलें भोजन, थोडी करमणूक व अखेर स्वस्थ विश्रांति घ्यावी! तसेंच जनतेला रोगमुक्त कसें व्हावें याची माहिती देणारीं पत्रकें रुग्णालयांत व इतरत्र लावलेलीं असतात. इतकेंच नव्हे, तर वेळेला मनुष्याला तज्ज्ञ डॉक्टरांची एकदम जरूरी वाटल्यास त्यांस विमानांतून पोचविण्यांत येतें. हें सर्व तेथे प्रत्येक मनुष्यास फुकट मिळण्याची व्यवस्था आहे. सारांश, प्रत्येक मनुष्याच्या आरोग्याची व प्रकृतिस्वास्थ्याची काळजी सरकार अतिशय आस्थेने घेत आहे. तीच आस्था व काळजी

इकडील सरकारच्या मनांत उत्पन्न झाली पाहिजे, म्हणजे पैशाच्या वगैरे अडचणी फारशा पुढे येणार नाहीत व लोकांना वैद्यकीय मदत पुरेशी व वेळेवर मिळूं लागेल. ह्याकरितां तज्ञ डॉक्टर व वैद्य ह्यांची संख्या वाढवावी लागेल हें सांगणें नकोच. किंबहुना देशाची संख्या लक्षांत घेतां व हल्लीची आत्यंतिक जरूरी विचारांत घेतां, वैद्यकीय धंदा सार्वजनिक करण्यांत यावा. म्हणजे शहरांत दिसणारी डॉक्टरांची गर्दी आणि खेड्यांत दिसणारी उणीव भासणार नाही.

**आहार.** येथवर सुचविलेल्या उपायांनी देशांतील सध्या असलेलें मृत्युसंख्येचें प्रमाण थोडेंबहुत कमी होईल अशी आशा आहे. तथापि लोकांचा शारीरिक दर्जा सुधारण्यासाठी व कार्यक्षम गटांत जास्त संख्येची भर होण्याकरितां ( आ. ४ पहा ) इतर अनेक उपायांची आवश्यकता आहे. त्यांपैकी सर्वांच्या मुळाशीं असलेल्या आर्थिक परिस्थितीचा विचार तूर्त बाजूस ठेवून इतर उपायांचा विचार करूं. व्यक्तीच्या आरोग्यरक्षणाकरितां हवा, पाणी व त्याच्या खालोखाल पुरेसा आहारही आवश्यक आहे. सर्वांना भरपूर अन्नवस्त्र मिळणें हें संपत्तीच्या उत्पादनावर व विभागणीवर अवलंबून राहील. परंतु हल्ली ज्या लोकांपुढे पुरेशा आहाराचा प्रश्न नाही त्यांनाही आहाराविषयीं सशास्त्र माहिती नसते. म्हणून निरनिराळ्या आवश्यक द्रव्यांनी व जीवनतत्वांनी भरलेला आहार कोणता आहे ह्याची माहिती जनतेला मातृभाषेतून रेडिओ वगैरे साधनांनी वेळोवेळीं पुरविली पाहिजे. कुटुंबामध्ये आहाराचें नियोजन बहुश: स्त्रियांकडे असतें, म्हणून त्यांनी इकडे विशेष लक्ष द्यावें. तसेंच हल्लीची उपहारगृहें व खाणावळी ह्यांकडे जाण्याची प्रवृत्ति लक्षांत घेतां उपहारगृहादींच्या मालकांनी रुचीबरोबर पौष्टिकपणा व स्वच्छता इकडे लक्ष द्यावयास पाहिजे.

**प्रसूतिगृहें.** मृत्युसंख्येच्या अधिक प्रमाणाबरोबर इकडे बालमृत्युसंख्या व मातांची मृत्युसंख्या अधिक आहे हें आपण मागे

पाहिलेंच आहे (कोष्टक नं. ७). वर रुग्णालयें व डॉक्टर ह्यांची संख्या वाढली पाहिजे असें म्हटलें आहे. त्याबरोबरच प्रसूतिगृहें, स्त्री डॉक्टर व पास झालेल्या सुइणी यांचीही संख्या वाढली पाहिजे, म्हणजे गरोदरपणीं व प्रसूतीनंतर स्त्रियांना जरूर तो वैद्यकीय सल्ला व मदत मिळेल. सुइणीचा धंदा करणाऱ्या प्रत्येक स्त्रीला पास झाल्याचें शिफारसपत्र अवश्य आहे, असा दंडक केला पाहिजे.

**सारदा कायद्यांत बदल.** आमच्या समाजाच्या अधोगतीला आर्थिक स्थितीप्रमाणें कांही सामाजिक कारणेंही जबाबदार आहेत, हें 'कारणमीमांसा' प्रकरणांत सांगितलें आहे. तरी सामाजिक कारणें दूर करण्याचाही प्रयत्न होणें अवश्य आहे. बालविवाहाचा परिणाम बालमृत्यु व मातांचे मृत्यु वाढण्याकडे कसा होतो हें पान १०३ वरून स्पष्ट होतें. ह्या प्रकाराला आळा घालण्याकरितां सारदा कायदा १९३० सालीं पास केला, पण तो अपुरा आहे. त्या कायद्यानुसार मुलीची विवाहसमयीं किमान वयोमर्यादा १४ व मुलाची १८ ठरविली आहे. पण १४ व्या वर्षी लग्न झालें म्हणून १–२ वर्षांत मातृपद यावयाचें राहत नाही. आणि मुलीच्या शरीराची पूर्ण वाढ होण्यापूर्वीच मुलाचा जन्म झाल्यामुळे तें मूलही अशक्त निपजतें. आईलाही अशक्तपणा येतो तो निराळाच. ही स्थिति सुधारण्याकरितांच मुलीचें वय १८ वर्षांचें व मुलाचें २२ च्या खाली असतां कामा नये असा सारदा कायद्यांत बदल केला पाहिजे, म्हणजे दोघांच्याही शरिराची वाढ होईल व उभयतांनाही आपल्या मातृपितृविषयक कर्तव्याची कल्पना येईल. तसेंच दोघेही वयांत आले असल्यामुळे एकमेकांची निवड करण्याची पात्रताही त्यांच्यांत येईल. तसेंच लहान वयांत विवाह झाल्यामुळे मुलामुलींच्या शक्तीचा लैंगिक संबंधांत व्यय होतो तो थांबेल.

**आक्षेप व निरसन.** वर सारदा कायद्यांत सुचविलेली दुरुस्ती कांही जणांना मान्य होणार नाही. त्यांच्याकडून निरनिराळे

आक्षेप घेण्यांत येतील. त्यांपैकी पहिला असा की, वरील प्रकारचा कायदा मध्यम व वरिष्ठ वर्गाला मान्य झाला तरी खालच्या बहुसंख्य लोकांना तो मानवणार नाही. खरें, बहुजनसमाजाला सुधारणा हवी असते कुठली? आमच्या पराधीनतेच्या स्थितीमुळे सुधारणेविरुद्ध अशी अयोग्य मनःस्थिति बहुजनसमाजाची झाली आहे. म्हणून समाजाच्या अत्यंत हिताची सुधारणा करूं नये असें म्हणणें चुकीचें होईल. दुसरा आक्षेप हा की, हल्लीचा सारदा कायदा धाब्यावर बसविला जातो तर आणखी विवाहाचें वयोमान वाढविलें तर तो कायदा अजीबात मानला जाणार नाही! या आक्षेपांत थोडेंबहुत तथ्य आहे. परंतु अशा प्रकारचा कायदा सर्व हिंदुस्थानाकरितां (संस्थानांसहित) असावा. आणि त्याची उपयुक्तता बहुजनसमाजाला पटवून द्यावी. तोंवर शैक्षणिक योजनेने बहुजनसमाज अधिक समजूतदार होईल अशी आशा आहे. आक्षेप असा येईल की, विवाहाचें वयोमान वाढविल्यास अनीतीचा फैलाव होईल. अजाणत्या मुलींवरही हल्ली बलात्कार घडून येतात. तरी अशा कायद्याने हे प्रकार वाढत्या प्रमाणांत होतील! शिवाय आमचें हवामानही असें आहे की मुलामुलींच्या भावना लवकर जागृत होतात. ह्या आक्षेपानुसार सर्व अनिष्ट गोष्टी घडून येतील असें जरी गृहीत धरलें तरी सुद्धा विवाहसमयीं वयोमान वाढविण्यापासून होणारे फायदे या सर्व तोटयांहून अधिकच ठरतील. शिवाय शिक्षण सार्वजनिक व मोफत केलें असतां मुलामुलींचा काळ तेथे जाईल त्यामुळे अनीतीचा फैलाव होण्याचा संभव कमी होईल. समाज कर्तृत्ववान होण्याकरितां विवाहाचें वयोमान वाढविणें अवश्य आहे आणि त्याकरितां लोकजागृति व कायदा हीं दोन साधनें आहेत.

**दुसरा पेच.** पण विवाहाचें वय वाढलें म्हणजे जननसंख्या वाढेल! विवाहसमयीं २० ते २९ च्या दरम्यान जर मुलीचें वय असेल

तर तत्पूर्वी किंवा तदनंतर झालेल्या विवाहांपेक्षा जननसंख्येचें प्रमाण अधिक आढळून येतें. तसेंच ह्या वयांत विवाह झालेल्या आईपासून होणाऱ्या बालकांत बालमृत्यूचें प्रमाण कमी असतें. ह्या कारणांमुळे संख्येमध्ये भर पडणें स्वाभाविक आहे. तसेंच वर सांगितलेल्या अनेक आरोग्यविषयक उपाययोजनांनी मृत्युसंख्येचें प्रमाण कमी होईल. म्हणजे जननाचें प्रमाण व मृत्यूचें प्रमाण ह्यांतील अंतर हल्लीपेक्षा बरेंच वाढून लोकसंख्या आताच्या मानाने अधिक झपाट्याने वाढू लागेल. त्यांतच विधवाविवाह—की जो होणें न्यायी बुद्धीला अवश्य वाटतें—मिश्रविवाह वगैरे इष्ट सुधारणा झाल्यास जननसंख्येंत अधिक भर पडण्याचा संभव आहे. परंतु आपण मागील प्रकरणांत पाहिलें की, मृत्युसंख्येचें प्रमाण इतकें अधिक आहे तरी, हल्ली होत असलेल्या वाढीने, सध्याच्या आर्थिक परिस्थितींत उपासमार अधिकाधिक होत जाईल अशी भीति वाटते. त्यांतच संख्येची वाढ मोठ्या प्रमाणांत होऊं लागल्यास, जरी आर्थिक स्थिति सुधारूं लागली तरी, संख्येच्या वाढीमुळे राहणीचा दर्जा सुधारणें कठीण जाईल. अर्थशास्त्रज्ञांच्या मतें आहे हेंच मृत्युसंख्येचें प्रमाण राहिलें तरी १९४१ पर्यंत ४० कोटि प्रजा होईल! आपण तर मृत्यूचें प्रमाण शक्य तितकें कमी करूं पाहतों. आणि मानवी शक्तीचा अपव्यय थांबण्याकरितां व समाजाचा शारीरिक दर्जा वाढण्याकरितां वरील उपाय न्याय्य व अवश्य आहे. तेव्हा संख्येच्या वाढीने दुसराच पेच निर्माण होतो. शिवाय आर्थिक बदल होऊन त्याचा दृश्य परिणाम राष्ट्रीय उत्पन्न वाढण्यांत आणि त्याहीपेक्षा वैयक्तिक राहणीचा दर्जा सुधारण्यांत होण्यास कमींत कमी दहा पंधरा वर्षांचा काळ तरी निदान जावयास पाहिजे. तोंवर इकडे संख्येंत भर पडतच राहणार. तरी ह्या पेचांतून सुटण्यास जननसंख्या ताब्यांत आणावी असें आमचें निश्चित मत आहे. आज जें हिंदी समाजाचें जीवन केवळ निसर्गाधीन आहे

आणि त्यामुळे जनता अकर्तृत्ववान् व अल्पायुषी निपजून मानवी शक्तीचा जो भयंकर अपव्यय होत आहे तो थांबविण्याकरितां जननमृत्यूवर ताबा मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. पकी जनना-च्या प्रमाणावर ताबा मिळविणें म्हणजे संततिनियमन करणें होय.

**संततिनियमन.** संततिनियमन म्हणजे प्रजा अजीबात न होऊं देणें असें नव्हे, तर मर्यादित व सुदृढ प्रजा निर्माण करण्याकरितां संततिनियमन आचरणांत आणावयाचें आहे. ह्या उपायाने कुटुंब मर्यादित होतें, इतकेंच नव्हे तर दोन भावंडांमध्ये योग्य अंतर राहून प्रत्येक मुलाकडे जरूर तें लक्ष देणें आईबापांस शक्य होतें. कार सॉडर्सने म्हटलें आहे की, "दोन भांवडांमध्ये योग्य अंतर ठेवणें इत्यादि महत्वाची कामगिरी संततिनियमन करतें. मला हें स्पष्टपणें नमूद करावेंसें वाटतें की, अमर्यादित प्रजा होण्यापासून सुटका करून घेणें हें मनुष्याने मानवी इतिहासांत एक मोठेंच पुढे पाऊल टाकल्याचें निदर्शक होय. मर्यादित कुटुंबपद्धति हें जबाबदारीची भावना जागृत झाल्याचें द्योतक आहे."* ह्याच्याही पुढे जाऊन एच्. जी. वेल्सने म्हटलें आहे की, "लोकसंख्येवर नियंत्रण घालणें ही जागतिक जरूरी आहे."†

येणेंप्रमाणें लोकसंख्येच्या नियंत्रणाची जर जागतिक जरूरी आहे, तर मग हिंदुस्थानच्या परिस्थितींत ती अधिकच असली पाहिजे. संख्येच्या दृष्टीने तर आहेच, परंतु दर्जा सुधारण्याच्या दृष्टीनेही संततिनियमनाची आवश्यकता आहे असें आमचें प्रामाणिक मत आहे. व त्याकरितां हिंदुस्थानांतील खेडयापाडयांतून व समाजाच्या खालच्या वर्गांतून संततिनियमनाच्या सुलभ उपायांची माहिती व साधनें त्वरित

---

* *World Population*–Carr Saunders. Page 255.

† *Work, Wealth & Happiness of Mankind*–
H. G. Wells.

पुरविणें अवश्य आहे. अर्थात् हें काम सरकारच्या मदतीशिवाय होणें शक्य नाही. म्हणून अगोदर सांगितलेल्या रुग्णालयांच्या व प्रसूति-गृहांच्या जोडीला सरकारने ठिकठिकाणीं संततिनियमन केंद्रें (Birth Control Clinics) उघडावीं. म्हणजे लोकांना सोईस्कर पडेल व उपायांचा प्रसार होईल.

कृत्रिम संततिनियमनपद्धतीवर अनेक मंडळीकडून अनेक तऱ्हेचे आक्षेप घेतले जातात. हा प्रश्न मोठा वादग्रस्त म्हणून समजला जातो. ह्या आक्षेपांचें थोडक्यांत असें स्वरूप आहे की, हिंदुस्थानाला संततिनियमनाची आवश्यकता नाही व आवश्यकता असली तरी तें अमलांत आणणें शक्य नाही. तरी पहिल्या बाजूचा विचार करूं.

**आवश्यकता.** संख्येची वाढ होत असल्यामुळे व जरी झाली नाही तरी आहे त्या परिस्थितींत सुद्धा देशाची स्थिति सुधारण्यास उत्पादनांत भर व संख्येंत शक्य तितकी कमी भर पडावयास पाहिजे हें पूर्वीं सविस्तरपणें दिग्दर्शित केलेंच आहे. तथापि इतर तज्ज्ञ मंडळींचें काय म्हणणें पडतें हें पाहणें योग्य होईल. "कुटुंब मर्यादित करणें हाच एक हिंदुस्थानाला सुटकेचा मार्ग आहे."* असें कार सॉंडर्स म्हणतात. समाजशास्त्रज्ञ डॉ. घुरये ह्यांच्याही मतें ज्याप्रमाणें विवाहाचें वय वाढविणें अवश्य आहे त्याचप्रमाणें संततीच्या वाढीला आळा घालण्याकरितां संततिनियमनाचा जोराने पुरस्कार करणें अवश्य आहे. ॅटलनेही, जननसंख्या कमी केल्याशिवाय मृत्युसंख्या व बालमृत्युसंख्या कमी होणार नाही; तसेंच राहणीचा दर्जा व आयुर्मान वाढणार नाही; म्हणून संततिनियमन अवश्य आहे असें म्हटलें आहे. प्रो. जठार व प्रो. बेरी म्हणतात, "हल्ली हिंदी जनतेच्या सर्व वर्गांची प्रगति बेसुमार वाढीकडे आहे. म्हणून संघटित

---

* *World population*–Car Saunders. page 274

प्रयत्नाने बुध्याच जननावर नियंत्रण घालणें अवश्य आहे."* हिंदुस्थानच्या आर्थिक बिकट परिस्थितीची ज्यांना पूर्ण कल्पना आहे अशा प्रो. के. टी. शहा, प्रो. ब्रिजनारायण आदि मंडळींनींही हाच उपाय सुचविला आहे.

**शक्यता.** वरील सर्व मंडळींच्या मतें संततिनियमन अवश्य आहे खरें. परंतु तें शक्य आहे काय असा पुढील प्रश्न येतो. जनतेला आपल्या बिकट स्थितींतून थोडातरी सुटकेचा मार्ग दाखवून दिला व त्याची तजवीज केली की जनतेकडूनही त्याचा फायदा घेतला जातो. १९३० सालीं म्हैसूर संस्थानाने आपल्या चार रुग्णालयांत चार संततिनियमन केंद्रें उघडलीं आहेत. तसेंच फॅमिली हायजीन सोसायटीने मुंबईमध्ये दोन केंद्रें गेलीं दोन वर्षें चालविलीं आहेत. ह्या केंद्रांचा फायदा स्त्रीपुरुष वर्गाकडून घेतला जात आहे. मद्रासमध्येही कांही प्रोफेसर्स व इतर मंडळींनी मिळून निओ मॅल्थुशियन ॲसोसिएशन काढली आहे. सारांश, लोकांमध्ये ह्या उपायाचा प्रसार करणें आणि त्याचा फायदा घेतला जाणें शक्य आहे. मात्र हा प्रसार विस्तृत प्रमाणांत आणि सुलभ अशा योजनेने सर्व लोकांत करावयास पाहिजे.

**आक्षेप व उत्तरें.** आवश्यकता व शक्यता येवढ्याचाच विचार करून वरील उपायाचें वादग्रस्त स्वरूप संपत नाही. आणखी अनेक आक्षेप त्यावर घेण्यांत येतात. त्यांपैकी कांहींचा येथे विचार करणें जरूर आहे. एक आक्षेप असा की, जर संख्येवर नियंत्रण अवश्य आहे तर तें मनुष्याने आपले विकार ताब्यांत ठेवून करावें. अनैसर्गिक उपाय अमलांत आणूं नयेत. हें म्हणणें सकृद्दर्शनीं चांगलें वाटतें पण तें हाताच्या बोटांवर मोजतां येणाऱ्या मनुष्यांखेरीज कुणास

* *Indian Economics*--Prof. Jathar & Beri. Page 87.

शक्य आहे काय ? भारतभूच्या पूर्वीच्या सात्विक वातावरणांत सुद्धा विश्वमित्रासारख्या ऋषीला आपले विकार ताब्यांत ठेवणें शक्य झालें नाही. तेथे हल्लीच्या उत्तेजित वातावरणांत बहुजनसमाजाला आपले विकार ताब्यांत ठेवणें शक्य होईल काय ? हा विचार वाचकांनीच आपल्या मनाशीं करावा आणि आपलें मत ठरवावें.

प्रो. कर्वे म्हणतात की, "वस्तुस्थितीचा तीव्रपणा कमी करण्या-पलीकड जननसंख्येचें प्रमाण कमी करण्याने अगर सम राखण्याने लोकांच्या कल्याणावर कोणताही हितकारक परिणाम होणार नाही."* तसेंच प्रो. सरकार म्हणतात की, "संततिनियमन केल्याने दारिद्रयाचा प्रश्न सुटेल असें म्हणतां येत नाही." आम्ही झालें तरी हाच एक उपाय आहे असें म्हणत नाही. सर्व बाजूंनी नियोजन झालें पाहिजे असें म्हणतों, आणि त्यामध्ये संततिनियमन ही एक अवश्य सुधारणा आहे. शिवाय पूर्वी जे गर्भपात, बालहत्या, विधवाविवाहबंदी असे रानटी निर्बंध संख्येच्या वाढीवर असत त्या ऐवजीं संस्कृतीला साजेसा व मनुष्याला आत्मविश्वास उत्पन्न करील असा संतति-नियमनाचा उपाय आम्ही सुचवीत आहोंत. ह्या उपायाने मनुष्य प्राण्याची मुळांत उत्पत्तीच न होऊं देण्याची खबरदारी घ्यावयाची तर पूर्वींच्या प्रकारांत प्रत्यक्ष हत्या करण्यांत येत असे. या दोन्ही प्रकारां-मध्ये किती अंतर आहे तें पहा ! हल्लीच्या साधनांनी कुठलीच हत्या होत नाही हें विशेष आहे. शिवाय जगामध्ये आघाडी मारलेल्या देशांच्या जोडीस, कांही वर्षांनी का होईना, हिंदी राष्ट्राला नेऊन

---

* "इतर कोणत्याही कार्याकरितां नसलें तरी मातांचा बाळंतपणांत व बाळंतपणानंतर होत असलेला जबरदस्त संहार थांबविण्याकरितां तरी संततिनियमनाचा अवलंब करणें जरूर आहे–" पब्लिक हेल्थ कमिशन अहवाल, १९३३.

बसवावयाचें असेल तर वॅटल्च्या म्हणण्याप्रमाणें आदर्श जननमृत्यूचें प्रमाण हजारीं अनुक्रमें २० व १६ च्या आसपास आणलें पाहिजे.

आणखी एक अशी बाजू मांडण्यांत येते की, जर हिंदुस्थानची औद्योगिक उन्नति झाली तर हिंदुस्थानाला जास्त लोकसंख्या सहज पेलतां येईल. गोष्ट खरी आहे. पण हिंदुस्थानची औद्योगिक उन्नति सध्या मुंगीच्या पावलाने देखील होत नाही. ती झपाटयाने व सर्वांगीण होण्यास हवी असेल तर हल्लीच्या सरकारच्या व जनतेच्या दृष्टिकोणांत आमूलाग्र बदल झाला पाहिजे. आणखी २०–३० वर्षांत ही उन्नति झाली तरी हिंदुस्थानला इंग्लंड, जर्मनी अगर जपान ह्यांचें स्थान मिळणें शक्य नाही; शिवाय हिंदुस्थानची दरवर्षी हल्लीच्या प्रमाणाने तीस लक्षांची वाढ होत राहील तर त्यांची तरतूद कशी होणार? लोकसंख्या नुसती पोसण्याची हाव धरणें हेंही योग्य नाही. लोकांचा राहणीचा दर्जा उच्च संस्कृतीस साजेसा झाला पाहिजे.

बरें, नफ्याच्या तत्त्वावर हिंदुस्थानची औद्योगिक सुधारणा न करतां उपयोगाच्या तत्त्वावर केली, आणि एकंदरींत समाजाची रचना आर्थिक समतेच्या तत्त्वावर केली तरीही जननसंख्येचें प्रमाण वाढेल आणि समतेचा प्रश्न तसाच कायम राहील.

वरील गोष्टी घडून येणें हें केव्हाही कालावधीचें काम आहे. तोंपर्यंत होणारा मानवी संहार थांबविण्याकरितां व प्रजा मर्यादित होण्याकरितां प्रत्येक व्यक्तीने खबरदारी घेतली पाहिजे व ती खबरदारी त्यांना घेतां यावी म्हणून संततिनियमन केंद्रें उघडलीं पाहिजेत.

तरीपण एक आक्षेप उरतोच व तो म्हणजे ह्या उपायाचा अवलंब वरच्या सुशिक्षित वर्गाकडून होईल आणि त्यांचेंच प्रमाण घटेल. म्हणूनच आम्ही म्हणतों की, सरकारने व लोकहितेच्छु संस्थांनी हयाचा प्रसार खालच्याही वर्गांत व खेडयापाडयांतून करावा.

त्यांतूनही स्वतःच्या उन्नतीची संधि मिळाल्यास खालच्या वर्गातील कांही लोकांची सुधारणा होऊन ते वरच्या वर्गाची जागा घेतात, अशी नैसर्गिक प्रवृत्ति असल्याचें प्रो. सरकार सांगतात. मग कोणती हरकत आहे? शिवाय वर्गावर्गांतील भेद शक्य तितके कमी करण्याचें धोरण त्यापुढील समाजरचनेंत असावें.

बहुजनसमाजाकडून साधारणपणें पुढील आक्षेप घेतले जातात. संततिनियमनाने मातृपदाचा पवित्रपणा जातो; वांझपणासारखा दुसरा शाप नाही, मुलाखेरीज पितृऋण कोण फेडील? लहान कुटुंबांतील मुलें स्वार्थी होतात; इत्यादि. ह्या सर्व आक्षेपांना आमचें उत्तर हेंच की, अजीबात मुलें होऊं नयेत असें आम्ही म्हणत नाही. जेथे आईबापांचे आनुवंशिक रोग मुलांच्यांत येतील असें डॉक्टराचें म्हणणें असेल तेथेच अजिबात मुलें न होऊं देणें हें बरें, हें आम्ही वर सांगितलें आहेच. ह्याशिवाय निराळें उत्तर नको!

**व्यायाम.** शारीरिक दर्जा वाढविण्याकरितां मुलांमुलींना सक्तीचा व्यायाम देणें तसेंच देशांतील लोक स्वसंरक्षण क्षम होण्याकरितां लष्करी शिक्षण देणें इत्यादि गोष्टी अवश्य आहेत. व्यायामाच्या बाबतींत प्रांतिक सरकारचें लक्ष वेधत आहे ही समाधानाची गोष्ट आहे. लष्करी शिक्षण हें मात्र खऱ्या खुऱ्या अर्थाने केव्हा देण्यांत येईल तें येवो. इंग्रज सरकारास वाटत असावें की, लष्करी शिक्षण हिंदी लोकांना देऊं लागलें की देश हातांतील गेलाच असें समजावें. तेव्हा ही सुधारणा होणें राजकीय सत्तेवर अवलंबून राहील.

**स्त्रिया.** आणखी एका सामाजिक सुधारणेकडे जनतेचें लक्ष वेधावें असें आम्ही म्हणतों. समाजाचा जो निम्मा भाग–किंवा निम्म्याहूनही कमी–ज्या स्त्रिया, त्यांच्या विचार करणें अगत्याचें वाटतें. ह्यांतील बहुतेक भाग जन्मापासून अखेरपर्यंत दुसऱ्या निम्म्या भागावर अवलंबून राहिल्याने समाजाची उत्पादनशक्ति जवळजवळ निम्म्याने

कमी होते. हिंदी स्त्रियांपैकी ज्या स्त्रिया अर्थोत्पादनास लागतात त्या अगदी परिस्थिति भाग पाडते म्हणून लागतात. आणि जरा स्थिति सुधारतांच काम सोडूनही देतात. मुख्यत्वें पुरुषांवर अवलंबून राहण्याची बहुसंख्य स्त्रियांची प्रवृत्ति असते. ही गोष्ट समाजहिताच्या दृष्टीने व स्त्रियांच्या दृष्टीनेही योग्य नाही. त्यांनी आपली परावलंबी स्थिति टाकून समाजाच्या प्रगतीला हातभार लावणें अवश्य आहे. ह्यावर असें म्हणण्यांत येईल की, प्रजोत्पादनाचें महत्त्वाचें सामाजिक काम स्त्रीवर्गाकडे आहे. ह्याव्यतिरिक्त दुसरें काम त्यांनी करणें अनवश्यक आहे. निसर्गाने स्त्रीवर्गाकडे सोपविलेली कामगिरी किती महत्त्वाची आहे हें आम्हांला पूर्णपणें समजतें. पण ती जबाबदारी पार पाडणें म्हणजेच स्त्रीच्या आयुष्यांतील इतिकर्तव्यता असें मात्र आम्हांस वाटत नाही. तिच्या व्यक्तित्वाची पूर्ण वाढ तिने करून घ्यावयास पाहिजे. म्हणजेच ती आदर्श माता होऊं शकेल. हल्ली बहुसंख्य हिंदी स्त्रियांचें जीवन कसें आहे ? मनुष्य म्हणून सर्वांगीण जीवनाचा लाभ तिला केव्हाच मिळत नाही; अज्ञानामुळे मातृपदाची जबाबदारी नीट पार पाडतां येत नाही. एक तर अकालीं वैधव्य, नाही तर वरचेवर बाळंतपणें आणि स्वतःचा अकालीं शेवट ! ही स्थिति सुधारणें कितीतरी अवश्य आहे. त्यांच्या शरीराची नीट जोपासना लहानपणापासून झाली पाहिजे. निदान १४ वर्षेपर्यंत शिक्षण दिलें पाहिजे, नंतर १८ वर्षांपर्यंत म्हणजे विवाह होईपर्यंत कुठल्या तरी योग्य व्यवसायांत त्यांना गुंतविलें पाहिजे. जपानमधील मुली असेंच करीत आहेत. तिकडे स्त्रिया निरनिराळे व्यवसाय करतातच, शिवाय कापडाच्या गिरण्या रात्रंदिवस ज्या चालत आहेत तेथे मुलीच काम करीत असतात. पण तिकडील गिरण्यांची व्यवस्था व स्थिति इकडल्यापेक्षा किती तरी पटींनी चांगली असते. हिंदी स्त्रियांनी विवाहोत्तर

फार तर १०–१५ वर्षें विशेष कष्टाचें काम करूं नये. पुढे पुन्हा समाजाच्या उत्पादनांत भर घालण्यास झटावें. म्हणजे त्यांच्याही व्यक्तित्वाची वाढ होईल व समाजाच्याही प्रगतीला हातभार लागेल. ह्यावर असा आक्षेप येईल की, स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने चढा-ओढ करावयास लावणें चुकीचें होईल. आम्हांला तसें वाटत नाही. समाजाची आर्थिक व सांस्कृतिक स्थिति सुधारण्याच्या कामीं स्त्रियांनी हातभार लावणें अवश्य आहे.

एथवर समाजाच्या शारीरिक नियोजनाचा विचार केल्यानंतर दुसरी महत्वाची जी शैक्षणिक बाजू तिचा विचार करूं.

**शैक्षणिक नियोजन.** अखिल हिंदी समाजाचा प्रश्न आपल्यापुढे मांडून घेऊन सर्व समाज सुखी व प्रगतिपर करण्याचें ध्येय आपण ठरविलें. त्याचबरोबर ध्येयसिद्धीकरितां सर्व बाजूंनी नियोजन करावयास पाहिजे, तेव्हाच विविध प्रकारचे दोष नाहीसे होऊन ध्येयाच्या मार्गास हिंदी जनता लागेल हेंही उघड करून सांगितलें. प्रथमतः जनतेला सुदृढ, निरोगी व दीर्घायुषी केलें पाहिजे. त्याकरितां कोणत्या उपायांची अवश्यकता आहे हें येथवर पाहिलें आहे. तथापि वरील उपाय पूर्णपणें सिद्धीस जाण्यास आर्थिक व शैक्षणिक अनुकूल परिस्थितीची आवश्यकता आहे. तरी शैक्षणिक उपाययोजनेचा विचार करून सामाजिक नियोजनाचें विवेचन पुरें करूं या.

**सद्यःस्थिति.** सर विश्वेश्वरय्या म्हणतात, "समाज शिक्षित झाला तर तो राजकीय सत्ता मागेल अशी सरकारला भीति वाटत असावी."* ह्या भीतीमुळे म्हणा किंवा इतर कांही कारणामुळे म्हणा, पण हिंदी बहुजनसमाज आजवर अज्ञानांधकारांतच ठेवण्यांत

* *Planned Economy for India*–Sir Vishweshwarayya; Page 2 51

आला आहे. देशांत अवघे शेंकडा ८ लोक साक्षर आहेत. तसेंच शिक्षणसंस्था, शिक्षणावरील खर्च इत्यादि देशाच्या मानाने कसा अपुरा आहे हें आपण तिसऱ्या प्रकरणांत विस्तरशः पाहिलें आहे. त्याचबरोबर एकंदरींत जीवन कष्टमय झाल्यामुळे व आशेचा सूर कोठूनही निघत नसल्यामुळे लोकांचा दृष्टिकोण निराशामय व पुराण-मताभिमानी झाला आहे. पूर्वीच्या स्मृतिचित्रावर ते आज जगत आहेत आणि त्याचे उरलेले अवशेष घट्ट कवटाळून धरीत आहेत. त्यांना मुळी भविष्यकाळ दिसतच नाही. पण ह्या गडबडींत वर्तमान काळ केव्हाच निघून जात आहे याची त्यांना दाद लागत नाही!

**सुरुवात.** तेव्हा, येथून आपल्याला सुरुवात करावयाची आहे. भूतकाल फक्त स्फूर्तीपुरताच जागृत ठेवून वर्तमान कालाची जाणीव करून दिली पाहिजे. ती करितांना इतर समाजांबरोबर स्वसमाजाची तुलना करण्याची बुद्धि जागृत केली पाहिजे. वर्तमानकालाच्या जाणिवे-बरोबरच भविष्यकाळाचें उज्ज्वल चित्र त्यांच्यापुढे ठेविलें पाहिजे. त्याच-बरोबर हें चित्र सत्यसृष्टींत उतरण्याकरितां व्यक्तिशः व सामुदायिक रूपाने सतत प्रयत्न करणें अवश्य आहे, हें पटवून दिलें पाहिजे.

**आर्थिक स्वास्थ्य.** ही जागृति वा चळवळ आसेतुहिमाचल व आबालवृद्धांपासून सर्वत्र व सारखी झाली पाहिजे. सध्या राजकीय स्वातंत्र्याकरितां थोडीफार चळवळ जनतेमध्ये चाललेली दिसून येते. पण ती पुरेशी नसून एकंदरींत लोकांमध्ये नवचैतन्य आलें पाहिजे. त्याकरितां प्रथमतः त्यांना कांही तरी आर्थिक स्वास्थ्य लाभणें जरूर आहे, ही गोष्ट खरी. पण त्याचा अर्थ असा नव्हे की, आर्थिक स्थिति जेव्हा सुधारेल तेव्हाच जागृति होईल; तर ह्या सर्व गोष्टी परस्परा-वलंबी आहेत, हा हें सांगण्याचा उद्देश आहे. लोकांमध्ये नवचैतन्य उत्पन्न होण्यास, त्यांना उत्साह येण्यास, प्रत्यक्ष स्वरूपांत कांही तरी जीवन सुधारावयास लागलें आहे असें प्रथम वाटलें पाहिजे.

**शिक्षणाचें ध्येय.** बर्ट्राण्ड रसेलने म्हटलें आहे, "शिक्षण ही नव्या जगाची किल्ली आहे."* तेव्हा शिक्षणाची किल्ली फिरवून अज्ञानी, दुर्बल, पुराणमताभिमानी व मागासलेल्या हिंदी जनतेला डोळस, सशक्त, अद्ययावत् आणि पुरोगामी बनवावयाचें आहे. शिक्षणाने प्रत्येक हिंदी मनुष्य, जबाबदार, कर्तत्ववान् आणि सुसंस्कृत बनला पाहिजे. आम्हांला स्वतंत्रता पाहिजे; लोकसत्तात्मक राज्य-पद्धति पाहिजे; प्रत्येक वयांत आलेल्या स्त्रीपुरुषाला मतदानाचा अधिकार पाहिजे; तरी ह्या सर्व हक्कांमुळे येणारी जबाबदारी पार पाडण्याची पात्रता प्रत्येक नागरिकामध्ये आली पाहिजे. त्याकरितां पुढे सांगितल्याप्रमाणें वयस्क जनतेला–स्त्री व पुरुष–साक्षर करून, हरएक उपायाने त्यांचें ज्ञान वाढवून व जागतिक घडामोडींची यथार्थ जाणीव करून देऊन, स्वतःचें मत बनविण्याची योग्यता आणली पाहिजे. हेंच ध्येय पुढे ठेवून नव्या पिढीच्या शिक्षणाची योजना आखावयास पाहिजे.

**वयस्कांचें शिक्षण.** वरील ध्येयपूर्तीसाठी व लोकांचा सध्याचा दृष्टिकोण बदलण्याकरितां, तसेंच त्यांच्यांत नवजीवन येण्यास अनेक आधुनिक साधनांचा उपयोग करावा लागेल. प्रथम सर्व वयस्क जनतेला साक्षर करण्याकरितां एक योजना आखली पाहिजे. साधारणपणें १० वर्षांच्या आंत साक्षरतेचें प्रमाण देशामध्ये शेंकडा ९० झालें पाहिजे. साक्षरतेसाठी शिक्षित स्त्रीपुरुष आपला फुरसतीचा वेळ अगर उन्हाळ्याची सुटी वगैरे द्यावयास तयार होतील अशी उमेद आहे. ह्या सर्वांचे निरनिराळे गट करून त्यांना सरकारी खर्चाने देशाच्या सर्व भागांतून पाठविण्यांत यावें. परंतु जनतेला नुसतें लिहावाचावयास शिकवून काम भागणार नाही. तर साक्षरतेचा खराखुरा उपयोग होण्या-करितां फिरतीं वाचनालयें व फिरते शिक्षक, की जे लोकांमध्ये सचित्र

---

* *On Eduction*–Bertrand Russel; Page 66.

व्याख्यानें देऊन हुन्नर, धंदे, आरोग्य, जागतिक घडामोडी इत्यादि विषयांची माहिती देत राहतील, असे ठेविले पाहिजेत. त्याचबरोबर लोकांच्या अडचणी समजून घेऊन त्यांच्यांत सहकार्याचें, शिस्तीचें आणि श्रमाचें तत्त्व बिंबित केलें पाहिजे. हल्ली मध्यवर्ती सरकारच्या धोरणानुसार खेडेगावांतून रेडिओद्वारा खेडुतांची करमणूक करण्यांत येते. वेळेला चार गोष्टीही सांगण्यांत येतात. पण रेडिओच काय, तर चलच्चित्रें सुद्धा हातीं घेऊन, लोकांना आपलें सामाजिक, सांस्कृतिक व व्यावसायिक जीवन कसें सुधारावें हें सांगतां येणें शक्य आहे. शेतीचीच गोष्ट घेऊं. शेतकी खात्याच्या सल्ल्याने त्यांचेच तज्ज्ञ सल्लागार घेऊन इकडील शेतींत ज्या ज्या सुधारणा अवश्य आहेत त्यांचा चित्रपट तयार करून खेड्याखेड्यांतून लोकांना दाखविणें शक्य आहे. अर्थात ह्या सुधारणांचा योग्य फायदा होण्यास त्याच्या जोडीला जरूर तीं साधनें व परिस्थिति असली पाहिजे ही गोष्ट खरी आहे. आणि त्याचा विचार पुढील प्रकरणांत होणार आहे. त्याचबरोबर आपलें उत्पन्न वाढविण्याकरितां कोणते व्यवसाय करणें शक्य आहे ह्याचीही माहिती लोकांना सप्रयोग करून दिली पाहिजे. तसेंच आपला आहार कोणता असावा, स्वच्छता कशी ठेवावी, रोगराईपासून बचाव कसा करावा, इत्यादि अनेक लोकोपयुक्त विषयांचें ज्ञान जनतेला देणें जरूर आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे बहुजनसमाजाच्या राहणीचा दर्जा सुधारण्याकरितां जी जी ज्ञानविषयक सामग्री अवश्य आहे तेवढी जनतेच्या आटोक्यांत आणून द्यावी.

**नव्या पिढीचें शिक्षण.** हल्लीची शिक्षणपद्धति व विषय हे अपुरे व सदोष आहेत असें आजवर अनेक वेळां सांगण्यांत आलें आहे. इतकेंच नव्हे, तर आदर्श शिक्षण संस्था म्हणून रवींद्रनाथ टागोर ह्यांनी विश्वभारती विद्यालय स्थापन केलें. असहकारितेच्या चळवळींत टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, गुजरात विद्यापीठ हीं स्थापन

करण्यांत आलीं. बनारस हिंदु युनिव्हर्सिटी, अलिगड मुस्लीम युनिव्हर्सिटी, अशीं धर्मविशिष्ट विद्यापीठेंही स्थापन करण्यांत आलीं आहेत. तसेंच प्राथमिक शिक्षणाकडेही पुढाऱ्यांचें लक्ष वेधत आहे. कांही महिन्यांपूर्वीं महात्मा गांधींच्या अध्यक्षतेखाली वर्धा येथे ( आक्टोबर १९३७ ) शिक्षण परिषद बोलावण्यांत आली होती. त्या परिषदेने प्राथमिक शिक्षणाचीं तीन तत्त्वें मान्य करून सविस्तर योजनेकरितां एक कमिटी नेमिली. तिचा अहवाल नुकताच ( ११ डिसेंबर १९३७ रोजीं ) बाहेर पडला आहे.

**वर्धा शिक्षण कमिटी अहवाल.** महात्मा गांधींच्या अध्यक्षतेखालीं आक्टोबरमध्ये वर्धा येथे भरलेल्या परिषदेंत शिक्षणाचीं तीन तत्त्वें मान्य करण्यांत आलीं. ह्यांपैकी पहिले दोन मुद्दे जवळ जवळ सर्वमान्य होण्यासारखे आहेत. शिक्षण सक्तीचें व मोफत असावें व तें मातृभाषेंतून दिलें जावें ह्याबद्दल वाद नाही. पण तें सात वर्षें असावें की अधिक वर्षें असावें, तसेंच वयाच्या सातव्या वर्षापासून सुरू व्हावें की लौकर सुरू करणें अवश्य आहे, ह्याबद्दल मतभेद असणें स्वाभाविक आहे. परिषदेस जमलेल्या शिक्षणतज्ञ मंडळीविषयीं अगर कमिटीच्या सभासदांविषयीं आम्हांला पूर्ण आदर आहे. तथापि आमचा जो प्रामाणिक मतभेद आहे तो येथे नमूद करावासा वाटतो. शिक्षणविषयक सर्वसाधारण योजना आम्ही पुढे दिलीच आहे. तदनुसार शिक्षणक्रम मुलामुलींच्या तिसऱ्या नाही तरी पांचव्या वर्षापासून सुरू व्हावा असें आम्हांस वाटतें. परिषदेंत पास झालेलें व कमिटीने मूलभूत धरलेलें तिसरें तत्व आक्षेपार्ह वाटतें. सातही वर्षांच्या शिक्षणाचा मुख्य उद्देश 'हस्तव्यवसायिक अगर उत्पादक' असावा, इतकेंच नव्हे तर या हस्तव्यवसायाच्या उत्पन्नांतून शिक्षकाचा पगार निघावा असें कमेटीचें म्हणणें आहे. ह्या बाबतींत कमिटीचे सभासद प्रो. के. टी. शहा ह्यांची भिन्नमतपत्रिका अजून छापण्यांत आली नाही.

आजपर्यंतच्या शिक्षणपद्धतींत धंदेशिक्षणाकड लक्ष पुरविलें जात नाही, म्हणून तिजवर योग्य टीका होत असे. पण प्राथमिक शिक्षणांत हस्तव्यवसायाला, मुलामुलींच्या नैसर्गिक प्रवृत्तीचा विचार न करतां, सर्वस्वीं महत्त्व देणें आणि तें सुद्धा द्रव्योत्पादक दृष्टीने, हें योग्य नाही. "उत्पादनांत जोंपर्यंत नफ्याचा हेतु आहे आणि द्रव्यासाठी काम आहे तोंपर्यंत न कळत का होईना, उदार शिक्षणाच्या मुळा-शींच घाव घातल्यासारखा होणार आहे." असें प्रो. के. टी. शहा ह्यांनी वरील तत्त्वावर टीका करतांना टाइम्स ऑफ इंडियांत* म्हटलें आहे. शिक्षणाचें ध्येय प्रगमनशील, सुसंस्कृत व कर्तृत्ववान नागरिक तयार करणें हें मान्य केल्यावर, उत्पादक कार्यांत निव्वळ साधन म्हणून प्रामुख्याने त्याचा उपयोग करणें गैर होईल. दुसरी गोष्ट आम्हांला येथे नमूद करावीशी वाटते की हल्लीचें युग यांत्रिक युग आहे. यंत्रसाहाय्याने मनुष्याचें श्रम कितीतरी पटीने वाचले आहेत. हेन्री फोर्डने म्हटलें आहे, "पृथ्वीच्या पाठीवर गुलाम पाहावयाचा असेल तर यंत्रसाहाय्याशिवाय काम करीत असलेल्या मागसलेल्या देशां-तील मनुष्य होय." यांत्रिक सुधारणेबरोबर भांडवलशाही आली आणि तिचे अनिष्ट परिणाम बहुजनसमाजला भोगावे लागतात, ही गोष्ट खरी; पण त्यावर तोड रशियाने दाखवून दिलेलीच आहे. हिंदुस्था-नाच्या परिस्थितीनुसार योग्य ती खबरदारी घेऊन मोठ्या प्रमाणावर उद्योगधंदे सुरू करणें अवश्य आहे असें आम्हांस वाटतें. ह्यापेक्षा जास्त न लिहितां आमची शिक्षणाची सामान्य योजना आम्ही पुढे ठेवीत आहोंत.

**सक्तीचें व मोफत शिक्षण.** प्राथमिक शिक्षण सर्वत्र मोफत व सक्तीचें असावें अशी मागणी जनतेकडून अनेक वर्षे कर-

---

* *Illustrated weekly–Times of India*
**14-11-1937**

ण्यांत आली आहे. सरकारने त्याची जरूरी ही तत्वत: मान्य केली आहे. परंतु खर्चाच्या सबबीमुळे शिक्षण सार्वत्रिक सक्तीचें करण्यांत आलें नाही व आजवर जो थोडाबहुत खर्च करण्यांत आला आहे त्याचा तादृश फायदा दिसत नाही. हल्ली शिक्षणखातें लोकनियुक्त मंत्र्यांच्या हातांत आहे, त्यामुळे बरीच मोठी सुधारणा घडून येईल अशी आशा वाटावयास लागली आहे.* तथापि त्यांच्यापुढे शिक्षणावर खर्च कोठून करावा हा प्रश्न येतोच! कारण हल्लीच्या कायद्याचा विशेष हाच आहे की, उत्पन्नाच्या बाबी व लष्करासारख्या अवाढव्य खर्चाच्या बाबी मध्यवर्ती सरकारच्या हातीं असून त्यावर लोकांचा मुळीच ताबा नाही.

खर्चाचा प्रश्न तूर्त बाजूस ठेवून शिक्षणाची रूपरेषा कशी असावी हें पाहूं. इंग्लंडमध्ये पांचव्या वर्षापासून चवदाव्या वर्षापर्यंत, रशियांत तिसऱ्या वर्षापासून अठराव्या वर्षापर्यंत व जपानमध्ये चवदाव्या वर्षापर्यंत, मोफत व सक्तीचें शिक्षण देण्यांत येतें. ह्यांतच व्यावसायिक शिक्षणाचा अंतर्भाव होतो. तरी आपणाकडे वयाच्या तिसऱ्या वर्षापासून चवदाव्या वर्षापर्यंत शिक्षण सक्तीचें व मोफत असावें असें आम्हांस वाटतें. तिसऱ्या वर्षापासून सुरवात करण्याचें कारण असें की, लहानपणीं मुलावर चांगले संस्कार करणें अधिक सुलभ जातें. आपल्याकडे अज्ञानामुळे व दारिद्र्यामुळे मुलांची आबाळ फार होते. त्यांच्याकडे पूर्ण लक्ष देण्यास सर्वसाधारण आईबापांना फुरसत नसते किंवा वेळेला ती इच्छाही नसते. म्हणून प्रत्येक लहान गांवीं एक शालागृह स्वच्छ व मोकळ्या जागेंत असावें. तेथे सकाळीं ८ ते १० ॥ वाजेपर्यंत ३ ते ५ वर्षांच्या मुलांचे वर्ग भरवावे. प्रथम मुलें स्वच्छ व नीटनेटकीं आहेत की नाहीत हें

---

* मुंबई सरकारने शिक्षणविषयक तीन चौकशी कमिटया नेमिल्याचें समजतें. मध्यप्रांत विद्यामंदिराची योजना अमलांत येण्याच्या मार्गांत आहे.

शिक्षकाने पाहावें. ज्यांना जरूर असेल त्यांना दूध देण्यांत यावें. ह्या दोन वर्षांच्या शिक्षणक्रमांत मुलांना अक्षरओळख वगैरे तात्विक विषय शिकवून मुख्यत्वें व्यायाम, शिस्त, परस्पर खळीमेळीने वागणें वगैरे गोष्टींवर जोर देण्यांत यावा.

तदनंतरचा शिक्षणक्रम ९ ते ११ वर्षांपर्यंतचा असावा. त्यामध्ये मातृभाषा व राष्ट्रभाषा, गणित, इतिहास–भूगोल, इत्यादि विषय शक्य तितक्या उपयुक्त दृष्टीने व मनोरंजक रीत्या शिकविण्यांत यावे. त्याचबरोबर मुलांना अभ्यासाकरितां योग्य ते श्रम घेण्याचीही सवय असावी. सुतारकाम, शिवणकाम, बागबगीचा इत्यादिकांचें शिक्षण, की ज्यायोगें हात व नजर हीं तत्पर होतील, असें अवश्य देण्यांत यावें. त्यांतही यंत्रसाहाय्याने काम कसें सुलभ होतें हें सप्रयोग दाखवावें. व्यायाम व खेळ सक्तीचे असावेत. ह्या वर्षांमध्ये मुलांच्या मनाचा कल पाहाण्याकडे शिक्षकाचें लक्ष विशेष असावें. म्हणजे ज्या विषयाकडे मुलाचा कल असेल त्या विषयाकडे मुलास पाठविणें सुलभ होईल.

मुलांचें व मुलींचें वर्गीकरण करण्यास १२ ते १४ ह्या दोन वर्षांच्या अभ्यासक्रमापासून सुरुवात व्हावी. प्रत्येक विद्यार्थ्याला ह्या दोन वर्षांत एक तरी व्यवसाय साधारणपणें शिकतां येईल, हा मुख्य मुद्दा असावा. बाराव्या वर्षापर्यंत मुलामुलींचा कल शिक्षकांनी पाहिल्यामुळे तदनुसार ह्या दोन वर्षांत निरनिराळ्या हुन्नरव्यवसायाकडे त्यांना पाठवितां येईल. तथापि येथेही आरोग्यशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र आदिकरून शास्त्रीयज्ञान हा आवश्यक विषय असावा. मुलींना गृहव्यवस्थाशास्त्र (Domestic Science) शिकविण्यांत यावें.

**मुलींचें शिक्षण.** वरील सक्तीच्या योजनेंत वैशिष्ट्याने मुलींचा उल्लेख केला नाही ह्यावरून त्यांच्या शिक्षणाचें महत्त्व

आम्हांस कमी वाटलें असा कोणी अंदाज केल्यास तो चुकीचा होईल. मुलामुलींना १२ वर्षेंपर्यंत सारखें सक्तीचें शिक्षण असावें. पुढे मुलींच्या प्रवृत्तीनुसार त्यांचें आपोआपच वर्गीकरण होईल. मुली मुलांच्या मानाने बुद्धीने कमी आहेत अगर त्यांना शिक्षणाची तितकी आवश्यकता नाही असें आम्हांस मुळीच वाटत नाही. तसेंच स्त्रियांचें व पुरुषांचें कार्यक्षेत्र अगदी भिन्न अतएव त्यांना अगदी निराळें शिक्षण द्यावें असेंही आम्हांस वाटत नाही. आमच्या मतें स्त्रियांनीही पुरुषां-प्रमाणें आपल्या व्यक्तित्वाची वाढ करून घ्यावयास पाहिजे; त्यांनाही जीविताचा उच्च व विविध प्रकारचा आनंद उपभोगण्याची पात्रता आली पाहिजे. उभयतांनाही जबाबदार नागरिक व्हावयाचें आहे आणि आपल्या वैयक्तिक, शारीरिक व मानसिक सामर्थ्यानुसार देशाच्या संस्कृतींत व आर्थिक उत्पादनांत भर घालावयाची आहे. आमच्या मतें शिक्षणाचें धोरण आखतांना हीं तत्त्वें मान्य करण्यांत यावींत.

**धंदेविषयक शिक्षण.** तसेंच धंदेविषयक शिक्षणाचें महत्त्वही आम्हांस पटत आहे. पुढील प्रकरणांत जी उद्योगधंद्यांची वाढ करण्याची व शेतीसुधारणा करण्याची सूचना केली आहे, त्याकरितां शिक्षित व कारागीर मनुष्यांची गरज ही लागणारच. तरी तदनुसार १२ वर्षांपुढील शिक्षणक्रमामध्ये आसपासच्या परिस्थितीप्रमाणें उद्योग-धंद्यांना अनुसरून दुय्यम शाळा व उच्च शिक्षणालयें (Technical Schools) असावीं. सर विश्वेश्वरय्या म्हणतात, "Polytechnisation of Schools should be the watchward for some time to come." इतकें प्रस्तुत ठिकाणीं स्थूलमानाने सांगणें पुरें होईल असें वाटतें.

**इतर सूचना.** मुलामुलींची वैद्यकीय तपासणी, त्यांना सक्तीचा व्यायाम, निरनिराळ्या कलांशीं थोडाफार परिचय, ह्यांचाही अंतर्भाव वरील शिक्षणक्रमांत असावा.

**दुय्यम शिक्षण.** चौदा वर्षांनंतर तो मुलगा अगर मुलगी शिक्षणाचा संस्कार झालेली, थोडीबहुत जबाबदारीची कल्पना आलेली व एक तरी व्यवसाय साधारणपणें जाणणारी अशी तयार व्हावी. त्यांतील जीं निवडक व हुषार निघतील त्यांना दुय्यम शिक्षणाकडे पाठवावें. ज्यांच्या आईबापांना पुढील शिक्षणाचा खर्च पेलणें शक्य नसेल, त्यांना शिष्यवृत्त्या देण्यांत याव्या आणि जें खालच्या शिक्षणक्रमांत वर्गीकरण करण्यांत आलें तें पुढे चालू ठेवावें. हल्लीच्या हायस्कूलमधील शिक्षणाच्या जोडीचें पण अगदी निराळें असें तें शिक्षण असावें.

**उच्च शिक्षण.** पुढ उच्च शिक्षण. तेथे तर अगदी नियमित पण हुषार अशाच विद्यार्थ्यांना वेगवेगळ्या शाखांमध्ये प्रावीण्य मिळवितां येईल व संशोधन करतां येईल अशी सवड असावी. ह्यापेक्षा उच्च शिक्षणाबद्दल व एकंदरींत शिक्षणाच्या सविस्तर योजनेबद्दल विचार करण्याचें आम्ही तज्ज्ञ मंडळीवर सोपवितों, मात्र हल्ली दुय्यम व उच्च शिक्षणामध्ये जीवन व शिक्षण ह्यांत फारकत असलेली दिसून येते तो दोष दूर करण्यांत यावा. हल्ली ध्येयशून्य व निरुपयोगी शिक्षण घेऊन आजच्या तरुणांना बेकारी पदरांत बांधून घ्यावी लागते तशी केविलवाणी स्थिति अतःपर नसावी. इतकें सामान्यतः सांगून शिक्षणविषयक नियोजन पुरें करितों.

---

### प्रकरण नववें

# नियोजन—आर्थिक

**आर्थिक स्थितीचें महत्व.** हिंदी जनतेचें जीवन मुख्यत्वें आर्थिक परिस्थितीमुळे कसें असहाय व कष्टमय झालें आहे, ह्याचें विवेचन चवथ्या व पांचव्या प्रकरणांमध्ये स्पष्टपणें करण्यांत आलें आहे. जननमृत्यूचें, बालमृत्यूचें, स्त्रियांच्या मृत्यूचें प्रमाण, हीं मुख्यत्वें राहणीचा दर्जा खालावलेला असल्यामुळे इतक्या मोठया प्रमाणांत आपल्या देशामध्ये आढळून येत आहेत. हिंदी लोकांत सामाजिक व्यंगें आहेत. परंतु सर्व अनिष्ट परिस्थितीचें मूळ शोधूं जातां तें आर्थिक दैन्यावस्थेमध्ये आढळून येतें. इतकेंच नव्हे, तर आज संख्येची जी वाढ होत आहे, त्या वाढीला एकीकडून प्रतिरोध केला नाही आणि दुसरी-कडून आर्थिक नियोजन जर अमलांत आणलें नाही तर देशापुढे वाढत्या उपासमारीचा प्रश्न उभा राहणार आहे हें आपण सातव्या प्रकरणांत पाहिलें आहे.

**नियोजनाचा उपाय.** उपासमारीचें चित्र हें कुणालाही दुःसहच वाटणार. आणि आहे ही स्थिति सुधारण्याकरितां व ती अधिक वाईट न होऊं देण्याची खबरदारी घेण्याकरितां सर्वांगीण नियोजनाचा उपाय अवलंबावा हें कुणाही समंजस मनुष्याला पटल्या-शिवाय राहणार नाही. तरी आर्थिक नियोजन म्हणजे काय ह्याची स्थूलमानाने कल्पना करून घेऊं. आर्थिक नियोजनाचा उद्देश कांही विवक्षित कालामध्ये अखिल जनतेचा राहणीचा दर्जा सध्यापेक्षा सुधारला पाहिजे हा होय. हा राहणीचा दर्जा सुधारणें म्हणजे राष्ट्रीय उत्पन्न वाढणें होय. सर विश्वेश्वरय्या ह्यांच्या आर्थिक नियोजनाप्रमाणें

हिंदुस्थानाचें राष्ट्रीय उत्पन्न दहा वर्षांच्या कालांत आताच्या दुप्पट होणें शक्य आहे. म्हणजे दर माणशीं सरासरी उत्पन्नही दुपटीने वाढेल.

**संपत्तीचा प्रवाह थांबविणें.** राष्ट्रीय उत्पन्नाची वाढ होण्याकरितां प्रथम देशांतून जाणारा संपत्तीचा प्रवाह थांबविला पाहिजे. चवथ्या प्रकरणांत आपण पाहिलें आहे की फारच थोडया मोबदल्याप्रीत्यर्थ जनतेला दर वर्षी कोटयवधि रुपयांचा भुर्दंड भरावा लागत आहे. आणि त्यांत विशेष हें आहे की, ही संपत्ति धान्याच्या व कच्च्या मालाच्या रूपाने ह्या देशांतून जात आहे.

**सरकारचें आर्थिक धोरण.** तरी प्रथम हा प्रवाह शक्य तितका थांबवून आयात मालापेक्षा अधिक निर्गत माल आणि तोही कच्च्या जिनसांच्या रूपाने, देशांतून न जाईल अशी खबरदारी आर्थिक नियोजनांत घ्यावी लागेल. दुसरी गोष्ट म्हणजे जनतेकडून कराच्या रूपाने वसूल झालेल्या पैशाचा विनियोग शक्य तितक्या काटकसरीने व लोकोपयोगी खात्यांकडे अधिकाधिक होईल असें मध्यवर्ती सरकारचें धोरण झालें पाहिजे. उदाहरणार्थ, न्यूयॉर्क स्टेटमध्ये तिकडील सरकार आपल्या खर्चांतील एकतृतीयांश भाग एकटया शिक्षणाप्रीत्यर्थ खर्च करीत आहे. अशा तऱ्हेने सरकारच्या आर्थिक धोरणांत प्रथम बदल झाला पाहिजे. तसेंच सरकारी वरिष्ठ नोकरांचे पगार देशांतील सरासरी माणसाच्या उत्पन्नानुसार ठेऊन सध्या असलेला राज्यव्यवस्थेचा डोईजड खर्च कमी केला पाहिजे. कॉंग्रेस मंत्रिवर्गाने ५०० रुपयांवर पगार घ्यावयाचा नाही असें ठरवून प्रशंसनीय उदाहरण घालून दिलें आहे. लष्कराचें हिंदीकरण करूनही बरीचशी बचत होणार आहे.

**व्यवसायांची प्रमाणबद्ध वाढ.** दुसऱ्या बाजूने पाहतां उत्पन्नाची वाढ होण्याकरितां राष्ट्रीय उत्पादन वाढलें पाहिजे. व उत्पादन वाढण्याकरितां निरनिराळ्या व्यवसायांची वाढ झाली पाहिजे.

आ. नं. ५ व कोष्टक नं. १४ अगदी स्पष्टरीत्या दाखवून देतें की देशांतील तीन चतुर्थांश लोक निव्वळ शेतीवर अवलंबून आहेत आणि इतर व्यवसायांत फारच थोडे लोक गुतले आहेत. तरी ही व्यवसायाची समतोल विभागणी होईल तेव्हा देशाचें उत्पादन वाढेल आणि त्यावर उत्पन्नाची वाढ होणें अवलंबून राहील.

**उत्पन्नाची विभागणी.** फक्त राष्ट्रीय उत्पन्नाची वाढ झाल्यानेच अखिल जनतेच्या राहणीचा दर्जा सुधारेल असें म्हणतां येणार नाही. तर त्या उत्पन्नाची शक्य तों समविभागणी होणें अवश्य आहे. नाहीपेक्षा आज अमेरिका सर्व जगांत संपन्न राष्ट्र असूनही संपत्तीच्या विषम वाटणीमुळे एकीकडे क्रोडोपती तर दुसरीकडे बेकार अशीं दोन विरोधी टोकें दिसत आहेत. म्हणून इकडील आर्थिक नियोजन करतांना हीही खबरदारी अवश्य घ्यावयास पाहिजे. सारांश, राहणीचा दर्जा सुधारणें म्हणजे, देशांतील प्रत्येक व्यक्तीला पुरेसें व पोषक अन्न, स्वच्छ पाणी, भरपूर वस्त्र, निवाऱ्याची जागा, आवश्यक शिक्षण आणि काम करण्याची व योग्यता दाखविण्याची भरपूर संधि मिळेल, अशी व्यवस्था होणें, असा आम्ही अर्थ करितों.

**नियोजनाची व्याख्या.** आर्थिक नियोजन म्हणजे एवढें सामान्य विवेचन करून भागण्यासारखें नाही. नियोजन ह्या शब्दाचाच अर्थ असा आहे की ध्येयसिद्धीसाठी बुद्धयाच केलेला शिकस्तीचा प्रयत्न.* अर्थात वरील स्थिति प्राप्त होण्याकरितां अमूक एक काळाच्या —समजा, दहा वर्षांच्या—अवधींत जनतेने व सरकारने मिळून पार पाडावयाची अशी एक योजना आखणें अवश्य आहे आणि ती त्या

* "आर्थिक व्यवहाराचा कांही भाग आपणाकडे घेऊन एकंदर आर्थिक व्यवहाराचें किंवा त्यांतील प्रमुख अंगाचें स्वरूप व प्रमाण ठरविण्याचा जेथे प्रयत्न केला जातो तेथेच नियोजनास आरंभ होतो."

प्रो. ध. रा. गाडगीळ, लोकशिक्षण मासिक, मार्च १९३७.

कालाच्या अवधींत अमलांत आणण्याचा उभय पक्षांकडून आटोकाट प्रयत्न होणें जरूर आहे. तेव्हा कोठे वरील ध्येय व्यवहारांत उतरण्याच्या मार्गास लागेल.

**नियोजन अमलांत आणणारे देश.** नियोजनाची कल्पना ही हिंदुस्थानांतच नव्याने सुरू करावयाची आहे असें नाही. पूर्वी-ही देशाची स्थिति सुधारण्याकरितां सरकारकडून योजना आखण्यांत येत असत; पण त्यांतील व्यंगें उघडकीस येऊं नयेत म्हणून त्या योजना गुप्त राखण्यांत येत असत. परंतु उघड रीतीने आणि अखिल राष्ट्राकरितां आणि राजकीय, सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक अशा सर्व बाजूंनी नियोजन करण्याची योजना जर कोणत्या राष्ट्राने आखली असेल तर ती सोव्हिएट रशियाने आखलेली १९२८ ते १९३२ ची पंचवार्षिक योजना होय. ती योजना अपेक्षे-बाहेर सफल झाली आहे हें आज रशियाने सिद्ध करून दाखविलें आहे. पण पहिल्या पंचवार्षिक योजनेवरच न थांबतां त्यांनी दुसरी पंचवार्षिक योजना हातांत घेतली आहे व ती १९३७ सालअखेर पुरी होणार आहे. रशियाप्रमाणें सर्वांगीण जरी नाही तरी आर्थिक क्षेत्रापुरतें नियोजन इटली, तुर्कस्तान, चीन आणि जपानच्या वर्चस्वाखाली नुक-ताच आलेला मांचुकू प्रांत ह्या देशांत करण्यांत येत आहे. शेतीचें व उद्योगधंद्यांचें उत्पादन वाढावें म्हणून डेन्मार्कनेही नियोजन हातीं घेतलें आहे. तसेंच मेक्सिको, जर्मनी, स्वीडन, आयरिश फ्री स्टेट येथेही नियोजनाचा विचार चालू आहे. महायुद्धोत्तर आलेल्या आर्थिक मंदींतून बाहेर पडण्याकरितां अमेरिकन संयुक्त संस्थानें पण देशाच्या उत्पा-दनाचें नियोजन करीत आहेत. तसेंच आज प्रत्येक स्वतंत्र राष्ट्र आपल्या देशाच्या व्यापारी व औद्योगिक हितसंबंधांचें संरक्षण करण्याकरितां आर्थिक मडळें स्थापन करीत आहे. अशा रीतीने, एकेकाळीं सरकारने औद्योगिक चळवळीपासून अलिप्त राहणें श्रेयस्कर असें जें समजण्यांत

येत असे, तसें न होतां उत्तरोत्तर सरकारला देशाच्या उत्पादनांत व विभागणींत अधिकाधिक लक्ष घालणें भाग पडत आहे. हिंदुस्थान सरकारनेही नियोजनाचें तत्त्व मान्य केलें आहे. ह्या दृष्टीने ग्रामोद्धाराकरितां २॥ ते ३ कोटि रुपयांची तरतूद केली आहे. शेतीसुधारणा, पशुसुधारणा, खेडयांतील उद्योगधंदे वगैरे बाबतींत थोडें फार लक्ष घातलें आहे. १९२५–२६ सालीं सर आर्थर सॉल्टर यांना मध्यवर्ती सरकारने नियोजक तज्ज्ञ म्हणून नेमलें होतें. नुकतीच ह्या दृष्टीने मि. ग्रेगरी ह्यांची नेमणूक करण्यांत आली आहे. परकीय व मोठ्या पगारावर हे तज्ज्ञ नेमल्याबद्दल मध्यवर्ती कायदेमंडळाकडून सरकारचा निषेधही करण्यांत आला आहे! बरोबरच आहे. नुसत्या तज्ज्ञांच्या नेमणुकीने—आणि तेही परकीय—कार्य होणारें नाही. शिवाय ह्या थोडया फार उपायांत सर्वांगीण उन्नति होण्याकरितां विचारपूर्वक योजना नाही. जी थोडीशी प्रगती झाली आहे—दर्यामें खसखस—ती सुद्धा सारखी न होतां मधून जोरावते तर मधून थंडावते. नियोजनाचें कार्य सतत प्रगतिपर असलें पाहिजे.

**नियोजनाचे प्रकार.** नियोजन दोन प्रकारचें असूं शकतें. कांही विशिष्ट काळापुरतें व विशिष्ट परिस्थितींत केलेलें नियंत्रण हा पहिला प्रकार होय. युद्धकाळीं सरकारला उत्पादन व किमती ठरविण्याचा अधिकार ताब्यांत घेणें भाग पडतें. तसेंच मंदींतून बाहेर पडण्याकरितां अगर बेकारीचा प्रश्न सोडविण्याकरितां अमेरिका, इंग्लंड आदिकरून राष्ट्रांना नियोजन करावें लागलें. हुंडणावळ, चलनपद्धति व किंमती सरकारनियंत्रित ठेवून कांही उद्योगधंद्यांची वाढ करणें तर कोठे पैदास कमी करणें, मजुरांचें वेतन ठरविणें, बेकारीची व्यवस्था लावणें, इत्यादि प्रकारचें हें नियोजन असतें.

वरील नियोजनांत देशाला तात्कालिक अडचणींतून निभावून नेण्याचा उद्देश असतो. तर दुसऱ्या प्रकारच्या नियोजनामध्ये

राष्ट्राची सर्वांगीण उन्नति करून, राष्ट्राची संपत्ति वाढवून, तें स्वयंसिद्ध व संपन्न होईल असें करण्याचा प्रयत्न असतो. रशियाच्या दोनही पंचवार्षिक योजना अशाच प्रकारच्या होत.

**हिंदुस्थानाची विशिष्ट जरूरी.** हिंदुस्थानालाही सर्वांगीण नियोजनाची जरूरी आहे हें आम्ही वारंवार सांगितलेंच आहे. हिंदुस्थानची परिस्थिति विशिष्ट प्रकारची आहे. कारण, पहिल्या प्रकारचें नियोजन ज्या आर्थिक मंदीकरितां कांही राष्ट्रांना करावें लागलें, ती आर्थिक मंदी हिंदुस्थानाला अजूनही भोवत आहे. इतर राष्ट्रांनी अगोदरच पुढे गेलेल्या आर्थिक व्यवस्थेला नियोजनाने ताब्यांत आणून आर्थिक मंदींतून थोडी फार सुटका करून घेतली आहे. पण मागसलेल्या ह्या देशाची सुटका झाली नाही. तेव्हा मंदींतून तर बाहेर पडावयाचेंच आहे. पण शिवाय आपली आर्थिक व राजकीय पुनर्घटना करून ऱ्हास पावत असलेल्या किंवा अर्धमृत झालेल्या स्थितींतून ह्या देशाला आपली सोडवणूक करून घ्यावयाची आहे.

"कोणालाही स्वाभाविकच असा प्रश्न करावासा वाटेल की, आमच्या देशांत इतकीं अपरिमित उत्पत्तीचीं साधनें (बेकार मजूरवर्ग धरून) असतांना आमचा राहणीचा दर्जा आम्हांला वाजवी दर्जाइतपत कां आणतां येत नाही? उत्तर फार सोपें आहे. आम्ही जोंपर्यंत विचार करून ठरविलेली सामुदायिक योजना, ती सिद्धीस नेण्याच्या निश्चयाने पुरस्कारिली नाही, तोंपर्यंत आम्हांला आमचा दर्जा सुधारतां येणार नाही. नुसत्या सरकारने हें ठरवून चालणार नाही. त्याला लोकांचें पण मनःपूर्वक सहकार्य अवश्य आहे. मात्र सरकारने प्रारंभ करण्यांत पुढाकार घेतला पाहिजे."* आम्हीही

---

* *Indian Prosperity–A plea for Planning–* G. D. Birla.

हेंच म्हणतों की मध्यवर्ती सरकारकडून फारशी आशा नसली व प्रांतिक सरकारलाही अधिक सत्ता नसली तरी जनतेने आर्थिक नियोजनाचा विचार करून शक्य तितकें तें अमलांत आणण्यास सरकारला भाग पाडलें पाहिजे.

**मार्गांतील अडचणी.** कोणत्याही देशाला आर्थिक उन्नति करून घेण्याकरितां सर्वच साधनें अनुकूल असतात असें नाही. कोठे खनिज **संपत्ति** इत्यादि नैसर्गिक अनुकूलता असते तर तेथ मजुरांचा पुरवठा कमी पडतो. नव्या वसाहतींत गोऱ्या लोकांना प्रथम हीच पंचाईत पडली. कोठे दोनही पुरेशीं असून भांडवल कमी पडतें. तर कांही ठिकाणीं तज्ज्ञ माणसांची उणीव पडते. जपानला अशीच आवश्यकता भासली म्हणून त्यांनी परकीय तज्ज्ञ बोलाविले. पण त्यांना नोकरीवर ठेवतांना कबूल करून घेतलें की, जपानी उमेदवारांना तसेंच तज्ज्ञ बनवावें. जशी परकीयांची जरूरी संपते तसा त्यांना आपल्या गावीं जाण्याकरितां निरोप देण्यांत येतो! सारांश प्रत्येक राष्ट्रापुढे कांही ना कांही अडचणी ह्या असतातच. पण त्यांतून मार्ग काढणें केव्हाही शक्य असतें. तद्वतच हिंदुस्थानाचें आहे.

**हिंदुस्थानच्या अडचणी.** इकडील सर्वसामान्य स्थिति कशी आहे हें आपण मागे पाहिलेंच आहे. विविध व्यवसायांच्या अभावामुळे बहुसंख्य लोकांना शेती हेंच एकमेव उपजीविकेचें साधन झालें आहे. पण ती शेतीच अनुत्पादक स्थितींत आहे. शेतीचे अगदी लहान लहान तुकडे झाले आहेत. शेतकरी कर्जबाजारी आहेत. लोकांची उत्पादक शक्ति कमी झाली आहे. शिक्षणाचा प्रसार झालेला नसल्यामुळे लोक अज्ञानांत आहेत. इत्यादि. आमच्या समाजाचे दोष मागे दाखविलेच आहेत, त्यांमध्ये सर्वांत महत्त्वाचा दोष म्हणजे देश आपली आर्थिक उन्नति करून घेण्यास स्वतंत्र नाही आणि सत्ताधाऱ्यांच्या हितसंबंधांत व हिंदी हितसंबंधांत विरोध आहे. अशा

अनेक अडचणी देशाच्या उन्नतीच्या आड येण्यासारख्या आहेत. तरी पण त्यांतूनही आज ना उद्या मार्ग सापडेल अशी आशा आहे.

**अनुकूल गोष्टी.** त्याचबरोबर आर्थिक उन्नतीच्या दृष्टीने हिंदुस्थानास कांही अनुकूल गोष्टी आहेत. आर्थिक योजनेचा सिद्धान्त व व्यवहारीपणा कसास लावून पाहण्यास हा देश योग्य आहे. "त्याचप्रमाणें संतोषकारक योजना व स्वार्थत्यागी पुढारी मिळाल्यास आर्थिक योजना फलद्रूप होण्यास इतर कोणत्याही देशाइतकी अनुकूल परिस्थिति हिंदुस्थानांत पण आहे."*

**कच्चा माल.** हिंदुस्थानांत कच्च्या मालाचा पुरवठा पुष्कळ आहे. विशेषतः ज्यांना मूलभूत उद्योगधंदे (Key Industries) म्हणतात व ज्यांची संरक्षण देऊन जोपासना करण्याची आवश्यकता खुल्या व्यापाराचा पुरस्कार करणाऱ्या इंग्लंडसारख्या राष्ट्राला सुद्धा वाटली, अशा धंद्यांना आवश्यक लागणारा कच्चा माल हिंदुस्थानांत भरपूर आहे, असें इंडस्ट्रियल कमिशनने नमूद करून ठेविलें आहे. कोळसा, तेल, गंधक, शिसें, जस्त वगैरे खनिज पदार्थांचा पुरवठा सध्या असलेल्या माहितीवरून अपुरा असला तरी इतर सर्व खनिज संपत्तीचा हिंदुस्थानांत भरपूर पुरवठा आहे. विशेषतः चांगल्या जातीच्या लोखंडाचा हिंदुस्थानांत पाहिजे तेवढा साठा आहे. सध्याचें लोखंडाचें उत्पन्न वाढविलें तर हिंदुस्थानांत लागणारी सर्व यंत्रसामग्री येथेच तयार करावयास तें पुरेल, इतकेंच नव्हे, तर वाहतुकीला लागणारीं जवळ जवळ २०० जहाजें पण हिंदुस्थानांत तयार करूं म्हटलें तरी सुद्धा येथील साठा शेंकडो वर्षें कमी पडणार नाही. हिंदुस्थानचा कोळशाचा साठा पण नीट वापरला तर साधारणपणे १२० वर्षें पुरेल

---

* *Some Aspects of Economic Planning*–
S. Subbarao; Pages 179–182.

असें नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या कोळसा खाणी कमिटीच्या अहवालांत म्हटलें आहे. पण त्याच्याही पेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे उद्योगधंद्यांना लागणाऱ्या यांत्रिक शक्तीकरितां विजेचा हवा तेवढा पुरवठा होणें हिंदुस्थानांत शक्य आहे. जलशक्तीपासून वीज निर्माण करण्याच्या संबंधांत जी पाहणी झालेली आहे (हायड्रो इलेक्ट्रीक सर्व्हे) तिच्या निष्कर्षानुसार हिंदुस्थानांत साडेपांच कोटि किलोवॅटस् वीज उत्पन्न होऊं शकेल. यांपैकी हल्ली जवळ जवळ १ कोटि किलोवॅटस् उत्पन्न करण्यांत येते. म्हणजे सध्याच्या पांच पट जरी उद्योगधंदे वाढले तरी सुद्धा यांत्रिक शक्तीचा पुरवठा कमी पडणार नाही. डॅा. सोहनी म्हणतात, "कोळसा व वीज ह्यांच्या उत्पादक किमतींत हिंदुस्थानाला इतर कोणत्याही देशाशीं चढाओढ करणें शक्य आहे. हिंदुस्थानांत पैदास महागाईने होण्याचें कारण नाही."* त्याचप्रमाणें हिंदुस्थानच्या अफाट जंगलांत निरनिराळ्या जातीचीं झाडें आहेत. त्यांपासूनही वेगवेगळे उद्योगधंदे चालविणें शक्य आहे. शेतीसुधारणा करूनही कच्च्या मालाचें उत्पादन वाढवितां येईल.

**भांडवल.** पुष्कळ वेळां हिंदुस्थानच्या औद्योगिक उन्नतीस पुरेसें भांडवल नाही अशी सबब पुढे मांडण्यांत येते. सध्याच्या गुंतलेल्या भांडवलांत अजमासें ३०० कोटि रुपयांचें भांडवल हिंदी लोकांचें आहे (बाकीचें १४०० कोटि रुपयांचें भांडवल परकीय आहे). ह्यापैकी हल्ली चालू असलेल्या सुवर्णनिर्गतीमुळे ३०० कोटि रुपयांपेक्षा जास्त भांडवल लोकांच्या हातांत नगद खेळत आहे. लोकांचा औद्योगिक प्रयत्नांवर विश्वास नसल्यामुळे ते त्यांत पैसा गुंतविण्यास नाखूष असतात ही गोष्ट खरी, पण आर्थिक नियोजनाकरितां सरकारनेच कर्ज कादावयाच म्हटलें तर सरकारला स्वस्त व्याजाने सहज पैसा मिळू शकेल. मद्रास व संयुक्त प्रांतांत काढलेल्या प्रांतीय कर्जाला

*_Indian Industrial Problem_–Sohoni, Page 152

किती चटदिशीं पैसा मिळाला हें पाहिलें म्हणजे वरील विधानाची सत्यता कळून येते. तसेंच लोकजागृति होऊन लोकांना आपले पैसे सोन्यांत अडकविण्यापेक्षा उद्योगधंद्यांत गुंतविण्याची उपयुक्तता कळून आली म्हणजे पाहिजे तेवढें भांडवल उद्योगधंद्यांना मिळूं शकेल. सर विश्वेश्वरय्या ह्यांच्या हिशेबाप्रमाणें दहा वर्षांची योजना पार पाडण्यास दरवर्षीं १० कोटि रु. प्रमाणें भांडवल लागेल. तेवढें भांडवल देशांतल्या देशांत मिळण्याचा संभव आहे.

पण इतकेंही करून आवश्यक भांडवल लोकांकडून पुढे करण्यांत न आलें तर परदेशी बाजारांत आर्थिक योजनेकरतां कर्ज काढावयास हरकत नाही. सध्या हिंदुस्थानाची पत परदेशी बाजारांत चांगली आहे, तेव्हा कर्ज स्वस्त दराने मिळूं शकेल. मात्र परकीयांचा हात त्या कर्जाबरोबर आंत शिरणार नाही अशी बरीक काळजी घ्यावयास पाहिजे. तथापि असें कर्ज काढून आम्ही पुढील पिढीवर नाहक कर्जाचा बोजा टाकतों असा आक्षेप येण्याचा संभव आहे ! ह्या आक्षेपास उत्तर हेंच की राष्ट्रीय उत्पन्नाची वाढ झाली म्हणजे आपोआपच सरकारचें उत्पन्न वाढेल व कर्जाचा बोजा हळू हळू फेडणें शक्य होईल. तसेंच परदेशी मालाच्या किंमतीच्या रूपाने किंवा परदेशी नफ्याच्या रूपाने जाणारा संपत्तीचा प्रवाह थांबेल. शिवाय प्रत्येक व्यक्तीच्या जीवनांत सुखसोयींची भर पडेल ती निराळीच.

**संख्याबल.** उत्पादनास आवश्यक अशी तिसरी गोष्ट म्हणजे संख्याबल. तें तर हिंदुस्थानांत पुरून उरेलसें आहे. शेतीकडे जी फार मोठी लोकसंख्या गुंतलेली आहे त्यांतील एकतृतीयांश लोक उद्योगधंद्यांमध्ये गुंतवितां येतील. हल्ली आमचा मजूरवर्ग उत्पादनकुशल नाही ही गोष्ट खरी. पण मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें आरोग्यविषयक व शैक्षणिक उपाययोजनेने व आधुनिक यंत्रसामग्रीच्या पुरवठ्याने त्यांची उत्पादक शक्ति पुष्कळच सुधारेल. तसेंच

हेंही लक्षांत घेतलें पाहिजे की आमची राहणीची साधी पद्धत व हवामानामुळे युरोपियन मजुरांच्या मानाने कमी गरजा यांमुळे इकडील मजूरवर्ग स्वस्त पडतो. इकडील मजूरवर्गाची उत्पादन-शक्ति वाढविल्यानंतर मजुरी वाढवून सुद्धा हिंदुस्थानाला इतर देशांशीं मजुरीच्या बाबतींत टक्कर देण्यास हरकत नाही.

**बाजारपेठ.** उद्योगधंद्यांच्या वाढीमुळे तयार झालेला माल खपविण्याकरितांही दुसऱ्यावर अवलंबून राहण्याची आम्हांस जरूरी नाही. कच्च्या मालाकरितां इंग्लंड, जपान इत्यादि राष्ट्रांप्रमाणें आम्हांस जसें इतरांवर अवलंबून राहावयास नको, त्याप्रमाणें तयार झालेला माल खपविण्यास पण इतर बाजारपेठांची तितकी अवश्यकता वाटणार नाही. हिंदुस्थानाइतका अफाट देश आणि त्यांतील असंख्य जनता लक्षांत घेतां व लोकांची क्रयशक्ति वाढली असतां हिंदुस्थानच मोठी बाजारपेठ होईल. शेट बिर्ला यांच्या मतें दरमाणशीं ९९ वार कापडाचा खप अवश्य व्हावयास पाहिजे. सध्या दर माणशीं १९ वार कापड पडतें. म्हणजे खप होण्यास किती सवड आहे हें दिसून येतें. तसेंच हिंदुस्थानांत साखरेचा खप दरमाणशीं १६ पौंड आहे तर इतर देशांत तो ६० ते १२० पौंड आहे.

**बौद्धिक मदत.** संचालकांच्या दृष्टीने सुद्धा हिंदुस्थानांत बौद्धिक कमतरता आहे असें नाही. बरोबर पाहिजे त्या तऱ्हेचें शिक्षण व अनुभव यांची मात्र थोडी उणीव आहे. म्हणून रशिया, जपान या देशांप्रमाणें परकीय तज्ज्ञ बोलावून घेतले व त्यांच्या हाता-खाली हिंदी उमेदवार तयार केले की अडचण दूर होईल.

**आर्थिक पाहणी.** अशा तऱ्हेने हिंदुस्थानच्या अडचणी व सहायक गोष्टी कोणत्या आहेत ह्याचा सामान्यतः विचार येथे केला. तथापि आर्थिक नियोजन हातीं घेण्यापूर्वी बोले रॉबर्टसन् कमिटीने म्हटल्याप्रमाणें हिंदुस्थानची आर्थिक पाहणी करून आकडेवार व

शक्य तों बिनचूक माहिती मिळविली पाहिजे. देशाच्या गर्भित संपत्तीची, जमिनीची, वीज उत्पन्न करण्याच्या शक्यतेची, देशांतील भांडवलाची—पैशाच्या रूपाने, सोन्याचांदीच्या रूपाने, यंत्रसामग्री व जनावरें इत्यादि सर्व रूपांनी असलेल्या भांडवलाची—मजूरवर्गाची, हल्लीच्या उत्पादनाची (Census of production) आणि इतर सर्व आवश्यक गोष्टींची सशास्त्र माहिती मिळवून कोणत्या बाजू अनुकूल व कोणत्या प्रतिकूल आहेत हें पाहण्याकरितां तज्ज्ञ लोकांच्या मंडळास ती सादर केली पाहिजे.

**नियोजक मंडळ.** नंतर ह्या माहितीचा उपयोग करून घेऊन प्रत्यक्ष योजना आखण्याकरितां देशांतील अर्थशास्त्रज्ञ व शेती, उद्योगधंदे, व्यापार, वाहतूक, बँका आदिकरून सर्व आर्थिक व्यवसायांचे तज्ज्ञ यांच्या मंडळाने देशाची उत्पादक शक्ति अमुक कालांत अशा प्रकारें वाढवावयाची अशी व्यवहारिक योजना प्रांतिक सरकारांच्या सल्ल्याने आखून जनता व सरकार ह्यांपुढे मांडावी. नंतर दोहोंच्या अनुमतीने सरकारने ती अमलांत आणण्याकरितां एक नियोजक खातें निर्माण करून ती योजना पार पाडण्याचा प्रयत्न करावा. हया खात्याला सल्लागार म्हणून वरील नियोजक मंडळाची एक स्थायी समिति असावी. कांही शास्त्रीय सल्ला लागेल तो हया कमिटीने द्यावा व एकंदरीने नियोजन कसें काय होत आहे ह्याची पाहणी करण्याचेंही काम स्थायी समितीकडे असावें. नियोजक खात्याने प्रांतवार विभागणी करून त्या त्या प्रांताकडे आपआपलें काम वाटून द्यावें. नंतर प्रांतांनी जिल्ह्यांकडे त्यांचा भाग वाटून द्यावा. अशा तऱ्हेने अखिल देशभर ह्या नियोजनाचें लोण पोचवावें. ठराविक मुदतींत ठराविक प्रगति होत नसेल तर त्याचा विचार नियोजक मंडळाने सहा सहा महिन्यांनी एकत्र येऊन केला पाहिजे.

**सरकार व जनता यांचें सहकार्य.** त्यांत विशेष हें लक्षांत ठेवावयास पाहिजे की, नियोजनाच्या कामांत देशांतील आबालवृद्धांसहित सर्व वर्ग विश्वासांत घ्यावयास पाहिजेत. आणि जनतेंत व्याख्यानें, वृत्तपत्रें आदिकरून साधनांनी जागृति करून जनता योजनेस हातभार लावण्यास अहमहमिकेने पुढे येईल व योजना यशस्वी करून दाखवील असें केलें पाहिजे. या जनतेच्या उत्साहाचा फायदा आर्थिक खात्याने शक्य तोंवर घेतला पाहिजे.

**नियोजनाच्या बाजू.** नियोजन करतांना दोन बाजूंनी नियोजन करावें लागेल. एक संरक्षक व दुसरें सहायक. मागील प्रकरणांत सांगितलेल्या सर्व सुधारणा पहिल्या सदरांत येतात. त्याकरितां कांही कांही बुडीत खर्च सोसून सुद्धा लोकांना संरक्षक मदत देणें अवश्य आहे. तसेंच आर्थिक नियोजनांतील कांही भागाकरितांही बुडीत खर्च सोसावा लागेल. उदाहरणार्थ, संयुक्त प्रांतासारख्या व बिहार प्रांतासारख्या ठिकाणीं पुराने होणारें नुकसान थांबविण्याकरितां आवश्यक उपाय किंवा महाराष्ट्र, गुजराथ यांसारख्या प्रांतांत दुष्काळनिवारणार्थ योजावयास लागणारे उपाय. अशांसाठी होणारा खर्च अनुत्पादक दिसत असला तरी आरोग्यविषयक सुधारणा काय किंवा ह्या सुधारणा काय, कालांतराने उत्पादनास साहाय्यच करतात.

सहायक प्रकारामध्ये देश स्वयंसिद्ध करावयाचा हें जरी धोरण असलें तरी जे धंदे देशाच्या भरभराटीला व वाढीला आवश्यक आहेत अशाच धंद्यांना संरक्षण देऊन अगर प्रत्यक्ष मदत करून साहाय्य केलें पाहिजे. आणि त्याकरितां हल्लीच्या संरक्षक पद्धतीचाही फेरविचार झाला पाहिजे. मात्र संरक्षक जकात पद्धतीचा फायदा परदेशी कंपन्या व व्यापारी ह्यांना घेतां येणार नाही अशी खबरदारी घेतली पाहिजे.

**नियोजनाचीं अंगें.** आर्थिक नियोजनामध्ये पुढील अंगांचा समावेश होईल. (१) शेतकी आणि तदनुषंगिक धंदे; (२) उद्योग-धंदे–लहान व मोठे; (३) वाहतुकीचीं साधनें, कालवे वगैरे लोकोपयोगी कामें, वीज वगैरे शक्ति पुरविणारीं साधनें; (४) व्यापार; (५) पैसा, चलनपद्धति, बँका वगैरे; (६) बेकारी; (७) ग्राम व शहर पुनर्रचना;–यांची अशा ह्या सर्व बाजूंनी नियोजन हातीं घेतलें जाईल तेव्हाच राष्ट्रीय उत्पादन वाढेल.

**शेतकरी.** हिंदुस्थानांत आर्थिक क्षेत्रामध्ये शेतीला प्राधान्य आहे ही गोष्ट केव्हाही खरी आहे. शेतीचा प्रश्न विचारांत घेतांना जपानी प्रधानाने म्हटल्याप्रमाणें शेती कशी सुधारेल व त्यांतील उत्पन्न कसें वाढेल ह्या प्रश्नापेक्षा सुद्धा शेतकऱ्यांचा विचार जास्त झाला पाहिजे. प्रो. बानर्जींनी म्हटलें आहे कीं, शेतकऱ्यांचें जीवन चार गोष्टींनी सुधारेल. "शिक्षण, सहकार, शेतीच्या तुकड्यांचें एकीकरण व संततिनियमन !!"* शेतकऱ्यांचें जीवन निरोगी, निश्चित आणि विचारप्रधान व प्रगमनशील होईल व तसेंच त्यांचें उत्पन्न वाढेल, असें ध्येय शेतीविषयक नियोजनांत असावें.

शेती. हल्ली असलेल्या अनुत्पादक स्थितींतून उत्पादक स्थितीस आणण्यास प्रथम सहकारी तत्त्वावर जमिनीच्या तुकड्यांचें एकीकरण झालें पाहिजे. तसेंच अमुक एका मर्यादेपलीकडे शेताची विभागणी होतां कामा नये असा कायदा केला पाहिजे. दुसरें, शेतकऱ्याला कर्जमुक्त करण्याकरितां शक्य ते उपाय अमलांत आणले पाहिजेत. हल्ली असलेल्या कर्जाचा विचार ग्रामपंचायती अगर लवादकोर्टे उघडून झाला पाहिजे व त्याच्या जोडीला सहकारी पतपेढ्या व लॅन्डमॉर्टगेज् बँक्स, रिझर्व्ह बँकेच्या मदतीने उघडून

* *Economic Conference, 1934.*

शेतकऱ्यांना शक्य तितकें लवकर कर्जमुक्त केलें पाहिजे. तसेंच सहकारी तत्त्वावर बीं, बियाणें, आधुनिक यंत्रसामग्री व साधनें शेतकऱ्यांना सुलभ रीत्या उपलब्ध होतील अशी व्यवस्था झाली पाहिजे. मुंबईच्या प्रांतिक सरकारने यंदा गुरचराईची सूट दिली आहे, त्याप्रमाणें जंगल खात्यांतील नियमांचा कडकपणा कमी करणें इत्यादि उपाय अवलंबावे लागतील. शेतकऱ्यांचें उत्पन्न वाढण्याकरितां व त्यांच्या वेळेचा सदुपयोग होण्याकरितां त्यांना दुय्यम धंद्यांची जोड दिली पाहिजे. ग्रामोद्योगाची चळवळ महात्मा गांधी व सरकार ह्या उभयतांनी निरनिराळ्या प्रकारें हातीं घेऊन तिला मूर्त स्वरूप देण्याचा प्रयत्न चालविला आहे. परंतु त्यामध्ये एकसूत्रीपणा व अद्ययावत्पणा आला पाहिजे. जनावरांच्या जोपासनेकडे व दूधदुभत्याकडेही लक्ष जावयास पाहिजे. किंबहुना दूधदुभत्याचा एक निराळाच धंदा होऊं शकेल. बेल्जियन शेतकरी ह्या दूधदुभत्याच्या दुय्यम धंद्याने आपलें उत्पन्न वाढवितो, तर जपानी शेतकरी रेशीम तयार करण्याचा जोड धंदा करितो. तद्वतच हिंदी शेतकऱ्याला आपल्या परिस्थितीनुसार कोणता तरी जोड धंदा करणें शक्य होईल. पण शेतकऱ्यांच्या मालाची विक्री हल्ली ज्याप्रमाणें अडत्यांच्या मार्फत होते व त्यामध्ये शेतकऱ्यांचें नुकसान व अडत्यांचा फायदा असतो, तसें न होऊं देण्याकरितां मालाचाही उठाव त्यांच्या सहकारी संस्थांमार्फत झाला पाहिजे. हल्लीच्या शेतकऱ्यांना सहकारी तत्त्वाची ओळख पटण्याकरितां व त्यांनी तें अंमलांत आणण्याकरितां त्यांना ह्या बाबतींत सल्ला व मदत देणें अवश्य आहे.

संशोधन. आणखी एक गोष्ट शेतीसुधारणेबाबत विचारांत घण्यासारखी आहे. एका बाजूस शेतकी खातें, त्याचें संशोधन व दुसऱ्या बाजूस शेतकरी, म्हणजेच बुद्धि व प्रत्यक्ष कार्य, ह्यांची हल्ली जी फारकत दिसून येते तशी वस्तुस्थिति अतःपर राहूं नये.

शेतीमध्ये सुधारणा होण्यास संशोधनाची अतिशय आवश्यकता आहे. आणि संशोधन जर शेतकऱ्यांना व्यवहारोपयोगी नसेल तर मग त्याचा उपयोग तरी काय ? म्हणून व्यवहार व ज्ञान यांची शक्य तितकी सांगड घालण्यांत यावी.

**उद्योगधंदे.** शेतीच्या सुधारणेनंतर नियोजनांतील दुसरी बाब म्हणजे उद्योगधंद्यांची होय. हल्लीचें युग हें यांत्रिक युग आहे. आणि प्रत्येक राष्ट्र स्वयंसिद्ध होण्याचा प्रयत्न करीत आहे. तुर्कस्थानासारख्या राष्ट्रालाही अद्ययावत् व्हावेंसें वाटत आहे, मग हिंदुस्थानालाच जगाच्या ओघाप्रमाणें न जाऊन कसें चालेल ! त्यालाही शास्त्रीय ज्ञानाचा उपयोग करून व आधुनिक तऱ्हेची यंत्रसामग्री वापरून स्वतःला स्वयंसिद्ध झालें पाहिजे, तरच त्याचा निभाव जगाच्या चढाओढींत लागेल. १९३१-३२ सालीं हिंदुस्थानांत १४२ कोटि रुपयांचा माल बाहेरून आला. ह्यापैकी शेकडा ८० टक्के माल येथेच तयार करण्यासारखा आहे, असें सर विश्वेश्वरय्यांचें म्हणणें आहे. अर्थात इतका माल तयार करावयाचा म्हणजे त्याकरितां मोठ्या प्रमाणावर उद्योगधंदे सुरू केले पाहिजेत.

**मोठे उद्योगधंदे.** हिंदुस्थानाला मोठ्या व छोट्या अशा दोन्ही प्रकारच्या उद्योगधंद्यांची आवश्यकता आहे. मोठ्या प्रमाणावर उद्योगधंदे सुरू केल्याने कांही फायदे होतात व कांही तोटे होतात. खनिज संपत्तीचें उत्पादन, यंत्रसामग्री तयार करणें, यांत्रिक शक्तीची निपज करणें वगैरे जे धंदे आहेत ते मोठ्या प्रमाणावर सुरू केले तरच फायदेशीर होतात. कोणत्याही नैसर्गिक अनुकूलतेचा फायदा घेणें व त्याकरितां प्रथम फार मोठ्या प्रमाणांत भांडवल घालणें वगैरे गोष्टी मोठ्या प्रमाणावर काम सुरू केल्याशिवाय शक्य होत नाहीत. त्याबरोबरच कांही तोटेही निष्पन्न होतात. औद्योगिक सुधारणेमुळेच भांडवलवाला वर्ग व मजूरवर्ग असे समाजाचे दोन परस्पर विरोधी गट पडले

आणि पहिला वर्ग दुसऱ्या वर्गाच्या श्रमाचा फायदा घेऊन गबर होऊं लागला. औद्योगिक क्रांतीच्या सुरवातीला अशा तऱ्हेचे गट पडणें हें स्वाभाविक होतें. पण एक दीड शतकाच्या अवधीनंतरही असे समाजाचे दोन परस्पर विरोधी गट होणें अयोग्य होय. ह्यावर तोड म्हणजे मजुरांच्या हिताचे कायदे करणें, राष्ट्राचें उत्पादन नफ्याच्या तत्त्वावर न करतां उपयोगाच्या तत्त्वावर करणें व संपत्तीची विभागणी शक्य तों सम करणें, तसेंच विवक्षित मर्यादेपलीकडे खासगी मालमत्ता नष्ट करणें, ही होय. हाच समाजसत्तावाद !

**खबरदारी.** हिंदी जनतेला समाजसत्तावाद मान्य आहे की नाही हें जनतेने ठरवावयाचें आहे. तो योग्य असला तरी किनपत शक्य आहे ही दुसरी गोष्ट आहे. पण हिंदुस्थानाला मोठ्या प्रमाणावर औद्योगीकरणास सुरुवात करावयाची आहे आणि ती करतांना निदान खालील प्रकारची खबरदारी घेतली पाहिजे. इकडे थोडेबहुत उद्योगधंदे हल्ली मोठ्या प्रमाणावर चालू आहेत हें पांचव्या प्रकरणांत पाहिलें आहे. पण सध्याचे उद्योगधंदे पद्धतशीर नाहीत; यंत्रसामग्री जुनी आहे. म्यॅनेजिंग एजन्सी पद्धतीमुळे कांही धंद्यांचें नेतृत्व दुय्यम दर्जाच्या लोकांच्या हातांत गेलें आहे. शिवाय १९३१ सालीं शेंकडा ९·७ इतकेच लोक उद्योगधंद्यांत गुंतले होते. त्यांचें प्रमाण आपणास वाढवावयाचें आहे. तसें करतांना पाश्चात्त्य राष्ट्रांत जें वर्गीकरण झालें आणि ज्याच्यामुळे आज तिकडील बहुजनसमाज असंतुष्ट झालेला दिसत आहे तो सर्व प्रकार येथे उद्भूत होणार नाही अशी काळजी घेतली पाहिजे. ती काळजी घेणें म्हणजे जे मोठ्या प्रमाणावर व मूलभूत उद्योगधंदे आहेत ते सरकारने आपल्या हातीं घेणें होय. त्याचबरोबर सरकारही अधिकाधिक लोकसत्तात्मक व लोकांना जबाबदार असें झालें पाहिजे. संपत्तीची विषम वाटणी न होऊं देण्याकरितां प्रत्यक्ष करांचें प्रमाण वाढविणे हाही मार्ग अवलंबावा लागेल.

**छोटे धंदे.** मोठया उद्योगधंद्यांच्या जोडीला छोटे उद्योगधंदेही हिंदुस्थानांत अधिक प्रमाणांत सुरू व्हावयास पाहिजेत. हल्ली जे धंदे चालू आहेत त्यांना योग्य ती मदत द्यावी व नवे धंदे किफायतशीर रीतीने कोणते सुरू करतां येतील हें नियोजक मंडळाने मोठमोठया औद्योगिक पुढाऱ्यांच्या व अर्थशास्त्रज्ञांच्या सल्ल्याने ठरवावें. जेथें संरक्षण अवश्य आहे तेथे तें देण्यांत यावें.

**दुय्यम धंदे.** तिसऱ्या प्रकारचे धंदे म्हणजे दुय्यम धंदे (Cottage Industries) होत. ह्या धंद्यांच्या उत्कर्षासाठी मध्यवर्ती व प्रांतिक सरकारें तसेंच कॉंग्रेसही सक्रिय सहानुभूति दाखवून प्रयत्न करीत आहे, असें वर म्हटलेंच आहे. पण ह्या धंद्यांमध्ये देशांतील बहुसख्य स्त्रियांनाही काम मिळेल अशी काळजी घ्यावी, म्हणजे त्यांच्या श्रमाचीही देशाच्या उत्पादनास मदत होईल; व त्यांनाही गृहव्यवसाय सांभाळून आर्थिक स्वावलंबन मिळवितां येईल.

येथे उद्योगधंद्यांची यादी न देण्याचें कारण इतकेंच की, केवळ यादी देण्याने फारसा फायदा होण्यासारखा नाही व कोणते धंदे कोणत्या प्रमाणावर सुरू केले असतां योग्य होतील, तसेंच कोणत्या प्रांतांत कोणत्या धंद्यांना नैसर्गिक अनुकूलता आहे वगैरे गोष्टी ठरविण्यास शास्त्रीय माहिती उपलब्ध नाही. म्हणूनच आधी आर्थिक पाहणी करून नंतर नियोजन आखलें पाहिजे असें आम्ही म्हणतों.

**वाहतुकीचीं साधनें.** उद्योगधंद्यांच्या जोडीला वाहतुकीच्या साधनांचाही विचार नियोजक मंडळाला करावा लागेल. गावागावांतील रस्तेदुरुस्ती करणें, आगगाडयांची वाहतूक वाढविणें, जहाजाने तसेंच वैमानिक मार्गाने देशांतील दळणवळण सुलभ करणें वगैरे गोष्टींकडे लक्ष द्यावें लागेल. तसेंच बंदरें बांधणें, कालवे काढणें व लोकांना पाण्याची तरतूद करणें, शक्य तेथे विजेचा पुरवठा करणें,

रेडिओसारखीं साधनें लोकांना उपलब्ध होतील अशी व्यवस्था करणें, वगैरे लोकोपयोगी कामें हीं या सदराखाली घ्यावीं. अमेरिकेंत निरनिराळ्या संस्थानांमध्ये विजेच्या पुरवठ्यावर ताबा ठेवण्याकरितां एक सेंट्रल पॉवर कमिशन आहे. तसेंच इकडील सरकारलाही एक मध्यवर्ती मंडळ ठेवावें लागेल. हल्ली देशांत जे वीज पुरवण्याचे प्रयत्न चालले आहेत त्यांत एकसूत्रीपणा आणण्याचें काम नियोजक मंडळाकडे राहील. कालवे, रस्ते वगैरे सार्वजनिक हिताचीं कामें हातीं घेण्यांत लोकांची सोयही होईल व बेकारांना पण काम मिळेल. नुकतेंच प्रेसिडेंट रूझव्हेल्टने अमेरिकन सरकार घरें बांधण्याची योजना हातीं घेणार आहे असें जाहीर केलें आहे.

**व्यापार.** हिंदुस्थानांत जो माल तयार होणें अगदी अशक्य किंवा जो इकडे निपजत नाही तेवढाच आयात करण्याचें धोरण व्यापारामध्ये असावें. तयार झालेल्या एतद्देशीय मालाची उठावणी व वाहतूक, रेल्वे आदि वाहतुकीच्या साधनांकडून सवलतीच्या दराने करण्यांत यावी व तशाच प्रकारच्या परकीय आयात मालाला ही सवलत मिळूं नये. तसेंच व्यापार हिंदी लोकांच्या हातांत यावा. ह्याकरितां हिंदुस्थानच्या किनाऱ्यालगतचा व्यापार हिंदी आगबोटींतून करण्याबद्दलचा हक्क आम्हांस मिळावा. हल्लीच्या सुधारणा कायद्यानुसार असा हक्क राखून ठेवितां येत नाही, हें ह्या दिलेल्या सुधारणांचा अपुरेपणा सिद्ध करण्यास पुरें आहे ! हिंदुस्थानचें ह्यापुढील धोरण स्वयंसिद्ध होण्याचें असलें तरी परदेशाशीं व्यापार हा राहणें देशास हितावह आहे. पण ह्या बाबतींत परदेशांची मागणी लक्षांत येण्याकरितां परदेशांमध्ये हिंदी कमिशनर नेमावेत म्हणजे व्यापाराचें धोरण आखणें सुलभ होईल. हिंदुस्थानच्या हिताचे आंतर्देशीय करारही वरचेवर करण्यांत यावे. नाही पक्षीं ओटावा करारासारखे हिंदुस्थानाला नुकसानकारक व ग्लंडला हित-

कारक असे करार देशांतील विचारी लोकांच्या मताविरुद्ध हिंदुस्थानावर लादले जात राहतील !

**चलनाविषयीं.** व्यापारानंतर बँका आदिकरून पैशाच्या नियोजनाचा प्रश्न येतो. येथेच हल्लीचें सरकारी धोरण व हिंदी हितसंबंध ह्यांमध्ये जोराचा विरोध आहे. मध्यवर्ती सरकारच्या ८० टक्के जमाखर्चावर कायदेमंडळाला मत देण्याचा अधिकार नाही. रिझर्व्ह बँकेसारख्या मध्यवर्ती बँकेवर पण लोकनियुक्त कायदे मंडळाचा ताबा नाही. अर्थशास्त्रज्ञ व मोठमोठे व्यापारी नको नको म्हणत असतांनाही रुपयाचा संबंध इंग्लिश पौंडाबरोबर ठेवण्यांत आला आहे. आणि पौंडाचा संबंध सुवर्णाबरोबर तोडून टाकलेला आहे. तीच गोष्ट हुंडणावळीचा दर ठरविण्याविषयीं. सर पुरुषोत्तमदास या हिंदी गृहस्थांनी बँकिंग कमिशनमध्ये आपलें मत हुंडणावळीचा दर रुपयास १ शिलिंग ४ पेन्स असावा असें म्हटलें असतांनाही इतरांच्या मतानुसार सरकारने तो १ शिलिंग ६ पेन्स ठरविला; त्यामुळे शेतकऱ्यांचें अपरिमित नुकसान झालें आहे. तरी चलन पद्धतीवर व रिझर्व्ह बँकेवर हिंदी कायदेमंडळाचा ताबा असावा.

नंतर लोकांच्याकडून नियोजनास पैशाची मदत होण्याकरितां हिंदी औद्योगिक बँका, सहकारी बँका, वगैरे बँकांचें जाळें देशभर पसरलें पाहिजे म्हणजे लोकांकडील पैसा लोकांच्याच हिताकडे लावतां येईल.

**बेकारी.** वर सांगितलेल्या प्रकारचें नियोजन झालें असतां देशांतील बेकारीचा प्रश्न सुटण्याच्या मार्गास लागेल. तथापि तेवढ्यावरच विसंबून न राहतां नियोजक मंडळास हाही प्रश्न हातीं घ्यावा लागेल. बेकारांची संख्या हल्ली ४ ते ५ कोटि असावी व त्यांत १९ लक्ष सुशिक्षित बेकार असावेत असा अंदाज आहे. तरी ह्या सर्व लोकांची सविस्तर माहिती गोळा करून त्यांना व्यवसाय कोणकोणते उपलब्ध

आहेत व होतील ह्याची माहिती देण्यांत यावी. बेकारांचा प्रश्न सोडविणें हें एक नियोजक मंडळाचें महत्त्वाचें काम राहील.

अमेरिकन संयुक्त संस्थानांमध्ये बेकारीचा प्रश्न सोडविण्याकरितां १९३३–३४ मध्ये ३·३ पद्म डॉलर खर्च केले. १९३४–३५ मध्ये ५·३ पद्म व १९३५–३६ मध्ये ४·४ पद्म लोकोपयोगी कामांकरितां खर्च केले. हिटलरने पण १९३४ मध्ये १०५ कोटि मार्क रस्ते बांधण्याकडे व १६७ कोटि इतर लोकोपयोगी कामांकरितां खर्च केले. पूर्ण आर्थिक स्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्या इंग्लंडनेही बेकारीनिवारणार्थ व शेतीला मदत, घरें बांधणें वगैरेकरितां ७·८ कोटि पौंड खर्च केले. अर्जेंटाइन, ऑस्ट्रेलिया, जपान, न्यूझीलंड, वगैरे देशांत मोठमोठया रकमा खर्च करण्यांत आल्या. हिंदुस्थान सरकारने मात्र १९२८–२९ मध्ये ४८ कोटि रु. लोकोपयोगी कामांकरितां खर्च केले होते, ते १९३२–३३ मध्ये १२ कोटि रु. वर आणले.* तरी सरकारच्या ह्या धोरणांत मूलतः बदल झाला पाहिजे.

**शहरें व ग्रामें ह्यांची पुनर्रचना.** शहरें व गावें ह्यांची पुनर्रचना हेंही एक अंग नियोजकमंडळाकडे राहील. हें काम शहरांतील म्युनिसिपालिटया व गावांमध्ये ग्रामपंचायती यांच्या मदतीने करण्यांत यावें. मागील प्रकरणांत सांगितलेल्या आरोग्यविषयक व शिक्षणविषयक गोष्टींचा अंतर्भाव ह्यामध्ये होईलच. त्यांतल्यात्यांत शहरांमध्ये मजुरांच्या सुस्थितीकडे लक्ष देणें, त्यांच्यासाठी चाळी बांधणें, खेडयांमध्ये आरोग्यदायक घरें बांधणें, खेळावयास व व्यायामास मोकळी जागा ठेवणें आणि इतर करमणुकीचीं साधनें सुलभ करून देणें वगैरे गोष्टी ह्या सदरांत येतील.

---

* ही माहिती एकॉनॉमिक जर्नल १९३६ मधील प्रो. टॉमस यांच्या लेखांतून घेतली आहे.

वर उल्लेखिलेल्या व अशाच इतर बाबतींचा विचार करून अखिल भारतीय योजना आखण्याचें काम नियोजक मंडळाकडे राहील. त्यांतील प्रांताप्रांताचा भाग प्रांतिक सरकारकडे सोपविण्यांत येऊन तो पार पाडण्याची जबाबदारी प्रांतिक सरकारांवर सोपविण्यांत यावी. सदरहू योजनेमध्ये संस्थानांचाही समावेश करण्यांत यावा. म्हणजे अखिल देशाच्या सर्वांगीण उन्नतीचें नियोजन केल्याचें श्रेय मिळेल.

**समालोचन.** प्रस्तुत प्रकरणांत आर्थिक नियोजनाचा विचार सामान्य स्वरूपांत केला आहे. ह्यापेक्षा विस्तृत विवेचन करणें प्रस्तुत पुस्तकाच्या कक्षेबाहेर होईल असें आम्हांस वाटतें. नियोजनाचे सामाजिक व आर्थिक असे दोन विभाग करण्याचा हेतु ते परस्परविरोधी आहेत अगर एकमेकांपासून अलग आहेत असें दाखविण्याचा नाही. सध्याच्या राजकीय परिस्थितींत सामाजिक नियोजन व्यक्तिशः संघटनाने, लोकांना आणि सरकारासही, घडवून आणणें शक्य आहे. आर्थिक नियोजन मात्र सध्याच्या राजकीय परिस्थितींत सर्वस्वी शक्य आहे असें वाटत नाही. कारण त्यामध्ये अनेक गुंतागुंचे तीप्रश्न उद्भूत होत आहेत. पण दोन्ही नियोजनांची आवश्यकता आज देशाला आहे. आणि जागतिक चढाओढीमध्ये पुढारलेलें राष्ट्र म्हणून हिंदुस्थानाला म्हणवून घ्यावयाचें असेल आणि जनतेपुढील वाढत्या उपासमारीचा प्रश्न सोडवून तिला सुखी व प्रगमनशील बनवावयाचें असेल तर वरील दोनही प्रकारच्या नियोजनांचा अवलंब केल्याशिवाय तरणोपाय नाही.

---

# समारोप

हातीं घेतलेल्या कार्याचा समारोप करण्याची वेळ आता आली आहे. एथवर हिंदी लोकसंख्येच्या प्रश्नाचें विवेचन करून त्यांतून सुटकेचा मार्ग कसा निघतो हें दाखविण्याचा प्रयत्न उपलब्ध असलेल्या तद्विषयक माहितीवरून आमच्या मताप्रमाणें आम्ही केला आहे. आम्ही दाखविलेल्या मार्गाखेरीज निराळ्या रीतीने नियोजन करतां येणार नाही, असें आग्रहपूर्वक सांगणें चुकीचें होईल. निरनिराळ्या मतांप्रमाणें निरनिराळे मार्ग निघण्याचा संभव आहे. तसेंच आम्ही सुचविलेल्या कांही सामाजिक उपायांसंबंधाने सुद्धा मतभेद असणें स्वाभाविक आहे. तथापि वस्तुस्थिति जनतेपुढे मांडून जनतेला आपल्या वास्तव स्थितीची यथार्थ जाणीव करून देणें इष्ट व अवश्य आहे असें वाटल्यावरून प्रस्तुत उपक्रम हातीं घेतला. वस्तुस्थितीची जाणीव झाल्यावर प्रश्नाचा बिकटपणा लक्षांत येण्यास विलंब लागणार नाही; असें सामान्य आकलन झाल्यावर त्यांतून सुटण्याकरितां व्यक्तिशः व संघटित प्रयत्नांची आत्यंतिक आवश्यकता आहे एवढें जनतेस पटल्यास आमच्या कार्याची फलश्रुति झाली असें आम्हांस वाटेल.

हिंदुस्थानच्या कुठल्याही प्रश्नाचा विचार करावयास लागलें की, शेवटीं सर्वांचें मूळ राजकीय सत्तेकडे जातें. आपल्या देशाचे आर्थिक व सामाजिक जिव्हाळ्याचे प्रश्न सोडविण्यास पुरेशी सत्ता लोकांच्या हातांत नाही हें पाहून मनाला खिन्नता आल्याशिवाय राहत नाही. तथापि जनतेने खिन्न होऊन गप्प बसण्याचें धोरण केव्हाच सोडून दिलें आहे ही त्यांतल्यात्यांत समाधानाची गोष्ट आहे. कॉंग्रेसद्वारा राजकीय स्वातंत्र्याकरितां अनत्याचाराने आसेतु हिमाचल चळवळ चालविली आहे. त्या चळवळींत यश येणें जागतिक घडा-

मोडी व लोकांचे संघटित आणि नेटाचे प्रयत्न ह्यांवर अवलंबून राहील. ध्येय प्राप्त होईपर्यंत संघटित चळवळ हेंच आमचें ब्रीद असलें पाहिजे.

पूर्ण स्वतंत्र भारतवर्ष हें ध्येय जरी आज दूर वाटत असलें तरी हल्ली मिळालेल्या अर्ध्यामुर्ध्या सत्तेचा उपयोग यथाशक्य जनतेच्या हितासाठी सध्याचीं लोकनियुक्त प्रांतिक सरकारें करीत आहेत हें जनतेस विदित आहे. ह्या थोडयाबहुत कार्यामुळे सुद्धा लोकांना आशा उत्पन्न होऊन ते आपली स्थिति सुधारण्याकरितां सरकारपुढे अधिकाधिक गाऱ्हाणीं मांडीत आहेत. परंतु प्रश्नाच्या व्यापकपणापुढे हें कार्य अगदी अपुरें आहे. लोकहिताचें कार्य जों जों अंगावर घ्यावें तों तों सत्तेची उणीव अधिक स्पष्ट होते.

बरें, आज मिळालेल्या सत्तेचा व आगामी फेडरेशनमुळे—जर तें कांग्रेसने राबवावयाचें म्हटलें तर—येणाऱ्या हक्कांचा उपयोग आर्थिक नियोजनाकडे थोडया फार प्रमाणांत करणें शक्य होईल, असें गृहीत धरलें तरी जनतेला सर्वांगीण नियोजनाची जरूरी प्रथम पटली पाहिजे. आणि ज्या अर्थी बहुसंख्याक लोकांची प्रातिनिधिक अशी देशामध्ये कॉंग्रेस हीच एक जबाबदार संस्था आहे, त्या अर्थी कॉंग्रेसतर्फे नियोजन झालें पाहिजे अशा मागणीचा पुरस्कार—अखिलभारतीय व सर्वांगीण अशा नियोजनाचा पुरस्कार—जनतेकडून झाला पाहिजे. ज्या अर्थी कांग्रेस ही बहुसंख्य जनतेची प्रतिनिधि आहे त्या अर्थी सर्व देशासाठी आर्थिक नियोजनाची एकसूत्री योजना आखून हा प्रश्न तिनेही विचारांत घेतला पाहिजे. कोणताही प्रश्न धसास लावणें हें लोकनियुक्त राज्यव्यवस्थेमध्ये जनतेच्या आग्रहपूर्वक मागणीवर अवलंबून असतें.

सद्यःस्थितीच्या तिमिरांतून सुखाचा व उत्कर्षाचा दिवस लवकरच भारतभूला उजाडेल अशी आशा प्रगट करून आम्ही लेखणी खाली ठेवितों.

---

# परिशिष्ट

समारोप लिहून लेखणी खाली ठेवल्यापासून तों पुस्तक प्रकाशनापर्यंत एक वर्षावर काळ लोटला आहे. ह्या वर्षाच्या अवधींत आपल्या देशांत बऱ्याच महत्त्वाच्या घडामोडी झालेल्या दिसून येतात. देशाचें धुरीणत्व लोकांच्या हातीं यत्किंचितही नव्हतें. त्या ऐवजी प्रांतापुरती तरी निदान–मर्यादित का होईना–पण लोकांच्या हातीं सत्ता आली आहे. परकीय अंमल व तदनुषंगाने होत असलेली आर्थिक अवनति यांस थोडासा पायबंद बसतो आहे असें वाटतें. त्यामुळे पूर्वी जें अगदी औदासीन्याचें व अंधकाराचें साम्राज्य पसरलें होतें त्यांतून आता थोडेसे आशेचे किरण डोकावूं लागले आहेत. लोकमान्य मंत्रिमंडळांच्या हातीं प्रांतिक कारभार गेल्यापासून सार्वत्रिक सुधारणा करण्याचे प्रयत्न सर्व दिशांनी सुरू करण्यांत आले आहेत. व जिथे तिथे जिवंतपणा प्रत्ययास येऊं लागला आहे.

ह्या जिवंतपणाचीं दृश्य चिन्हें अनेक रीतींनी दृग्गोचर होत आहेत. मुंबई सरकारने मद्यपानबंदीचा प्रश्न अगदी धडाडीने सोडविण्यास घेतला आहे, तर संयुक्तप्रांतीय सरकारने निरक्षरतेला हद्दपार करण्याचें ठरविलें आहे. मध्यप्रांतीयांनी औद्योगिक पाहणी करण्याकरितां समिति नेमली आहे. बिहार व ओरिसा प्रांतांनी जमीनदारांचे हक्क नियंत्रित करण्याचा प्रयत्न चालविला आहे. कोठे राष्ट्रभाषा एक करण्यासाठी धडपड आढळून येते तर कोठे शिक्षणांत आमूलाग्र सुधारणा करण्याची योजना दिसते. अशा तऱ्हेने लोकांची स्थिति सुधारण्याकरितां हातीं आलेल्या सत्तेचा उपयोग करण्यांत प्रांतिक सरकारांत हितकारक अहमहमिका दिसून येत

आहे. पण सर्वांत महत्त्वाचा असा औद्योगिक नियोजनाचा प्रश्न स्वतः कॉंग्रेसने हातीं घेतलेला असून त्याकरितां राष्ट्रीय नियोजन समिति स्थापन केली आहे.

वरील समितीचा उद्देश राष्ट्राची औद्योगिक उन्नति करून लोकांच्या राहणीचा दर्जा वाढविणें हा आहे. त्याकरितां ह्या समितीने एक प्रश्नमालिका काढून प्रांतिक सरकारें, संस्थानें व इतर तज्ज्ञ संस्था ह्यांच्याकडून त्यांचीं मतें मागविलीं आहेत. सर्व उत्तरांचें पृथक्करण करून मग नियोजनाची आखणी करण्यांत येईल. समारोपांत प्रतिपादिल्याप्रमाणें कॉंग्रेसने नियोजनाचा प्रश्न हातीं घेतला आहे, ही फार आनंदाची गोष्ट आहे.

वर्धा शिक्षण योजनेसंबंधींही बरीच भवति न भवति झाली आहे. शिक्षण 'उत्पादक' असावें, ह्या मुख्य उद्देशास गौणत्व देण्यांत आलें असून फक्त हस्तव्यवसायावर भर देण्यांत आलेला आहे. ह्या योजनेनुसार मध्यप्रांत मुंबईप्रांत वगैरे ठिकाणीं प्रयोगादाखल शाळा सुरू करण्यांत येणार आहेत. हे प्रयोग यशस्वी झाल्यास त्याच प्रकारच्या शाळा सर्व प्रांतभर सुरू करण्यांत येतील.

शिक्षणाचा प्रश्न शाला तरी अगदी अलग नाही. राष्ट्राच्या आर्थिक व्यवस्थेंत स्वतःच्या शक्तीनुसार भाग घेणारे उत्पादक वर्ग तयार करणें हेंही शिक्षणाचें एक अंग असलें पाहिजे. हें तत्त्व एकदा मान्य झालें की चालू व पुढे होणाऱ्या नियोजित आर्थिक व्यवस्थेशीं शिक्षणाचा सुसंबद्ध मेळ घातला पाहिजे, हें ओघानेच सिद्ध होतें. तेव्हा भावी हिंदी समाजांत कोणत्या प्रकारचें आर्थिक उत्पादन होईल हें ओळखून त्याकरितां योग्य असे कारागीर शिक्षणाने तयार केले पाहिजेत. असो.

सार्वत्रिक सुधारणा होण्याकरितां उपरिनिर्दिष्ट प्रयत्न चालू आहेत. तरी मध्यवर्ती सत्ता जोंपर्यंत लोकांच्या हातीं आली नाही तोंपर्यंत एकसूत्री व महत्त्वाची सुधारणा घडून येणें कठीण. कारण सुधारणा म्हटल्या की खर्चाची बाब आणि त्यासाठी पुरेसें उत्पन्न हातीं येण्यास मध्यवर्ती सरकारचा ताबा मिळाला पाहिजे. परंतु त्याही बाबतींत अनेक अडचणी आहेत. किंबहुना हा ताबा मिळविण्याचा मार्ग बराच कंटकमय दिसतो आहे. तरी सुद्धा सत्तेचा व नियोजनाचा मार्ग एकजुटीने सारख्या आक्रमीत राहणें हाच श्रेयस्कर उपाय आहे.

संपूर्ण सत्ता हातीं आली व आर्थिक नियोजन शक्य झालें तरी लोकसंख्येचा प्रश्न पूर्णांशाने सुटणार नाही. संपत्तीच्या अधिकाधिक उत्पादनास लोकसंख्येचा दर्जा व गुण सुधारले पाहिजेत. त्याबरोबरच लोकसंख्येची वाढ संपत्तीच्या वाढीच्या प्रमाणांत असली पाहिजे. संख्या अधिक वाढत राहिल्यास संपत्तीच्या वाढीचा उपयोग फारसा होणार नाही. म्हणूनच सर्वांगीण नियोजनाची आवश्यकता आहे.



# कांहीं संदर्भ ग्रंथ


1. *A. M. Carr Saunders* : World Population-Past growth and Present Trends.
2. *E. B. Reuter* : Problems of Population.
3. *A. M. Carr Saunders & Jones* : A Survey of Social Structure of England and Wales.
4. *Carr Saunders* : The Population Problem.
5. *Dalton* : Essay on Population.
6. *Harrold Cox* : Problem of Population.
7. *Harrold Wright* : Population.
8. *Pearl* : Biology of Population.
9. *Wattal* : The Population Problem in India and 1931 Census.
10. *Ranadive* : Population Problem of India.
11. *Prof. D. G. Karve* : Poverty and Population in India.
12. *Brij Narayan* : Population Problem in India.
13. *B. K. Sirkar* : Sociology of Population.
14. *B. Misra* : Overpopulation in Saugur.
15. *Radha Kamal Mukarji* : Population Capacity and Control in India (Address).
16. *Popeneo & Johnson* : Applied Eugenics.
17. *Sir M. Vishweshwarayya* : Planned Economy for India.
18. *G. D. Birla* : Indian Prosperity-A Plea for Planning.

19. *K. S. Subbarao* : Some Aspects of Economic Planning.
20. *J. N. Ghose* : Ten years planning and middle class unemployment.
21. *Prof. G. B. Jathar and Prof. S. G. Beri* : Indian Economics.
22. *Prof. Shah and Khambata* : Wealth and Taxable Capacity of India.
23. *Profs. Vakil and Muranjan* : Industrial Policy of India.
24. *Dr. Soni* : Indian Industrial Problem.
25 *Findlay Shirras* : Poverty and kindred Economic Problems.
26. *Pillay* : Indian Economic Problem.
27. *Profs. Vakil and Muranjan* : Currency and Prices in India
28. *Prof. K. T. Shah* : Sixty years of Finance in India.
29. *Profs. Wadia and Joshi* : Wealth of India.
30. *Banerji* : Finance in the days of the Company.
31. *Dadabhai Nawroji* : Poverty and Un-British Rule in India.
32. *Capt. Modak* : Defence Problem of India.
33. *Dube* : Public Debt of India.
34. *H. G. Wells* : Work, Wealth and Happiness of Mankind.
35. *Cannon* : A Review of Economic Theory.
36. बरवे : शेतीची सद्यःस्थिति.
37. वि. ग. सहस्रबुद्धे : विज्ञानप्रणीत समाजरचना.

३८. प्रो. वा. गो. काळे : अर्थशास्त्र.
३९. प्रो. काळे व प्रो. कर्वे : भारतीय अर्थशास्त्र.
40. *Bertrand Russel* : On Education.
41. *Prof. Radhakrishnan* : The Hindu View of Life.
42. *F. L Brayne* : Scheme for Rural Reconstruction; Socrates in an Indian Village; Remaking of Village India; The Indian and English Village.

## Reports

All India Census Report–1911, 1921, 1931.
Baroda Census–1931.
Bihar Census–Lancey.
Public Health Commissioner's Reports–1932, 1933.
Statistical Year Book of the League of Nations 1936.
Latest Year Books–U. S. A., England, Japan and India.
Report of the Agriculture Commission.
Report of the Labour Commission.
Central Banking Enquiry Committee Report.
Industrial Commission Report.
Report of Enquiry into Working Class Family Budgets in Bombay City, 1935.
Labour Office Inquiry into Working Class Budgets, 1921–22.
Bowle Robertson Committee Report, 1934.
The Simon Commission Report.
Madras Unemployment Committee Report.
Sapru Committee Report.
Report of the World Population Conference.
Indian Economic Journal, 1932, 33, 34, 35, 36.
Indian Journal of Medical Research.
Report of the Agriculture Committee appointed by Maharashtra Provincial Congress Committee.
Wardha Education Committee Report.

# सूची

( हिंदुस्थान, लोकसंख्या यांसारखे पानोपानी येणारे शब्द व साधारणपणें परिच्छेदांचे मथळे सूचींत घेतले नाहीत. )

# सुविचार प्रकाशन मंडळाने आजपर्यंत प्रकाशित केलेलीं पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| **१** | **नवभारत ग्रंथमाला** | किंमत |
| १ | ज्ञानोपासना व भारतीयांचें कर्तव्य (उपलब्ध नाही) | १॥ |
| २ | शेक्सपियर व तत्कालीन इंग्रजी रंगभूमि (२ री आवृत्ति) | ,, |
| ३ | राज्यशास्त्र | ,, |
| ४ | अमेरिका—पूर्वखंड | ,, |
| ५ | भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न | ,, |
| ६ | नागरिकनीति | ,, |
| ७ | कालिदास | ,, |
| ८ | प्राचीन भारतीय शिक्षणपद्धति | ,, |
| ९ | भारतीय समाजशास्त्र | ,, |
| १० | राजपूत संस्कृति | ,, |
| ११ | राजपूत राज्यांचा उदय व ऱ्हास | ,, |
| १२ | वनस्पतिजीवन | ,, |
| १३ | हिंदी लोकसंख्येचा प्रश्न | ,, |
| **२** | **सुविचार माला** | |
| १ | लोककथा व लोकगीतें | १० आणे |
| २ | डॉ. शरच्चंद्र (कादंबरी) | १ रुपया |
| ३ | आमच्या देशाची स्थिति (निबंध) | १२ आणे |
| ४ | आराधना (कवितासंग्रह) | १। रुपया |
| ५ | दृष्टीआडच्या सृष्टींत (समाजदृश्यें) | १ रुपया |
| **३** | **अभिजात सारस्वत** | |
| १ | विष्णुपदी<br>(विष्णुशास्त्री चिपळूणकरांचा प्रातिनिधिक लेखसंग्रह) | **३ रुपये** |
| २ | तर मग आम्ही काय करावें?<br>(टॉलस्टॉयकृत What then must we do ? याचा मराठी अनुवाद) | **२ रुपये** |